


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.






अनुक्रमणिका

# दीपावली

दलाल आर्ट स्टुडिओ प्रकाशन • दिवाळी १९६८ • वर्ष २४ वे

४ रुपये

अनुक्रमणिका

# दीपावली

दिवाळी १९६८ • वर्ष २४ वे • मूल्य ४ रुपये

## श्रेयनामावली —

- **स्वरमंजिरी** : बहुरंगी नयनरम्य चित्रावली : स्वानंदी, जोगिया, सुखिया, मधुरिया—चित्रकार दीनानाथ दलाल
- **राजकीय कुस्त्यांची दंगल** : 'फिरी-स्टाईल' दुरंगी विंगचित्रमाला
- **मुक्ताचार विद्यापीठ** : वासुनाक्यावरील अत्याधुनिक 'मठ'
- **गाजत असलेली चालू नाटके** : दोन हजार वर्षांत न झालेली नाटके
- **सत्वाचे ( की सट्टयाचे ) प्रयोग** : गांधी जन्मशताब्दीच्या निमित्ताने
- **जलपऱ्यांचे सुरम्य दर्शन** : छाया : आर. आर. प्रभू
  भारत–पाक युद्धाच्या पार्श्वभूमीवरील चित्तथरारक कादंबरी
- **प्रतीक्षा** : प्रभाकर पेंढारकर ( पहिल्या पारितोषिकाची कादंबरी )
- **कथा** : पु. भा. भावे ☆ अरविंद गोखले ☆ ज्ञानेश्वर नाडकर्णी ☆ प्रो. जी. ए. कुळकर्णी ☆ चित्रकार द. ग. गोडसे
  मधु मंगेश कर्णिक ☆ प्रभाकर अत्रे
- **विनोदी कथा** : जयवन्त दळवी ☆ वा. रा. सोनार
- **ललित लेख** : ग. त्र्यं. माडखोलकर ☆ राजाराम हुमणे ☆ आनंद साधले ☆ वसंत देशमुख ☆ माधव राजवाडे
- **गझल** : कुसुमाग्रज, ☆ वा. रा. कान्त ☆ मंगेश पाडगांवकर ☆ राजा बढे ☆ शान्ता शेळके ☆ सोपानदेव चौधरी ☆ अमृतानंद
- **पारितोषिकाचे गझल** : उमाकान्त कीर ☆ त्र्यं. शं. देशमुख ☆ सुभाष रा. दळी
- **शब्दमंजिरी** : अशोक परांजपे
- **व्यंगचित्रे** : अशोक डोंगरे

टे. नं.
३५७७६५

Gram :
DALALART

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल** यांनी अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेनरोड, मुंबई नं. ४ येथे छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रिज, मुंबई ४ येथे प्रसिद्ध केले.
Registered with the Registrar of Newspapers for India under No. RN 1612/57

अनुक्रमणिका






# अभीष्टचिंतन

'दीपावली'चा यंदाचा दिवाळी अंक हा चोविसावा वार्षिक दिवाळी अंक होय. या अंकापासून 'दीपावली' पंचविसाव्या वर्षात पदार्पण करीत आहे. या निमित्ताने 'दीपावली'च्या गेल्या चोवीस वर्षांच्या साहित्य–संसारावर दृष्टिक्षेप टाकणे औचित्याला धरूनच होईल. पंचवीस वर्षापूर्वीची परिस्थिती आणि आजची परिस्थिती यात महदंतर आहे. त्यावेळच्या मानाने आज दिवाळी अंकांच्या संख्येत खूपच भर पडली आहे. असे असूनही 'दीपावली' चे साहित्य-शारदेच्या दरबारातील आपले वैशिष्ट्यपूर्ण स्थान आम्ही कायम टिकवू शकलो आहो यातील श्रेयाचा वाटा 'दीपावली'वर अकृत्रिम प्रेमाचा वर्षाव करणाऱ्या आमच्या लेखक व वाचवर्गाकडेच जातो हे आम्ही नम्रतापूर्वक नमूद करू इच्छितो.

'दीपावली' पंचविसाव्या वर्षात पदार्पण करीत असल्याच्या निमित्ताने यंदा 'दीपावली'ने कादंबरी–स्पर्धेचा नव्यानेच केलेला उपक्रम आमच्या वाचकाना आवडेल अशी आम्हाला उमेद वाटते. या स्पर्धेच्या निमित्ताने एका नव्याच लेखकाला साहित्य-दरबारात प्रवेश मिळत आहे याबद्दल आम्हाला सानंद अभिमान वाटत आहे. कादंबरी–स्पर्धेप्रमाणेच मराठी कवींसाठीही 'दीपावली'ने गझल–स्पर्धा खास आयोजित केली होती. त्या स्पर्धेतही नवे कवीच पुढे आले आहेत हे आपणास दिसून येईलच.

गेल्या चोवीस वर्षांच्या काळाचा विचार करीत असताना कितीतरी कडूगोड आठवणी आमच्यापुढे गर्दी करीत आहेत. 'दीपावली'चा दिवाळी अंक हे आपल्या घरचेच कार्य असे मानून आम्हाला सदैव मदत करणारे आमचे परममित्र श्री. गोपालकृष्ण भोबे आज आमच्यामध्ये नाहीत. तसेच आमचे दुसरे हितचिंतक श्री. का. दा. नायक यांच्या स्मृती आमच्या मनात यावेळी येत आहेत. यांच्या अनेकानेक आठवणीं-मुळे मन व्यथित झालेले आहे.

'दीपावली'चा हा वार्षिक दिवाळी अंक दरवर्षीप्रमाणे यंदाही यशस्वी करण्यात मेसर्स टॉम अ‍ॅण्ड बे (प्रा). लि. चे मॅनेजिंग डायरेक्टर श्री. गणेशराव तांबे यानी महत्त्वाचे साहाय्य दिले आहे. तसेच मित्रवर्य श्री. अच्युतराव वर्वे यांच्या सक्रीय साहाय्याचाही आवर्जून उल्लेख केला पाहिजे. संपादन कार्यात श्री. प्रभाकर अत्रे, श्री. कृ. वि. पेठे तसेच मुद्रणकार्यात श्री. चंद्रकांत अ. दळी यानी खूपच परिश्रम घेतले. जाहिरात विभागाचे श्री. श्री. स. दाभोळकर हे 'दीपावली' चे जाहिरातविषयक काम घरचेच मानतात.

'दीपावली'चा हा वार्षिक दिवाळी अंक योग्य मुदतीत आणि सुबकपणे छापून देणारे 'अशोक प्रिंटिंग प्रेस' चे मालक पिता–पुत्र आणि प्रेसचा कामगार वर्ग, बहुरंगी चित्रांची तितक्याच कलात्मकतेने उत्कृष्ट छपाई करणारे 'आशा प्रिंटरी'चे श्री. भाई व श्री. सुरेश मालपेकर, ब्लॉक्स तयार करून देणारे प्रभात प्रोसेस स्टुडियो, पंडित प्रोसेस स्टुडियो आणि धारगळकर प्रोसेस ( प्रा. ) लि., ऑफसेट छपाईचे काम कर-णारे जगदीश्वर प्रिंटिंग प्रेसचे श्री. भालचंद्र पाठक व त्यांचे सहकारी, हा अंक वाचकांपर्यंत तत्परतेने पोहोचविण्याचे काम करणारे श्री. बाबूराव बागवे, सर्वदूर विखुरलेले आमचे ठिकठिकाणचे वितरक या सर्वांना मनःपूर्वक धन्यवाद !

स्टुडियोतील सर्वच सहकाऱ्यानी या अंकाच्या सर्वच कामात मनापासून सहकार्य केले आहे. ते घरचेच असल्याने 'आभारा'चा औपचारिक-पणा त्याना आवडणार नाही.

ही दिवाळी आमचे सर्व लेखक, मित्र, जाहिरातदार, एजंट आणि असंख्य हितचिंतक यांना सुख-समृद्धीची जावो हीच शारदेच्या चरणी प्रार्थना !

—दीनानाथ दलाल


| प्रकाशन स्थळ | ऑफसेट छपाई | रंगीत चित्र छपाई | ब्लॉक्स | छपाई |
|---|---|---|---|---|
| दलाल आर्ट स्टुडियो, ४०/४२, केनेडी ब्रिज, मुंबई–४ | जगदीश्वर प्रिंटिंग प्रेस गायवाडी, मुंबई–४ | आशा प्रिंटरी खेतवाडी, मुंबई–४ | प्रभात प्रोसेस स्टुडियो, मुंबई पंडित प्रोसेस स्टुडियो, मुंबई धारगळकर प्रोसेस(प्रा.)लि. मुंबई–२८ | अशोक प्रिंटिंग प्रेस, २०१, खेतवाडी मेन रो मुंबई–४ |




अनुक्रमणिका

**चंदनची अतिस्वच्छ आणि म्हणूनच पवित्र वाटणारी पावले पाहातच ती हृदयाशी धरावी असे तिला वाटले, पण निर्घृण नियतीचा वेगळाच डाव होता....**

कुलाबा कॉजवे, रीगल सिनेमा, काळा घोडा, फ्लोरा फाऊंटन! कोटातल्या विकानांची दारे आज बंद होती. आज होता आदितवार. साऱ्या कोट विभागात सामसूम होती. एरव्ही दुथडी भरून वाहणारे राजरस्ते मोकळे मोकळे दिसत होते. उन्हाळ्यात जेमतेम झिरपणाऱ्या नदीप्रमाणे! निळसर पाण्याच्या एखाद्या लकाकत्या थेंबाप्रमाणे त्या वाटेवरून लतिका सरकत होती. वाटत असे होते की ज्या मार्गावरून ती पावले टाकत होती त्या मार्गावर तिच्या गुलाबी कांतीचे ठसे उमटतील! एखाद्या सुबक रांगोळीची ओळ भरल्याप्रमाणे! तिचे चालणे होतेच तसे. अगदी पहात रहावे असे तिचे चालणे होते. वीस वर्षांच्या अतिशय बांधेसूद, फार सुरेख आणि फार लवचिक मुलीचे चालणे पहाण्यासारखे का नसेल? आजपासून आठच दिवसानी तिचे चंदनशी लग्न व्हायचे होते. तो उल्हास तिच्या रोमरोमात भरून राहिला होता. म्हणून तर ती कुलाब्या पासून तडक चालत निघाली. चंदनचे पाच खोल्यांचे प्रशस्त बिऱ्हाड कुलाब्याला होते. चंदनला धंद्याच्या काही त्वर्य कामासाठी अकस्मात् दिल्लीला जावे लागले. बिऱ्हाड रिकामेच होते. चंदनला ह्या जगात जवळच्या नात्याचे कुणीच नव्हते. आई-बाप नव्हते. बहीण-भाऊ नव्हते. त्याच्यापाशी उत्तम शिक्षण होते. चांगले द्रव्य देणारा धंदा होता. सत्तावीसचे वय होते, परंतु गृहिणी मात्र नव्हती. ती जागा लतिका घेणार होती. चार महिन्यांपूर्वीच त्यांचे लग्न ठरले. म्हटले तर ते प्रेमलग्न होते, म्हटले तर जुन्या पद्धतीचे ठरविलेले लग्न होते. चंदनच्या कार्यालयातील एका वडिलधाऱ्याने चंदनला लतिकेच्या घरी आणले. तिच्या आई-वडिलांशी त्याची ओळख करून दिली. पाहताक्षणीच मुलगा त्याना मान्य झाला. मान्य न व्हायला झाले काय? चंदन चांगला उंचपुरा होता, गोरागोमटा होता, सुशिक्षित होता, तरुण होता आणि चांगल्या कुळातला होता. त्याचा लौकिकही फार चांगला होता. त्याच्या विषयात कसलीही कुजबुज नव्हती, असा निर्वाळा साऱ्यानीच दिला आणि अगदी अशाच मुलाच्या शोधात लतिकेचे आई-वडील होते. लतिका घरेलू मुलगी होती. शिकायची म्हणून ती शिकली. तिला संसाराची, घरकामाची, मुलांची फार आवड होती. स्वभावानेच ती सात्विक आणि सोज्वळ होती. आपल्या ह्या सुंदर, पदवीधर, सद्‌गुणी व हळव्या मुलीला योग्य जोडीदार कसा मिळेल, ह्याच चिंतेत तिचे आई-वडील होते. तोच त्यांच्या एका जुन्या मित्राने बुद्धया हे काम केले. घरात चंदनचा प्रवेश झाला. चंदन त्याना पाहिल्याबरोबर आवडला. चंदन-लतिकेचा जोडा अगदी लक्ष्मी–नारायणासारखा दिसला असता. एखाद्या आम्र-वृक्षाशेजारी लवचिक लतिका शोभावी, तशी लतिका चंदनशेजारी शोभून दिसेल असे त्याना वाटले. मग ठरलेले सोपस्कार झाले. लतिकेने चंदनसाठी चहा आणि फराळाचे आणले. त्या साऱ्या स्वादिष्ट वस्तू तिनेच केल्याचे कुणी तरी बोलले. चंदनला पाककुशल गृहिणीच हवी होती. बाहेरचे खाऊन तो कंटाळला होता. लतिकेच्या रूपा-विषयी काही प्रश्नच नव्हता. पाहताक्षणी डोळ्यात भरावे, असे तिचे रूप होते. बाई सडपातळ असावी आणि तरीही मांसल असावी, अशी चंदनची अपेक्षा होती. लतिका अगदी तशीच होती. चवळीच्या शेंगेसारखी ती लवचिक होती, आणि तरी तिचे काही अवयव डोळे बांधून टाकतील असे पुष्ट होते. अर्थात् चंदनला लतिका आवडली. त्याला फार प्रिय वाटणारा आणखीही एक गुण तिच्या ठिकाणी होता. ती अतिशय स्वच्छ होती. केव्हाही पहा, स्नानगृहातून आल्यासारखीच ती दिसे. निर्मळ, शुचिर्भूत, दवबिंदूने न्हालेल्या फुलासारखी! तिचे घरचे कपडेही अगदी झुळझुळीत असत. चेहरा, केस, दात, पावले, लतिकेचे सारेच कसे लखलखीत होते. आणि लतिकेलाही चंदनच्या ठिकाणी तोच दुर्मिळ गुण दिसला. प्रथम खालच्या मानेने ती त्याच्या पावलाकडेच पहात राहिली. चंदनची पावले अति स्वच्छ होती. कुणाकुणाचे चेहेरेही इतके स्वच्छ नसतात, तितकी चंदनची पावले स्वच्छ होती. ती पावले पाहताच लतिकेला वाटले की, ही पावले हृदयाशी धरावीत, ह्या पावलाना स्पर्श करावा. लतिकेने ज्या क्षणी चंदनची पावले पाहिली, त्याच क्षणी मनोमन तिने त्याचा स्वीकार केला. चंदन हे नावही त्याच क्षणी तिला फार सार्थ वाटले. तिला वाटले, ही पावले नुसती स्वच्छ नाहीत, तर सुवासिकही असली पाहिजेत. अगदी चंदनाच्या खोडासारखी सुवासिक! ही पावले आपली कधी होतील? त्या पावलांचे स्मरण करीतच लतिका वाट कापत होती. चंदनच्या बिऱ्हाडावर ती आताच जाऊन आली. चंदन नसताना त्या खोल्यात आज ती प्रथमच गेली. एकटीच गेली. एकटी होती म्हणूनच गेली. एरव्ही तिच्यासमवेत नेहेमी कुणीतरी असे. लहान भाऊ, लहान बहीण, किंवा एखादी मैत्रिण, चंदन आणि लतिका कधी बोलपट पहायला गेले, तरी साधारणतः त्यांच्यासमवेत कुणीतरी असे. ही तिच्या आई-वडिलांची शिस्त होती. तिलाही ती अमान्य नव्हती. पूजेचे फूल देवावर पडण्यापूर्वी प्रत्यक्ष त्या देवाचाही स्पर्श त्या फुलाला होता कामा नये, असे तिला वाटे. लग्न ही पूजा होती. प्रेम ही पूजा होती. त्यानंतर ही दोन स्वच्छ मने व देह एकरूप होणार होते. वेगळेपणा काही उरणार नव्हता. पण पूजेपूर्वी प्रसाद उष्टावता येत नाही. त्याला तोंड लावता येत नाही. आधी तोंड लावलेले खरकटे लग्नानंतर कां खायचे? त्या पूर्णानंदाचा लचका आधीच कां तोडायचा? त्यात गंमत कोणती? शहाणपणा कोणता? जे लग्नविधीनंतर निष्कलंक स्वरुपात मिळायचे, त्याला आधीच डाग कां लावायचा? त्यापेक्षा अधीर उत्कंठेने वाट पाहणे बरे नाही का? त्यात जास्त सौंदर्य आणि जास्त रोमांच नाहीत का? संयमाने सुखाची धार अंती वाढत नाही का?










## चांद माझा—

चंद्र तुमचा वेगळा जो अंतराळी राहतो
चंद्र माझा अंतरीचा मीच केवळ पाहतो.

दीन तो शास्त्रापुढे सामंत होउनि वाकला
श्वान याने माकडे इत्यादिकांनी झाकला.

मार्गदीपक-पालिकेच्या तो दयेवर लोंबतो
कीटपंखांचा जया ज्योतीस त्याच्या झोंबतो.

जाणत्यांचा हा जमाना, रूप त्याचे देखती
हास्य त्याचे लास्य त्याचे टेबलावर जोखती.

चांद माझा वेगळा खाविंद हा तख्तावरी
ज्ञानविज्ञाने तयाची स्पर्शती ना पायरी.

भाव माझे गीत माझे रंग जे मी रेखतो
राजवाडे त्यात बांधुन राहतो सुखरूप तो.

तो तळ्यावर डुंबतो दर्याकिनारी हिंडतो
चुंबनाने झाकल्या नेत्रातुनी ओसंडतो.

हात देतो तो व्यथेला साथ देतो सुंदरा
तो मनोगत ईश्वराचे सांगतो या नश्वरा.

येऊद्या आकाशयाने वर्षुद्या श्वानावळी
दिग्फुलाची या न केव्हा भ्रष्ट होइल पाकळी.

— कुसुमाग्रज

पण हा संयम चंदनला एकेकदा असह्य होऊन जाई. एकदा अशीच ती चंदनच्या बिऱ्हाडावर गेली. बरोबर तिचा धाकटा भाऊ होता. भावाला चंदनने चॉकोलेट आणण्यासाठी खाली पिटाळले व तो लतिकेला म्हणाला,

"तुझ्याबरोबर नेहेमी कुणी ना कुणी कां येतं?

"आई पाठविते!" लतिका खाली मान घालून म्हणाली.

"मग तू आईला सांगत कां नाहीस?"

ह्यावर लतिकेने काहीच उत्तर दिले नाही. तेव्हा चंदन पुन्हा म्हणाला, "बरोबर कुणी नको असं तू आईला कां सांगत नाहीस?"

"मला नाही तसं सांगता येत!" लतिका म्हणाली.

"म्हणजे तू इथे एकटी कधीच का येणार नाहीस?" वैतागाने चंदन उद्गारला. त्याचा तो वैताग पाहून लतिकेने स्मित केले व ती म्हणाली.

"येणार आहे की नाही, ते आपणच सांगावं!"

तेवढ्यात लतिकेचा भाऊ वर आला. ते संभाषण तिथेच तुटले. नंतर एकदा लतिकेबरोबर तिची एक मैत्रिण चंदनच्या बिऱ्हाडावर आली. मैत्रिण शहाणपणाने बाहेर सज्जात जाऊन उभी राहिली. चंदन झटकन् पुढे झाला व त्याने लतिकेचा हात धरला.

"सोडा, सोडा!" लतिका दबलेल्या स्वरात म्हणाली.

"कां सोडा?" हसत चंदनने प्रश्न केला.

"मग सांगते. आधी माझा हात सोडा."

"पण कां?" धडपडणाऱ्या लतेचा हात दाबत चंदनने विचारले. त्याने तिचा हात प्रेमभराने अधिकच आवळला. त्यासरशी लतेच्या डोळ्यात पाणी आले. तिचे डोळे ओलावलेले पाहताच चंदनची तिच्या हातावरील पकड सैल झाली.

"नुसता हात धरलेलाही तुला चालू नये?" आजकाल शिकलेल्या बायका कुणाशीही हस्तांदोलन करतात!" असे म्हणून त्याने तिचा हात सोडला. लतिका न्हाणीघरात पळाली. नळ सुटल्याचा ध्वनि सुरू झाला. साबणाचा सुवास तरंगत आला. चंदनला वाटले आपण लतेचा हात धरला. म्हणून ती तो धुवायला निघाली. बाहेरून तो ओरडला,

"अशानं लग्न झाल्यावर तुला सारखं साबणाच्या फेसातच बसावं लागेल." त्याचे ते शब्द एकून लतेची मैत्रिण आत आली व चंदनला म्हणाली,

"ही वेडाबाई साबणानं हात घासत बसली आहे वाटतं!"

"हं!" चंदन उद्गारला.

"भारी मंत्रचळी आहे! लतिकेची मैत्रिण बोलू लागली. "वाटेनं चालताना हिला कुणाचा तरी घामट हात लागला. तेव्हापासून ती सारखी घोकत होती की प्रथम मला माझा हात साबणानं स्वच्छ धुवून काढला पाहिजे. मला वाटलं ही गमतीनं बोलते आहे. पण तुम्हाला इथे एकटे सोडून ही खरंच हात धुवायला जाऊन बसली की!"

"म्हणून ती हात धुवायला गेली होय?" चंदन कौतुकानं उद्गारला. त्यावर मैत्रिण म्हणाली,

"ह्या मुंबईच्या गर्दीत हे असं चालायचंच. तेवढ्यासाठी जेव्हा जेव्हा हात-पाय धुवायला लागलं तर दुसरं काही कामच करायला नको."

त्यावर चंदन म्हणाला, "खरं सांगू? कुणा घाणेरड्या माणसाचा स्पर्श झाला तर मलासुद्धा चैन पडत नाही. मीसुद्धा हात धुवून टाकतो."

"मग मात्र जोडीस जोड जमली." मैत्रिणीने समारोप केला. स्वच्छतेच्या विषयात चंदन आणि लतिका खरोखर तोडीस



अनुक्रमणिका







तोंड होती. चंदन दिवसातून निदान दोनदा तरी स्नान करीतच असे. आणि लतिकेच्या स्नानांना तर गणतीच नव्हती. तीनदा, चारदा, पाचदा, हवे तितक्या वेळा ती न्हाणीतल्या फवाऱ्याखाली जाऊन उभी राही. घामाची किंवा घाणीची शंकाही तिला सहन होत नसे. अशीच एकदा संध्याकाळच्या वेळी ती धाकट्या वहिणीला बरोबर घेऊन चंदनकडे आली. आल्या क्षणापासून ती अस्वस्थ होती. तेव्हा चंदनने तिला विचारले,

"बरं नाही का ? "

लतिकेने उत्तर दिले, "बरं आहे की! वाटेवर माणसांची फार गर्दी होती म्हणून. . ."

तिचे वाक्य संपण्यापूर्वीच चंदन म्हणाला, "मग स्नान करणार का ? मी आत्ताच स्नान केलं. ह्या मुंबईच्या वायुमानात अंगावर घ्यावं तेवढं पाणी थोडंच ! "

चंदनची कल्पना लतिकेला तत्काळ आवडली. परंतु चंदनच्या सुस्नात शरीराकडे पहात ती घुटमळली. त्याच्या स्वच्छ पायापासून नुकत्याच विंचरलेल्या केसापर्यंत तिची दृष्टी फिरली; व ती जणु स्वतःशीच म्हणाली, "पण तुमची अडचण लक्षात आली" चंदन हसून म्हणाला,

"तुमच्या बदलायच्या कपड्यांची मी आता व्यवस्था करतो."

चंदन दडदडा जिना उतरून गेला आणि दहा मिनिटात फूलपाखराच्या पंखासारख्या दोन साड्या घेऊन आला. साड्यां-समवेत रंगसंगती साधणारे परकर, ब्लाऊज व अन्य कपडे आणा-यलाही तो विसरला नाही. त्या साड्यांकडे पहात लतिकेची वहीण उद्गारली, "अय्या! कित्ती छान!" फिक्कट निळ्या आणि हळ-कुंडासारख्या पिवळ्या रंगाच्या त्या दोन्ही साड्या फार सुंदर होत्या खऱ्याच! चंदनने तिच्यासाठी आणलेल्या त्या पहिल्या साड्यां-कडे लता पहात असतानाच चंदन म्हणाला,

"करा आता हवं तितकं स्नान! मी वापरलेला साबण चालत नसेल तर नवा साबण आणि पंचा न्हाणीघरात आहे ! "

पण लतिकेने चंदनचाच साबण आणि पंचा वापरला. ते लक्षात येताच चंदनचे काळीज फुलून आले. त्याने एका कागदावर लिहिले—

"तू बदललेले कपडे येथून नेऊ नकोस. तुझ्या कपड्यांचा एक जोड तरी इथे पाहिजेच. साडी, ब्लाऊज, परकर सगळं काही! येवढं तरी करशील?"

त्याने तो कागद लतेसमोर धरला. तिचा चेहरा लज्जेने लाल झाला. त्याच्या हातातून झरणी घेत तिने त्या कागदावर एकच शब्द लिहिला "बरं!" तो शब्द वाचताच चंदनचा चेहेरा फुलला. कागद घेता घेता लतेचा हात त्याने हळूच दाबला व तिच्या नितळ चेहेऱ्याकडे तो पहात राहिला. लतिकेचे डोळे क्षणभरच त्याच्या चेहेऱ्यावर स्थिरावले व मग खाली त्याच्या पावलांकडे वळले.

ते सारे दृश्य लतिका ह्याक्षणी मनोमन पहात होती. चंदनने दिलेली निळी व पिवळी साडी तिने वारंवार वापरली होती. पण



## नैनं छिंदन्ति शस्त्राणि

शस्त्र त्याला छेदू शकले नाही. अग्नि त्याला जाळू शकला नाही. मृत्यूने सोडलेली सारी आयुधे बोथट ठरली. विजा कोसळल्या, पण त्यांची फुले झाली. दगड भिरभिरत आले, पण त्यांचे हार बनले. पदयात्रेच्या रस्त्यावरच्या काट्यांची झाली सदाफुली आणि कोरांटीची झाली सूर्यफुले. ती पदयात्रा अखेर फुलांची होती. मुलांची होती. दलितांची होती. गलितांची होती. मातीतून मूर्ती घडविणारी आणि मूर्तीला चैतन्य देणारी, चैतन्याला अग्नीची दाहकता देणारी आणि त्याच वेळी चंदनाचे शीतलत्वही समर्पित करणारी, क्रांतीचा आणि शांतीचा जयजय-कार करणारी, क्रांती आणि शांतीचे तत्त्वज्ञान अखेर एकच आहे असे पटकन् देऊ पाहणारी, जनसामान्यातला आंतर–अग्नी फुलविणारी, मानवातल्या पशूवर मात करणाऱ्या देवत्वाला आवाहन करणारी, सर्वाभूती परमेश्वर पाहणारी, जात, प्रांत, भाषा आदि संकुचिततेवर मात करायला शिकविणारी, कायराला कर्मवीर बनविणारी आणि कर्मवीरातून पहिल्या, दुसऱ्या, तिसऱ्या श्रेणीच्या लोकनेत्यांची अखंड मालिका निर्माण करणारी, वाणीने आणि कृतीने नेहमी साऱ्यांचे 'शिव' चिंतणारी. शिव्यांचे हार झेलीत झेलीत, शापांचे ओझे शिरावर वहात वहात आणि तरीही हसत हसत पुढे जाणारी ही पदयात्रा होती. ती यात्रा माण-साना आणि माणसातल्या वीरधीरांबरोबरच शेळ्यामेंढ्यानाही बरोबर घेऊन निघाली होती. अनेक आघाड्यांवर ती एकाच वेळी लढत होती. प्रवासात तिने काही ठिकाणी स्वावलंबनाची, स्वत्वाची, स्वाभिमानाची, ऐक्याची, दलितांबद्दलच्या करुणेची व कर्तव्य जागृतीची झाडे लावली. तिला खतपाणी घातले. स्वभाषेचा – राष्ट्रभाषेचा आग्रह धरला. स्वदेशीचा जयजयकार केला. शब्दांचे साहाय्य घेतले. मिठाचा आग्रह धरला. आत्म-क्लेशाच्या मार्गाने माणसातली मानवता फुलविण्याचा यत्न केला. यश–अपयश– शिव्या आणि ओव्या सारख्याच मानल्या








**माणूस बदलणं ही वाटते इतकी सोपी गोष्ट नाही हे त्या महायात्रिकाच्या ध्यानात आले. तरीही यात्रा चालूच राहिली. ऊनपाऊस तिनं सारखा मानला. मंत्र गात गात माणसे त्याच्या मागे जातच राहिली. कारण अपूर्णतेकडून पूर्णत्वाकडे, अंधाराकडून प्रकाशाकडे, असत्याकडून सत्याकडे, स्थूलाकडून सूक्ष्माकडे, पशुतेकडून देवत्वाकडे ती यात्रा निघाली आहे ह्याबद्दल मनात संदेह नव्हता. तत्त्व बरोबर आहे ह्याची खात्री झालेली होती.**

**यात्रा चालत राहिली. झेंडा फडकत राहिला. महायात्रिक पडला. नेता पडला पण यात्रा चालूच राहिली. कारण यात्रा माणसासाठी निघाली नव्हती. एका तत्त्वाच्या अंतिम विजयासाठी ती निघाली होती.**

**वीस वर्षं झाली त्या गोष्टीला, नाक्यानाक्यावर गावागावातून, खेड्यातून आणि खळ्यातून ती फिरते आहे आणि जयजयकार करते आहे, "महात्मा गांधी की जय !!**

**आम्हीही त्याच यात्रेतले एक पथिक आहोत म्हणून आज आम्हीही त्याच सुरात सूर मिसळून म्हणतो —**

**"महात्मा गांधी की जय ! !"**

**--आदित्य**

---

तिने वापरलेली साडी–चोळी चंदनला कां पाहिजे होती? आपण चंदनला निर्धाराने दूर ठेवले म्हणून त्याला आपण वापरलेले कपडे जवळ पाहिजे होते का? त्या कपड्यांचेच तो लाड करीत असेल का? त्याना कुरवाळत असेल का? ते कपडे हृदयाशी धरून तर तो झोपी जात नसेल? ह्या कल्पनेसरशी लतिका लाजली. स्वतःशीच लाजली. तिची नखे लाल झाली. कानाची पाळी लाल झाली. मुख्य वाटेला लागून असलेल्या गल्लीतून कुणी तरी ओरडले,

"अरे फूल आहे फूल! गुलाबाचे फूल!" त्यावर दुसरे कुणीतरी खिदळून म्हणाले, "चांदणी म्हण चांदणी! निळ्या रंगाची चटकचांदणी!" घाणीच्या शिंतोड्यासारखे ते शब्द लतिकेच्या कानावर उडाले. ती चट्कन सावध झाली. रागाची ठिणगी तिच्या मनात पडली. तिने इकडे तिकडे पाहिले. रस्त्यावर फारसे कुणी नव्हते. काही रेंगाळत चालणारे पादचारी! मधूनच धावत जाणारी स्वयंप्रेरिका! बाकी सारी सामसूम! सायंकाळी पाच वाजताच सामसूम! पण हा रस्ता तिच्या पायाखालचा होता. वाटेवर विचकट बोलणारी माणसेही तिला अपरिचित नव्हती. मुंबईतल्या मुलींच्या हे ओळखीचेच असते. इथे धक्के सोसावे लागतात. गलिच्छ शब्द ऐकावे लागतात. ते फारसे मनाला लावून घेण्यात अर्थ नसतो. आज वाटेवर फारशी गर्दी नव्हती हेही बरेच होते. तेवढेच रोखलेले डोळे कमी! तेवढीच लगट करणारी माणसे कमी, तेवढेच लगट बोलणारे मवाली कमी! काही क्षणांतच लतिका ते शब्द विसरून गेली. पुन्हा चंदनच्या खोल्या तिच्या डोळ्यापुढून फिरू लागल्या. ह्या खोल्यात अगदी आठ पंधरा दिवसातच ती आपला संसार थाटणार होती. त्या खोल्यावर आताच ती जाऊन आली होती. चंदन नसताना एकटीच जाऊन आली होती. तिला जाणे भागच होते. चंदन जाताना तिला बिऱ्हाडाची दुसरी किल्ली देऊन गेला आणि म्हणाला—

"जमलं तर बिऱ्हाडाकडे फेरी मारून ये!" लतिकेला वाटले, त्यात जमायचं काय? हे तिचंच घर होतं. तिकडे लक्ष ठेवणं तिचे कामच होतं. चंदनच्या अनुपस्थितीत खोलीत केर साचेल, धूळ जमेल. केर व धूळ तर चंदनला अगदी खपत नाहीत. त्याच्या खोल्या आरशासारख्या स्वच्छ ठेवणं हे तिचं कामच होतं. ते काम करायलाच ती तिथे गेली होती. चंदन नसताना आज त्या खोल्यात तिनं प्रथमच पाऊल टाकलं. आणि तिचा गळा भरून आला. आजवर ह्या खोल्यात ती एकटी कधीच आली नव्हती. आणि आज ती एकटी आली, तेव्हा तिथे चंदन नव्हता. त्याच्या वस्तू तेवढ्या तिला जागोजाग दिसत होत्या. त्या तिनं एकामागून एक पुसल्या. त्याचं कपड्यांचं कपाट, पुस्तकांचं कपाट, जोड्यांचं कपाट, सारं तिनं स्वच्छ केलं. त्याच्या जोड्याना तर तिनं लकाकीसुद्धा लावली. चेहेरा दिसावा अशी लकाकी चंदनच्या जोड्याना नेहेमी असे. तशीच लकाकी तिनं त्याना दिली. ते जोडे हातात घेऊन त्याकडे ती पहात राहिली तेवढ्यात तिचं काचपात्रात ठेवलेल्या मनी प्लँटकडे लक्ष गेले. त्या पाण्यात वाढणाऱ्या वेलीला पिवळे फूल आल्यासारखे तिला वाटले. मनी वेलीला आणि फूल? तिनेच ती हिरवी वेल इथेच आणली होती. त्या वेलीकडे पहात चंदन म्हणाला होता—

"ही वेल तर इथे आली. एकटीच ती माझ्यापाशी राहणार. आता—!" त्याचे ते उच्चारलेले शब्द तिला कळले. त्या आठवणीनेही ती रोमांचित झाली. वेलपात्रातले पाणी तिने बदलले. वेलीवर फुलाचा आकार दिलेले पत्र टोचलेले होते. लतिकेने घाईने ते पहिले प्रेमपत्र वाचायला प्रारंभ केला—

[पान २०८ वर पहा]

देशात गांधी जन्मशताब्दी साजरी होत आहे



**सत्याग्रह की सततागृह ?**

अनुक्रमणिका

# अर्धांगी

कितीतरी कालानंतर ती त्याच्याकडे निघाली होती. पांढरी साडी नेसली. हातातली कंकणं काढून टाकली व ठसठशीत कुंकू लावलं. शक्य तो सोज्वळ भाव चेहेऱ्यावर आणून आरशात पाहिलं. थोडंसं खिन्न होऊनही. त्याच्याकडे जायचं म्हणजे अगदी जोगीण व्हायला हवं असं नाही. पण साधं अन् जरासं खिन्न मात्र दिसायला पाहिजे. तशी ती त्याला प्रथम भेटली होती. अन् त्यामुळेच त्यांची ओळख वाढली होती. त्याच्या धीराच्या शब्दांवर ती जगात ठामपणे उभी राहू शकली. त्याच्या आदर्शाच्या कल्पनेवर आयुष्याला आकार आणू लागली.

सूर्यकिरणांच्या तिरीपीत सूर्यफुलाने वावरावं तशी.

आरशात बघताना तिला खरोखरच खिन्न झालं. स्वतःबद्दल नाही, तर त्याच्याबद्दल अनुकंपा दाटली. ज्याने आपल्याला आधार दिला, अश्रू आवरायला व प्रावतन पत्करायला शिकवलं, सरपटणाऱ्या काळजाला आकाशातली नक्षत्रपुष्पं दाखविली—त्यालाच आता आपण दिलासा द्यायचा, याचं दुःख दाटलं. लाजही वाटली. वाटलं, यापेक्षा त्याला न भेटणं बरं ! नाहीतरी आता कुठे संबंध उरला आहे ? परवा नाही का आपण त्याला टाळलं ?—आपण टाळलं, आपण ढळलो, हे त्याला कळालं तर काय मोठं बिघडलं ? असं भेटण्यापेक्षा . . .

पदर घट्ट लपेटून ती निघाली. अट्टाहासाने, अधीरतेने. अखेरपर्यंत आपलं मन खात राहील, पाय मागे ओढील, हे तिला माहीत होतं. सुरळीत व सुखासमाधानात चाललेल्या आयुष्यात आता कसलंच वादळ नको असं तिचं थकलेलं काळीज घोकत होतं. तरी त्याची गाठ घेणं अपरिहार्य आहे हे तिला पटलं होतं . . .परवा त्याला चुकविण्यासाठी ती चर्चच्या बाजूला वळाली व क्रूसावरची येशूची आकृती तिला दिसली



....बाई, हे दिव्य आहे ! फार मोठं बळ नि काळीज लागतं अशा वेळी....तो अपंग आहे तर तुम्ही त्याच्या अर्धांगी आहात....त्याला सोडू नका तुम्ही....

तेव्हाच. . . . आज उत्तररात्री काळ्या आभाळातून उल्का पडल्याचा भास झाला तेव्हा कदाचित् . . . कदाचित् ती गेल्या आठवड्यात या गावी आली नि पूर्वीच्या जुन्या आठवणी नि खुणा तिला विलगू लागल्या तेव्हापासून. तेव्हापासूनच त्याची मूर्ती तिला दिसू लागली व अस्वस्थसं झालं. तेव्हा आपल्या नवऱ्यासाठी त्याला भेटावं लागलं; आता आपल्या संसारासाठी त्याला भेटणं भाग आहे— हे जाणवू लागलं.

पूर्वीच्या त्या ठराविक रस्त्याला ती लागली आणि तिचा उरला-सुरला संभ्रम सरला. खरीच ती हळवी झाली, आधारासाठी बघू लागली. नवऱ्याचं नांव उच्चारीत त्याचं बिऱ्हाड गाठू लागली . . .

☆ ☆

नवऱ्याचं पत्र मुठीत घट्ट धरून ती बऱ्याच वर्षापूर्वी या रस्त्याला आली होती. मधल्या सुट्टीत कचेरीतून निघाली आणि मागचं मोकळं पटांगण ओलांडून नव्या कॉलनीत आली. कुणा कुणाला विचारीत त्या वाटेला लागली. नवऱ्याने पत्रात लिहिलेल्या साप्ताहिकाच्या नांवाची पाटी तिथल्या इमारतीवर धुंडाळू लागली. त्या साप्ताहिकाच्या संपादकाला गाठण्याची घाई करू लागली.

त्या क्षणापर्यंत तिने त्या इसमाचं नांव ऐकलं नव्हतं की त्याचं साप्ताहिक पाहिलं नव्हतं. नौकरीला लागून चार पाच महिने झाले होते, पण ती कचेरीबाहेर फारशी पडली नव्हती. त्या अवाढव्य इमारतीत आपला सेक्शन व आपलं टेबल एवढंच ती जाणत होती. घरून निघे ती सरळ टेबलाशी बसे. बाकी कुठे जायची, बघायची वासनाच नव्हती. सारं जग तिच्या लेखी शून्य होतं. नवरा वारंवार स्मरण पत्रं पाठवील म्हणून केवळ नाईलाजाने ती त्याच्याकडे निघाली होती. एरवी त्याच्याकडे जायला ती राजी नव्हती. नवऱ्याने चिठ्ठी देऊन मुद्दाम आपल्याला त्याच्याकडे धाडावं हेही तिला फारसं रुचलं नव्हतं.

संपादकीय कचेरी सापडायला वेळ लागला. त्याची गाठ घ्यायलाही. कुठे बाजूच्या जुन्या इमारतीत आतल्या अंगाला ऑफीस होतं त्याचं. तिथल्या हॉलला लागून असलेल्या छोटया खोलीत तो एकाच वेळी फोनवर बोलत होता, भोवती बसलेल्या माणसांशी बोलत होता, समोरची प्रुफं पहात होता, हातातली डायरी चाळीत होता. त्या धबडग्यातच त्याने तिला आत बोलावलं व तसं बसवून ठेवलं. लंच टाईम संपत होती. ऑफीसला उशीर होत होता. बाजूचे लोक उगाच बघत होते. हातातली चिठ्ठी घामट होत होती. तिला सगळ्याचा उबग आला वाटलं, उठावं. . .

पण तेवढ्यात तो मोठ्यांदा म्हणाला, "बोला, काय काम आहे ?"

तिने न बोलता हातातलं पत्र त्याच्या पुढ्यात टाकलं.

त्याने रुक्षपणे तो कागद उचलून उलटा सुलटा केला. सही वाचली व एकदम तिच्याकडे बघून म्हटलं,

"तुम्ही ?—तुम्ही —!"

तिने मान हालवली, खाली वळवली. वरवर पत्र वाचीत त्याने विचारलं,

"कशी आहे आता शंतनूची तब्येत ?"

—अरविंद गोखले

पत्रातील विषय बाजूला ठेवून त्याने नवऱ्याच्या प्रकृतीची चव-कशी केली हे तिला आवडलं नाही. ओळखी अनोळखी लोक हा एकच प्रश्न विचारतात व विकृत कळवळ्याने पहातात. अशाना द्यायचं ठराविक उत्तर तिने देऊन टाकलं व म्हटलं,

"त्याना काय कळवू ?"

क्षणकाल तो काहीच बोलला नाही. टेबलावर फडफडणाऱ्या कागदपत्रावर जवळचा ग्रंथ टाकून खिडकीबाहेर पहात राहिला. मग तिकडेच कुठेतरी बघत म्हणाला,

"शंतनूची तीनचार पत्रं आली होती——पण मी लिहू शकलो नाही . . . एकतर कामाची गडबड, अन् दुसरं, दुसरं म्हणजे . . ."

तो थांबला व एकदम तिच्याकडे बघू लागला. ती दचकली . . . विकृत कळवळा. वरवरची हळहळ. मदत, फायदा . . . 'शंतनू शाळेत दोस्त होता माझा. त्याला मदत करणं माझं कर्तव्य आहे' दुसरं काय सांगणार? स्वतःचा अहंगंड पोसायला मग काही मदतही देऊ करणार . . . तिला वीट आला. त्या माणसाचा नि नवऱ्याचाही राग आला. अपंग अवस्थेवर मात करून नवरा काही काम मिळवू पाहातो, पैसा कमावू पाहातो, स्वतःचं परावलंबित्व व पत्नीचे कष्ट कमी करू पाहातो—या साऱ्याचं तिला एकदम काही वाटेनासं झालं. नुसतं वाटलं, काय ही वणवण; काय ही विटंबना !

पण हा माणूस एकदम वेगळा वाटला. याची नजर वेगळी होती, आवाज निराळा होता. नवऱ्याला नवी ट्रीटमेंट देणारे डॉक्टर, इथे तिला जागा मिळवून देणारे घरमालक, नौकरी देणारा साहेब, विचारपूस करणारा मावस दीर— या सर्व पुरुषांहून हा इसम अलग वाटत होता. याच्या चेहेऱ्यावर केवळ कळवळा नव्हता. याची दृष्टी शिकारी नव्हती की शिष्टही नव्हती.

"असं आहे . . . " हात चोळीत तो म्हणाला, "शंतनूने लिहिलंय तेवढी त्याची नि माझी दोस्ती नव्हती. तरी पण त्याच्यासाठी काही करायला मला आनंद वाटेल. तो चांगला खेळाडू होता नि त्याने खेळलेल्या हॉकीच्या मॅचेस् पाहायला मी धावत असे. मिलीटरी कमिशन घेऊन तो गेला तेव्हा निरोपाच्या समारंभात मी भाषण केलं होतं. हे सारं खरं—पण त्याचे लेख छापायचे नि त्याला मोबदला द्यायचा हे मात्र अवघड आहे. एक तर आमचं प्रकाशन एका विशिष्ट विषयाला वाहिलेलं आहे. शंतनूने धाडलेली कथा, त्याचा लष्करातला अनुभव, हॉस्पिटलमधलं व्यक्तिचित्र — कुठलंच आमच्या चौकटीत बसत नाही. दुसऱ्या कुणा संपादकाकडे धाडायचं त्याने सुचवलंय या चिठ्ठीत . . . पण खरं बोलायचं म्हणजे त्याचं हे लेखन फार सामान्य दर्जाचं आहे. शंतनूजवळ लेखन गुण काही दिसत नाहीत. त्याला लेखक व्हायचंही नाही. त्याला व्हायचंय मिळवता ! त्याला पैसे हवेत. पैसे देण्याची आमची तर कुवत नाही. अन् इतर कुणी प्रकाशक देईलसं वाटत नाही . . ."

ती उठली. इतकं स्पष्ट बोलणाऱ्या माणसाचे खरं म्हणजे आभार मानावेत असं वाटलं. उगाच खोटी लोभनं दाखवून कितीतरी जण



अनुक्रमणिका






फसवणूक करतात. शंतनूची–नि तिचीही ! हा माणूस परवडला. तिने कृतज्ञतेने त्याच्याकडे पाहिलं 'मी कळवते त्याना' –– म्हणून पुटपुटली. मग घड्याळाकडे पाहिलं. लंच टाईम संपली होती. भोवतालचे लोकही उगाच बघत होते. जरा घाईने–जरा रेंगाळत ती निघाली.

कचेरीकडे परतताना तिला सारखी त्याची उमदी आकृती दिसत होती. आणि नवऱ्याबद्दल अपार कळवळ्याने तिचं काळीज भरून येत होतं.

☆ ☆

त्यानंतर सुमारे महिन्याने एका संध्याकाळी ती कचेरीतलं काम संपवीत होती तेव्हा तो अचानक तिच्यासमोर उभा राहिला व म्हणाला, "आटोपलं का . . . माझं जरा काम आहे तुमच्याशी —"

ती विलक्षण दचकली. कचेरीत तिला कुणी आजवर भेटायला आलं नव्हतं. तिचा कुणाशी संबंध नव्हता, कुणाशी काम नव्हतं. ती निमूटपणे दिवस काढीत होती. कष्ट करीत होती व नवऱ्याला हॉस्पिटलमध्ये पैसे धाडीत होती. अपंग नवऱ्यासाठी जगत होती. तोच एक पुरुष तिला माहीत होता. अन्य कुणी . . . आणि हा आता समोर उभा होता. तिला बाहेरच्या मोकळ्या हवेत बोलावीत होता.

तिची छाती धडधडू लागली. त्याचं भय वाटलं नाही, पण वाटलं, काय काम काढलं याने ? आपल्या आयुष्यात आणिक काय घडतं आहे आता ? हा किती मोठा माणूस. संपादक, समाजसेवक. अन् आपण एक सुमार संकटग्रस्त स्त्री. . .की याला आपल्या दैन्याचं भांडवल करायचं आहे ? ––नवऱ्याला तिने मागेच सारं कळवलं होतं. लेखनाचा प्रयत्न सोडून द्यायचं सुचवलं होतं. वाटलं, तेव्हाच संपलं सारं, मग आता . . .

त्या संभ्रमात तिने त्याला बसादेखिल म्हटलं नाही. फायलीही धड आवरल्या नाहीत. यंत्रासारखी ती त्याच्याबरोबर गेली. कचेरीतून मागल्या मोकळ्या पटांगणात आली.

" शंतनूने हे बाड पाठवलं आहे—" हातातलं पुडकं पुढे करीत तो म्हणाला.

अभावितपणे तिचे हात पुढे गेले व मागे आले. रुक्षपणे ती काही तरी म्हणणार तेवढ्यात तोच म्हणाला,

" दीर्घकथा आहे. आत्मकथा, स्वतःच्या अपघाताची, अपंगपणाची हकीकत त्याने लिहिली आहे. स्वतःच्या संसाराची. तुमचीही. . . .चांगलं लिहिलं आहे —"

" छापणार आहात –?" तिने जरा आर्ततेने विचारलं.

" एखाद्या प्रकाशकाला देण्याबद्दल त्याने लिहिलं आहे. कुणी प्रकाशक पैसे देऊन छापीलही —"

"इतकं चांगलं आहे ?" तिला जरा बरं वाटल्यासारखं झालं.

त्याचा चेहेरा जास्तच गंभीर झाला. तिथेच एका हिरवळीच्या तुकड्यावर तो बसला. तिलाही मग टेकावं लागलं. बाजूने जाणारं एक टोळकं दूर गेल्यावर तो म्हणाला,

" तुम्ही घटस्फोट घेणार आहात ?"

तिच्या काळजाचे ठोके बंद पडल्यासारखं झालं. तिने डोळे मिटले व मग सताड उघडले. चपापून भोवती पाहिलं. मग त्याच्या हातातल्या नवऱ्याच्या हस्तलिखिताकडे ती बघत राहिली.

" माफ करा, मला तुम्हाला दुखवायचं नाही. तुमच्या खाजगी गोष्टीत डोकावायचं नाही. ह्या–ह्या आत्मकथेत शंतनूने काही गोष्टी लिहिल्या आहेत म्हणून विचारलं. हे कुणी वाचलं तर . . ."

" मी घटस्फोट घेणार म्हणून लिहिलंय् ?" तिने कापऱ्या स्वरात विचारलं.

" तसा विचार तुमच्या मनात वावरतोय म्हणून लिहिलंय . . ."

तिला फार वाईट वाटलं. तसा विचार तिच्या मनात डोकावत नव्हता असं नाही. विवाहानंतर चार वर्षातच संसाराला ग्रहण लागलं. मिलीटरीच्या नोकरीमुळे बिऱ्हाड फार काळ थाटता आलं नाही. आणि कॅंपवर हॉकी खेळताना शंतनूला अकस्मात् पक्षघात झाला. कमरेखालचं शरीर लुळं पडलं. कायमचं ! सारे उपाय थकले. सारी शिल्लक संपली. सैनिकासाठी असलेल्या कुठल्या इस्पितळात तो नवे नवे उपचार करीत जगू लागला. व्हील-चेअरवर बसू लागला. वेळ जावा म्हणून, पैसे मिळवावेत म्हणून धडपडू लागला. टायपिंग कर, लेख लिही, विणकाम शीक . . . अन् ती नाईलाजाने त्याला सोडून दुसऱ्या गावी नौकरी करू लागली. कारकुनी कमाईतून चार पैसे वांचवून म्हाताऱ्या सासू-सासऱ्याला खायला घालू लागली. आपल्या भकास भवितव्याला तोंड देऊ लागली. . . .

हे सारं त्याने जसंच्या तसं लिहिलं होतं. अन् मग अखेरीस असंही सुचवलं होतं की निराश होऊन, स्वतःच्या सुखासाठी तिने घटस्फोटाचा मार्ग धरला. कथेतली हकीकत खरी होती, अन् अखेर




ही दिवाळी सुखाची जावो !

काल्पनिक होती ! कधीतरी घटस्फोट हा शब्द तिच्या मस्तकात घुमे. शरीरसुख, संसारातला आनंद – सान्याला मुकल्याने ती मधूनच वेडीपिशी होई. आपल्या उजाड आयुष्याला नि भोवतालच्या भयंकर समाजाला वैतागली होती. न संपणाऱ्या दुःखाची, एकाकीपणाची अखेर करावी असं हळूच मनात येई. पण यापलीकडे तिने स्पष्ट विचार केला नव्हता. निर्णय घेतला नव्हता. मनातले असले विचार मनाच्या खोल तळातच गुदमरत ठेवले होते. तेवढंच, तेच नेमके नवऱ्याने हेरावेत याचं तिला दुःख झालं. अन्यायकारकही वाटलं. कापऱ्या स्वरात ती कसंबसं म्हणाली,

" त्याना लेखन जमणार नाही असं तुम्ही म्हणाला होता ते मला आता पटलं . . . काहीवाही लिहिलंय. मी तसलं काही ठरवलं नाही . . ."

तिची नजर, तिचा स्वर तो अधीरतेने टिपत होता. त्याबद्दल त्याला फार काळजी वाटत होती. तिचं बोलणं ऐकून त्याला फार बरं वाटलं. जरा मोठ्या आवाजात तो गंभीरपणे म्हणाला,

" खरंच तसलं काही ठरवू नका. घटस्फोट घेऊ नका . . . . . शंतनूला सोडू नका —"

तिने चकीत होऊन त्याच्याकडे पाहिलं. तिच्या नवऱ्याला तो काही खास मित्र मानीत नव्हता. ते पंचवीस तीस चतकोर कागद वाचून केवळ त्याला त्यांची चित्तरकथा समजली होती. त्याची नि शंतनूची कित्येक दिवसात गाठ नव्हती अन् तिला तर तो दुसऱ्यांदाच भेटत होता. तरी त्याने इतकं आत्मीयतेने सांगावं, उपदेश करावा. . .

त्याच्या डोळ्यातलं तेज पाहून ती पुन्हा चकीत झाली. असं तेज थोड्याच माणसांच्या डोळ्यात दिसतं. काही वेळाच प्रकटतं. त्या मागे कसलीशी उत्कटता असते, अभिनिवेश असतो. तो जे बोलला तेच तो डोळ्यानी बजावून सांगत होता.

हळूहळू तिला त्याच्याबद्दल आपलेपणा वाटू लागला. आदर दुणावला. त्याच्या साप्ताहिकाचा एक अंक तिने परवाच पाहिला होता. त्याची अटीतटीची मतं, जतन केलेली मूल्यं तिच्या वाचनात आली होती. ज्याला आपलं म्हणेल त्याला तो अंतर देणार नाही हे तिने ओळखलं होतं. असा पुरुष तिला आवर्जून सांगत होता, शंतनूला एकटं सोडू नको . . .

भरल्या डोळ्यानी 'नाही '— म्हणून तिने मान खाली घातली. जमिनीवर उलटच्या झालेल्या एका आळीला गवताच्या पात्याने सरळ केलं.

अंमळशाने घसा साफ करीत तो मोकळ्या स्वरात म्हणाला,

" माझी खात्री होती तुम्ही असलं काही करणार नाही. तुमचे डोळे, तुमची चालचलणूकच सांगते, तुम्ही वेगळ्या आहात ! केवळ स्वतःचा विचार करणाऱ्या नाहीत. संकटात उसळून उठणाऱ्या आहात. आपल्या माणसासाठी सर्वस्वाचा होम करणाऱ्या आहात . . .एक व्रत तुमच्या वाट्याला आलं आहे. तुमच्या पतीवर असा प्रसंग यावा ह्यात तुमची कसोटी पाहिली जात आहे . . . शंतनू मोठा मिलीटरी ऑफीसर झाला असता तर तुम्ही मजेत मिरवलं असतंत. त्याच्या वैभवात हक्काने वाटा घेतला असतात. तो आता दुर्दैवाने अपंग झालाय, अडचणीत आलाय. अशा वेळीही त्यातला वाटा तुम्ही उचलायला हवा. दुप्पट बळ आणायला हवं. त्याची साथ सोडता कामा नये. आता तर त्याला तुमची फार जरूरी आहे. तो अपंग आहे – तर तुम्ही त्याच्या अर्धांगी आहात. चार वर्षं का होईना पण संसार केला आहात . . . बाई, हे दिव्य आहे ! फार मोठं बळ नि काळीज हवं अशा वेळी. फार थोड्याना हे साधतं. पण तेच जग तारतात. माणुसकी जिवंत ठेवतात. आजकाल सगळाच उथळपणा दिसतो. क्षुद्रता, स्वार्थी, उपभोग . . . तुम्ही तरी . . ."

—— स्वतःच्या वैवाहिक जीवनाच्या कहाणीचे कागद घेऊन ती घरी परतली. प्रथमच अंधार पडल्यावर अशी परतली. पर पुरुषाबरोबर एवढा वेळ बोलत राहिली. सासू-सासऱ्यांना टाळून दिवा जाळीत ते हस्तलिखित वाचीत राहिली. शंतनूसारख्या मिलीटरी माणसाने बायकोबरोबर काढलेले दिवस रसिकपणे रंगवले होते. त्या अपंग पुरुषाने आपला एकाकीपणा जीव ओतून उतरवला होता. सारं वाचताना ती जणू ते सुखाचे क्षण परत जगली. अन् मग त्याच्या वेदनानी व्यथित झाली. नवऱ्याची तिला उत्कटतेने ओढ लागली. मिलीटरी हॉस्पिटलमध्ये मोफत उपचार होतात म्हणून बायकोपासून दोनशे मैल दूर राहायचं याला काय अर्थ आहे ? उपचारांचा उपयोग होत नाही. खर्च नि कष्ट मात्र वाढतात. अन् असले विकल्पही !














## रात्रीस चंद्रम्याची देशील साद का रे

**मी गीत गाइलेले तू ऐकशील का रे**
**रात्रीस चंद्रम्याची देशील साद का रे**
**घेऊन प्राण कंठी बघते दहा दिशांना**
**सांगू व्यथा कशी या मंदावल्या दिव्यांना**
**जपते तुझ्याचसाठी निश्वास-श्वास सारे**
**रात्रीस चंद्रम्याची देशील साद का रे**
**आले मनास फूल, हुरड्यास देह आला**
**व्यर्थी तुझ्यामुळे रे शब्दांस अर्थ आला**
**शून्यात अन् सख्या रे, आले नभास तारे**
**रात्रीस चंद्रम्याची देशील साद का रे**
**तू वाट पाहतोस विश्वास हा मनात**
**अंधार दूरता ये नाहून अमृतात**
**मग लांब वाट होते वाहू तुझा मला रे**
**रात्रीस चंद्रम्याची देशील साद का रे**

**— कान्त**

डोळे वाहू देत ती जळत्या दिव्याच्या साक्षीने त्या पुरुषाला पुन्हा पुन्हा आश्वासन देऊ लागली, नाही—मी पतीचा त्याग करणार नाही . . . त्याना सोडणार नाही . . .

☆ ☆

त्यानंतर कितीतरी दिवस तिला वाटत राहिलं की तो पुरुष परत आपल्याला भेटायला येईल. अचानक ऑफीसमध्ये येऊन उभा राहील. एखादे वेळी रस्त्यात गाठेल. कदाचित् घराजवळ दिसेल. कचेरीत कित्येकदा दचकून ती वर पाही. पट्टेवाला आला, साहेबाने घंटी वाजवली, कुणी मोठ्यांदा खोकलं की तिला वाटायचं तोच आला ! . . .घरी जाता येता ती रस्त्यावर त्याची चाहूल घेत चाले. सकाळी संध्याकाळी खिडकीतून बाहेर पाही. तो दिसेल, तो येईल असं उगाचच वाटे . . . पण तो काही आला नाही. पुन्हा भेटला, दिसला नाही.

मग तिच्या लक्षात आलं की तो उगाच आपल्याकडे येणार नाही. सहजासहजी कुठे दिसणार नाही. साप्ताहिकाच्या, संघटनेच्या, समाजसेवेच्या—कितीतरी कामात तो सतत गुंतलेला असणार. लेखन, चर्चा, सभा, दौरे यात गर्क असणार. असा थोर पुरुष आपल्यासारख्या क्षुद्र स्त्रीकडे मुद्दाम कशाला येईल ?— तेव्हा आला ते सुद्धा काही एक काम होतं म्हणून. एका संभ्रमात पडलेल्या, कर्तव्य विसरणाऱ्या विवाहित स्त्रीला मार्ग दाखविण्यासाठी, संदेश देण्यासाठी, आपल्या रोजच्या अडीअडचणीत त्याला गम्य नव्हतं. आपण आपलं प्राक्तन स्वीकारलं पाहिजे, व्रत सांभाळलं पाहिजे एवढाच त्याचा हट्ट होता.

. . . बाई, हे दिव्य आहे ! फार मोठं बळ नि काळीज लागतं अशा वेळी . . . तो अपंग आहे, तर तुम्ही त्याच्या अर्धांगी आहात . . . शंतनूला सोडू नका तुम्ही . . . .

त्याचा तो बजावणारा, भारावलेला आवाज तिला ऐकू येई. अन् मग त्याची धीरगंभीर आकृती आठवे. रोजच्या कटकटी कंटाळ्यातून तिचं काळीज वर उचललं जाई. कसलासा आधार वाटे. कशात तरी अर्थ वाटे. हा देव माणूस आपल्याला भेटावा व त्याने आपल्याला धीर द्यावा ह्या जाणीवेने ती भारावून जाई. तो म्हणाला ते केवढं मोलाचं होतं ! सत्य होतं ! नवरा नीट असता, वैभवात असता तर त्यात आपण वाटा मागितला असता. प्रेमाचं—मायेचं स्तोम माजवलं असतं. आता तो . . . . अन् आपल्यावर असं अरिष्ट ओढवलं असतं तर ? . . . सगळं सुरळीत असतं तर आपण आपल्या सहचराला सोडलं नसतं. अक्षय सोबतीच्या शपथा घेतल्या असत्या. घेतल्याच होत्या ! – बोहल्यावर, पहिल्या रात्री, आपण माहेरी जाताना व तो मिलीटरी कँपवर गेला तेव्हा . . त्या शब्दाना, आलिंगनाना हाच का अर्थ ? छे: —कष्ट, दुःख, संकटं काही असलं तरी शंतनूला सोडता कामा नये. उलट त्याला धीर दिला पाहिजे, धरून ठेवलं पाहिजे. त्याच्या बरोबर, त्याच्यासाठी आपल्या वासना नि भराऱ्या आवरून ठेवल्या पाहिजेत.

. . .नाही, नवऱ्याला सोडणार नाही . . . सोडू देणार नाही—– ती मनात, मोठ्यांदा म्हणे, निजताना, उठल्यावर, आंघोळ करताना, देवपूजा करताना, रस्त्याने जाताना, कचेरीत गेल्यावर. मनाची मरगळ काढून टाकायला धडपडे. विचार विकार दाबून टाकी. आपली धडपड यशस्वी व्हावी म्हणून त्याची आठवण काढी. ध्रुवताऱ्यासारखा तो तिच्या काळोख्या जीवनात काळजातली ज्योत तेवत ठेवीत होता.

तेवढ्या बळावर ती मग शंतनूला पत्रं लिही. पूर्वीपेक्षा अधिक मोठी, माहितीपूर्ण. स्वतःची, सासू-सासऱ्याची सविस्तर हकीगत कळवीच, पण इतरही मनोरंजक मजकूर लिही. नव्या औषधोपचारांची, डॉक्टरांची नि इतर रोग्यांचीही चौकशी करी. धीर देई, आश्वासनं देई. नवऱ्यावद्दल ओसरत जाणारं तिचं हृदय परत त्याच्या ओढीने उचंबळू लागलं. शंतनूला साथ द्यायला, त्याच्यासाठी वाटेल ते करायला ती सरसावू लागली . . . अगदीच असह्य झालं तेव्हा तिने त्याला हॉस्पिटल सोडून इकडे यायला सुचवलं. उपचारांची काहीतरी सोय करू– पण वस झालं दूर राहाणं !

अन् मग तिच्याकडे येण्याऐवजी अगर तिला तसंच उत्तर देण्याऐवजी शंतनू गप्प झाला. वरेच दिवस पत्र लिहीना की भेटायचंही ठरवेना. तिला त्याच्या वागणुकीचा अर्थच समजेना. त्याचा आजार,










अपंगत्व वाढलं तर नाही ? ती भेदरली. अधिकच अधीरी झाली. तार करायला, भेट घ्यायला सिद्ध झाली.

त्याच वेळी तो परत तिच्या कचेरीत आला.

त्याला येताना बघून तिच्या छातीत धडधडलं. त्याच्या दर्शनाने धीर यायचा — पण वाटलं, काहीतरी संकट आलं. नवऱ्याने काहीतरी घोटाळा करून ठेवला. पुन्हा आपण उगाचच व्यामोहात सापडणार —

तो तिच्या टेबलाशी उभं राहून जरासं हसत म्हणाला,

" ओळखलत का ? —– माझं काम आहे तुमच्याशी—– मागच्या सारखंच."

ती काही बोलली नाही. हसलीही नाही. हातातला टाक उघडया फायलीवर टाकून त्याच्या मागोमाग मागल्या पटांगणात आली. ऊन होतं व हिरवळही दिसत नव्हती. तरी दिसेल त्या एकीकडच्या जागी वसली.

तो तिच्यासमोर वसत म्हणाला,

" शंतनूचं काल पत्र आलं आहे मला . . . "

पुढे केलेलं पत्र तिने तोल सावरीत घेतलं. सुवाच्य अक्षरात स्पष्ट लिहिलेला मजकूर वाचताना तिला अंधेरी आल्यासारखं झालं. शंतनूने परत त्याला स्वतःची व्यथा लिहिली होती. आता आत्मकथा नाही तर आवाहन होतं. पत्नीची माया नि धडपड पाहून तो वावरला होता. त्या तरुण मुलीने आपल्यासाठी झिजावं, आपली काळजी करीत सुखविहीन, एकाकी आयुष्य कंठावं ह्याने तो कासावीस झाला होता. एका अपंग जीवनाशी दुसरं एक उभारीचं जीवन जखडलं जाणं त्याला अन्यायकारक वाटत होतं. ह्या दुर्दैवातून सुटका करण्याचा एकच मार्ग त्याला दिसत होता. फारकत. घटस्फोट ! वायकोला मोकळी करायची, नवं आयुष्य थाटायला मुभा द्यायची . . . शंतनू तिला तसं आडून सुचवीत होता, पण तिला समजत नव्हतं. वेळ जात होता, वय वाढत होतं. तिने लवकर सोडचिठ्ठी घेणं इष्ट होतं. शंतनू तयार होता. तिला तयार करणं जरूर होतं . . . त्यासाठी शंतनूला त्या मित्राची मदत हवी होती. तिला समजावून, वकीलाला सांगून . .

"छे, छे, काय हे भलतं ! भयंकर ! मला नवीन, निराळं आयुष्य नकोच. मी समाधानात आहे, सुखी आहे. त्यांच्याशिवाय . . ." ती आवेगाने म्हणाली. आपलं म्हणणं त्याला पटलं का वघू लागली.

तो बराच वेळ बोलला नाही. तिने खाली टाकलेल्या पत्राची घडी करून परत ठेवू लागला. जमिनीवरून जाणारी मुंग्यांची रांग गवताच्या पात्याने अडवीत राहिला.

तिला ती शांतता असह्य झाली. हा नवऱ्यासारखंच सांगणार की काय आपल्याला ? हा—फार मोठी मूल्यं मानणारा. सहचरासाठी जीव गहाण टाकण्याच्या वृत्तीची पूजा करणारा. स्वतः पूजनीय. पुढारी.

अंमळशाने तिच्याकडे न पाहाता तो म्हणाला,

"शंतन पराकाष्ठेचा निराश झालेला दिसतो आहे. स्वतःचं शरीर अर्धमुर्धं गमावल्याने आता आपली बायकोही सोडायला सिद्ध झाला

[ पान ९८ वर पहा ]

अनुक्रमणिका



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# पन्नास रुपये वसूल झाले, त्याची गोष्ट

जयवंत दळवी

सावंतवाडीच्या बापूसाहेब चिटणीसांशी आमचा घनिष्ट घरोबा. आता ते निवृत्त होऊन सावंतवाडीस राहातात. तसा नेकीचा आणि करारी माणूस! ते मुंबईस पी. एम्. जी. च्या ऑफिसात सुपरिंटेंडंट होते. त्या काळात मी स्वतः पोस्टात चिकटलो तो त्यांच्याच वशिल्याने! पाकिटावर एक एक आण्याचा स्टँप चिकटवावा तसे त्यांनी सावंतवाडीचे वरेचसे सारस्वत पोस्टात चिकटवून दिले होते. लायकीचे अथवा नालायकीचे शिक्के घेत त्यातले वरेचसे स्टँप अद्याप यथाशक्ती चिकटून आहेत. असोत विचारे. त्यातलाच मी एक!

दोन दिवसांपूर्वी बापूसाहेबांचं सावंतवाडीहून पत्र आलं. त्यांनी पत्रात एखादं काम लिहिलं की मी ती आज्ञा समजून पार पाडतो. नाही म्हटलं तरी आपण जुने उपकार स्मरले पाहिजेत.

**पोस्टातून अर्धा दिवस रजा काढून मी बापूसाहेबांच्या कामावर निघालो.** त्यापूर्वी पुनः एकदा त्यांचं पत्र वाचून काढलं.

'. . . गिरगावातल्या बोरभाट गल्लीत सीतावाईची चाळ आहे. तिचे नाव आता बदलले असल्यास कल्पना नाही. त्या चाळीत तळ मजल्यावर चिटकोबा रेडकर राहातात. त्यांनी दहा वर्षांपूर्वी माझ्याकडून पन्नास रुपये उसनवारीने घेतले होते. ते आजपावेतो त्यांनी परत केलेले नाहीत. तरी तत्परतेने लक्ष घालून आपण ही वसुली करावी आणि रक्कम मनीऑर्डरीने माझ्या नावे रवाना करावी. पन्नास रुपये ही तशी किरकोळ रक्कम आहे. मला रकमेचे महत्त्व वाटत नाही. पण मला कोणी फसविले, ठकविले तर ते सहन होत नाही. हे पन्नास रुपये वसूल न करता यदाकदाचित मी मेलो तर तेवढ्यासाठी माझा आत्मा मागे घोटाळत राहील. पुनः लिहितो पैशासाठी नव्हे, पण मी फसलो, ठकलो म्हणून! **तरी न चुकता एवढी वसुली करावी . . . आपला बापूसाहेब चिटणीस.'**





अनुक्रमणिका

**"....... यानं माझ्याकडून दहा वर्षांपूर्वी पन्नास रुपये उसने घेतले होते, ते परत केले नाहीत ....... ही रक्कम तशी किरकोळ आहे, पण कोणी फसविलं, टकविलं, तर ते सहन होत नाही; म्हणून न चुकता ही रक्कम वसूल करावी ......." हे पत्र मी वाचलं आणि....**

पत्र खिशात टाकून मी बस पकडली आणि बोरभाट गल्लीत आलो. तिथं चौकशी करता सीताबाईची चाळ सापडली. मला पहिली फेरी जिंकल्यासारखं वाटलं. चाळीच्या दारात जाताच मी चिटकोबा रेडकरांची चौकशी केली. तेव्हा दोन पोरानी पैरणीचं टोक चावत कोपऱ्यातली खोली दाखवली. मी त्या खोलीच्या दारात उभा राहिलो. खोलीचं दार उघडंच होतं. मी दारावरची कडी वाजवली. तेव्हा दाराच्या बाजूला बसलेली एक स्थूल बाई डोकं पुढं काढून म्हणाली,

"कोण रे?"

"मी!"

"आग लागो तोंडाला! मी म्हणजे कोण नाव गाव नाय?"

"मी गंपू सवनीस–" मी खट्टू होत म्हणालो.

"पायजे कोण?"

"चिटकोबा रेडकर–"

"आलायसा कोठून?"

"इथूनच..."

"या.. आत या... बसा..." असं म्हणत ती बाई पानाचा डबा लोटत पुढं सरकली. सकाळी अकराच्या टाइमाला ही बाई पान खात होती. तेवढ्या टाइमात तिनं आंघोळ केली असती तर! अशी दिसत होती की गेल्या चार दिवसात तिनं अंगाला आणि कपड्याना पाणी लावलं नव्हतं. त्या खोलीतल्या भकास दिसणाऱ्या जुनाट संसाराकडे, अस्ताव्यस्त विखुरलेल्या चीजवस्तूंकडे पाहात असताना त्या बाईनं एकदम विचारलं,

"पान खाणार हो, सवनीस?"

"मी नाही खात..."

"नका खाऊ! सगळ्यांनाच ते आवडतं असं नाही–" असं म्हणत ती स्थूल बाई सारं अंग हालवीत हसली. पानानं चिकचिकलेल्या हिरड्या दाखवीत हसली. हसताना तिनं लालबुंद फवारा सुद्धा उडवला.

"आमची ही गेल्या तीस वर्षांची सवय..." असं सांगत ती पुन: हसली.

बाई पंचेचाळीस वर्षांची असावी. पण तिच्या हसण्यात कसलंही प्रौढत्व नव्हतं. ही चिटकोबाची बायको असावी काय? असा विचार करीत मी विचारलं,

"चिटकोबा घरी आहेत?"

"जरा दम खा!"

असं तिनं म्हणायला आणि आतून कुणी तरी सारखी खडाखडा संडासाची साखळी ओढायला एकच गाठ पडली.

"अहो, कसली साखळी वढता? ती काय आगगाडीची साखळी आहे? तुम्ही या बाहेर! पाणी यायच्या वेळी येईल.." असं म्हणत ती हिरड्या दाखवीत पुन: हसली.

तिचं ते हसणं पाहून मी अस्वस्थ होत होतो.

"तुमच्याकडे पाणी येतं?"

"दुपारी दोन तास येतं!" मी सुकलेल्या आवाजात म्हणालो.

"मी संडासाच्या पाण्याचं विचारतेय हो–" असं म्हणून ती पुन: तशीच हसली.

तिचं हसणं पाहून क्षणभर मला वाटलं, आपणही तसंच पान खाऊन तोंड पेचत हसावं.

तेवढ्यात पन्नाशीकडला एक हाडकुळा म्हातारा आतून बाहेर आला. आपले ओले हात टकलावर उलटे सुलटे पुसले. धोतराचा सोगा वर करून ओलं तोंड पुसलं आणि तो तेलात बुडवून काढल्यासारख्या दिसणाऱ्या आरामखुर्चीत लवंडला.

"तुम्हाला काय विचारायचं ते विचारा याना–" असं म्हणत ती पुन: हसली. चांगलं दाभण घेऊन या बाईचे ओठ शिवून टाकायला हवेत. पुन्हा जन्मात हसणार नाही.

"हे कोण?" त्या म्हाताऱ्यानं आपल्या बायकोला विचारलं.

"ते तुमीच त्याना विचारा–" असं म्हणत ती पुन: हसली. चूप! साली पुन: पुन: हसते. मी मनातल्या मनात तडकलो.

"आपण कोण?"

आढ्यावर लावलेली नजर जमिनीवर आणीत त्यानं विचारलं.

"मी गंपू सवनीस–"

ऐकताना त्यानं पुन: डोकं वर केलं आणि बुबुळं गरगर फिरवीत नजर खाली आणीत म्हटलं, "अस्सं!"

"आपल्याला भेटायला आलोय!"

पुन: तेच! डोकं खाली करीत तो म्हणाला, "अस्सं!"

"काम असं होतं..." पैशाचं बोलायचं म्हणजे मला आवंढा गिळावा लागला.

तेवढ्यात तो "अस्सं–" म्हणून मोकळा झाला.

"सावंतवाडीहून बापूसाहेब चिटणीसांचं पत्र आलं होतं–" त्यानं मध्येच 'अस्सं' म्हणण्याच्या आधी घाई करीत मी पुढं म्हणालो, "तुम्ही त्यांच्याकडून दहा वर्षांपूर्वी पन्नास रुपये उसने घेतले होते. ते त्यानी वसूल करायला सांगितलंय. हे त्यांचं पत्र!"



**चिटकोबाच्या इरसाल बायकोला 'बळी' पडलेला दत्तु नाडकर्णी.**

तो वरची नजर खाली आणीत 'अस्सं–' म्हणता म्हणता मी वापूसाहेबांचं पत्र त्याच्या हाती दिलं. 'अस्सं' न म्हणता ते त्यानं वाचलं. आणि, 'सगळा मूर्खांचा बाजार' असं सुचवीत तो हसत राहिला. तो हसतो म्हणून हिरड्या दाखवीत त्याची वायकोसुद्धा हसत राहिली. आता काय करावं हे न समजल्यामुळे क्षणभर मीही हसत राहिलो.

"तुम्ही कशाला हसताय?" त्यानं एकदम विचारलं. तसा मी चावी संपल्यासारखा गप्प झालो.

"आम्ही हसतोय आमच्या कर्माला!" असं म्हणत त्यानं पुनः आढ्याकडे पाहिलं.

"काय झालं?" तिची चावी चालूच होती. ती हसतच होती.

"हे चिंता करताहेत आपल्या पन्नास रुपयांची! आम्ही चिंता करतोय आमच्या दहा हजार रुपयांची!" असं म्हणत तो म्हातारा गंभीर झाला.

"तर हो काय–" असं म्हणत तिनं स्वतः करायला सुरवात केली.

मी भ्रम झाल्यासारखा बघत राहिलो. हे सगळं काय चाललं होतं तेच माझ्या डोक्यात येत नव्हतं.

"आता हा चिटकोबा–" तो म्हणाला, "माझे दहा हजार रुपये घेऊन गेला. पण खोली अद्याप नावावर नाही."

"म्हणजे आपण चिटकोबा नव्हेत?" माझं तोंड उघडं पडलं!

"अरे कर्मा!" असं म्हणत ती पुनः चावी दिल्यासारखी हसू लागली.

"तो अधून मधून इथं येतो. आला म्हणजे मी सांगेन त्याला–" असं म्हणत तारमास्तरासारखा तो आपल्या टकलावर कडकट्ट बोटं आपटू लागला.

"मग ते पत्र द्या–" असं मी म्हटलं.

ते पत्र देत तो म्हणाला, "पत्र फार छान लिहिलंय–"

"कां?"

"त्यांनी म्हटलंय ते खरं! पन्नास रुपये गेल्याचं दुःख नाही. पण कुणी ठकवलं हे सहन करणं कठीण! चिटणीसांच्या जागी मी असतो तर मीही असंच लिहिलं असतं..."

"तर हो काय? भल्याभल्यांना फसवायचं म्हणजे काय?" ती म्हणाली.

"अस्सं–" इथं काही कारण नसताना तो अस्सं म्हणाला याचा मला राग आला.

"बरं तर! मी निघतो–"

"बसा.. बसा! या निमित्तानं आपली भेट झाली. आपण कुठले?"

"मीही सावंतवाडीचा–"

"एवढ्यासाठी मुद्दाम आलात?"

"छे! मी इथं पोस्टात असतो!"

"अस्सं!"

"तुम्ही भावंडं किती?" तिनं विचारलं.

"आम्ही दोघं – धाकटी वहीण."

"अस्सं–"

"लग्न झालंय तिचं?" तिनं विचारलं.



अनुक्रमणिका

"हो! रांगणेकरांकडे–"

"रांगणेकर? कुठं राहातात?" त्यानं विचारलं, आणि आपले डोळे पिचपिचे केले.

"लॅमिंग्टन रोड पोलीस ठाण्या-समोर . . ."

"म्हणजे टोपीवाल्याच्या चाळीत?"

"होय!"

"अस्सं. .अस्सं. . .म्हणजे आपले ते रांगणेकर. . ." भुवया दावीत तो विचार करू लागला. त्याला नेमकं नाव सुचत नव्हतं.

"मोहनराव रांगणेकर! फिलिप रेडि-ओत . . ."

"आलं. . आलं. . आलं. . लक्षात आलं. ."

"तो मोहन? तो तुमचा मेवणा? अरे कर्मा?" असं म्हणत ती पुन: हसली.

"ओळखता?"

"म्हणजे हो काय? आमच्या नात्यातले ते. . त्यांची बहीण. . ."

"त्यांना बहीण नाही. . ."

"कोण ती. . . ?" तीही भुवया आक्रसू लागली.

"त्याची चुलत बहीण असेल. . ."

"माहीत आहे. . पण तिचं नाव. . तोंडावर येतंय. ."

"शालू. . ."

"बरोबर शालू. . माझ्या तोंडावर येत होतं मालू. . ."

"ती देशपांडेकडे दिलीय. . " मी म्हटलं!

"सांगताय काय? तो माझा मावस भाऊ! माझ्या आईनं वाढवलाय. ."

हे सगळं बोलणं चालू असताना तोही काही तरी आठवायचा प्रयत्न करीत होता. काही आठवलं नसावं. म्हणून तो म्हणाला, "कोण तो?"

"देशपांडे हो! ती शालू. . . तिच्या चुलत भावाला यांची बहीण दिलीय. ."

"अस्सं. . म्हणजे हे सबनीस आमच्या नात्यातलेच!" असं म्हणून त्यानं नातं सुद्धा प्रस्थापित केलं.



चिटकोबाची बालरत्ने गंपूकडून दोन-दोन रुपयांची खरी कमाई उपटीत आहेत.

"तुमच्या वहिणीचं नाव काय?" तिनं विचारलं.

"घरचं सुनंदा!"

"घरचं सुनंदा ते काय मला माहीत नाही? मी माहेरचं विचारल्येय!"

"माहेरचं कुंदा!"

"होय. . होय. . म्हणाली होती."

"ओळखता तुम्ही कुंदाला?"

"अरे कर्मा! ओळखता म्हणजे काय? जवळच्या नात्यातली माणसं! तुम्ही आलात मघाशी तर तीच आली असा भास झाला मला." असं म्हणत तिनं हिरड्या-तला चोथा सोडवला.

"तुम्हालाही रांगणेकरांकडे पाहिलंय मी." असं तो म्हणाला.

"तुमचं नाव काय?" मी त्याला विचारलं.

"रेडकरच! दाजीबा रेडकर! पण त्या चिटकोबाचा नुसता वारशी!"

"अस्सं!" मीही चुकून त्या रेडकरा-सारखा बोलून गेलो.

तेवढ्यात लांडी खाकी विजार आणि खाकी शर्ट घातलेला एक चौदा पंधरा वर्षांचा पोरगा आला आणि कोपऱ्यात उभा राहिला. माझ्याकडे बघत आपल्या नाका-वरून मनगट ओढू लागला.

त्याच्याकडे बघायची शिक्षा नको म्हणून मी म्हटलं, "बरं, मी जातो–"

"कुठं?" तिनं विचारलं.

"आता हापिसात जायचंय–"

"हापिसात जा तुम्ही. पण आता तुम्ही जेवून चला!"

"छे–छे!"

"छे–छे काय?" ती लाडात येऊन म्हणाली, "तुम्हाला जेवायला घातल्या-शिवाय पाठवलं तर मग रांगणेकरांच्या घरी आम्हाला जायला नको!"

"जेवण तयारच आहे. . तुम्ही जेवूनच जा! तू ताट ठेव बघू. . ." असं तो म्हणाला.

जमिनीला हात टेकत ती उभी राहिली आणि आतल्या खोलीत जाता जाता म्हणाली, "सबनीस, तुम्ही कोट–टोपी काढून ठेवा! दोन मिनिटात वाढते मी!"

तेवढ्यात बाहेरून दहा बारा वर्षांची एक शेंबडी पोरगी आत आली. आणि राणीच्या बागेतल्या प्राण्याकडे पाहावं तशी माझ्याकडे पाहू लागली.

"अरे गंपू–" तिनं आतून हाक मारली. मी तावडतोब ओ दिली.

"तुम्ही नाय हो–" ती आतून म्हणाली, "आमच्या मुलाचंही नाव गंपूच!"

"काय ग?" गंपूनं पुन: नाकावर मनगट घासलं.










"तारा कुठं मेली रे ?"

"ही काय इथं आहे ?"

"अरे, स्कावटाचे कपडे करून कमाईचे पैसे घ्या मामांकडून! मामा ते तुमचे . ."

त्यासरशी ती दोन्ही पोरं सरसावली. गंपूनं तुमानीची बटणं सोडून खमीस आत खोवलं. तारानं त्याच परॉकवर एक ढगळेवजा विटलेला निळा झगा चढवला. आणि ती दोघं पोरं माझ्यासमोर येऊन 'हुश्शार' होऊन उभी राहिली. तीन बोटांनी खाडकन् सलाम ठोकले. आणि एकसाथ म्हणाली,

"काम सांगा–"

"कसलं काम?" मी गोंधळून विचारलं. आधी आपली खोली झाडा असं सांगावसं वाटलं.

"मामांचं तुम्ही कसलं काम करणार ? स्कावटाचे दोन दोन रुपये मागा. बुकात लिहून घ्या. नाय तर मास्तर झोडपतील." आतल्या खोलीत ताटांची आदळआपट करीत ती बोलत होती.

स्काऊटच्या चोपडया घेऊन ती पोरं पुन: जवळ आली. गंप्यानं एक मळकं फडकं आणलं, आणि म्हटलं, "काम सांगा–"

हे सारं चालू असताना म्हातारा आरामखुर्चीत पडल्या पडल्या झोपला होता. आणि मोठ्यानं घोरतही होता.

"काम सांगा. स्काऊटानं काम केल्याशिवाय पैसे घ्यायचे नसतात." असं गंप्या म्हणाला.

मी मनात म्हटलं, काम हवं ना ? मग तुझ्या बापाला जागं कर. फार मोठ्यानं घोरतोय.

पण तेवढ्यात गंप्या खाली वाकला आणि माझ्या बुटावर फडकं मारू लागला. पण त्या भिकार फडक्यामुळे माझ्या पँटीवर कोळिष्टकं चिकटली.

"पुरे . . पुरे . . ." म्हणत मी खिशात हात घातला आणि नोटा बाहेर काढल्या.

"दोन रुपये–" असं म्हणत त्यानं पुस्तक माझ्या हाती दिलं. त्यात दोनाचा आकडा टाकून मी सही केली. दोन रुपये घेऊन गंपू आत गेला.

"काय काम करू ?" ताराबाई सामोरी आली.

पोरी स्वच्छशी आंघोळ कर असं सांगावसं वाटलं !

पण ती पोरगी आळशी असावी. तिनं काही काम न करता पुस्तक पुढं केलं आणि देणेकऱ्याकडे मागावेत तशी ती दोन रुपये मागू लागली.

फटक्यासरशी बालवीर चळवळीसाठी झक्कत चार रुपये गेले.

"चला जेवायला–" असा आतून तिचा आवाज येताच माझ्याआधी म्हातारा रेडकर उठून उभा राहिला. क्षणापूर्वी जबरदस्त घोरणारा हा माणूस योग्य वेळी कसा जागा झाला याचा मला अचंबा वाटला.

"कोट खुंटीला लावा–" असं तो म्हणाला.

मी खुंटीवर कोट लटकावून रेडकराबरोबर आत गेलो, आणि जेवायला बसलो. रेडकरीण हसली तर ताटात फवारा उडेल या भीतीनं मी आक्रसलो होतो. पण सुदैवानं ती हसली नाही. मी आणि रेडकर जेवत राहिलो. जेवण तसं यथातथाच होतं. पण रेडकराचे भुरके नामी होते. भुरका मारला की घशातून हात ओढून काढल्याचा भास होत होता.

"आता सुनंदा आली की तिला सांगेन, तुझा भाऊ जेवून गेला म्हणून–" असं म्हणत ती चिकट भात पानात झाडू लागली.

पहिला भात जेवून झाल्यावर ताकाच्या भातासाठी वाट बघत होतो. तेवढ्यात रेडकर म्हणाला, "तुमचं झालं तर तुम्ही उठा! तुम्ही जेवलाच नाहीत. तारू, याना हात धुवायला पाणी दे!"

नाईलाजानं मी उठलो. म्हणजे उठावंच लागलं.

हात धुवून कोट चढवला – आणि चुळबुळत बसून राहिलो.

आतून भराभर भुरक्यांचे फटके बसत होते. ते ऐकत स्वस्थ बसलो.

थोड्या वेळानं रेडकर ढेकर देत बाहेर आला. हात–तोंड धुवून आरामखुर्चीत बसला. त्यानं डोळे मिटले. आता एका क्षणात हा घोरू लागेल. या भीतीनं मी उठून उभा राहिलो.

"ऐकलंत का ? सबनीस निघाले . ." रेडकर आपल्या बायकोला म्हणाला.

"निघालात ? असेच या पुन:! येणं जाणं केल्याशिवाय नाती वाढणार कशी?" असं ती स्वयंपाकघराच्या दारात उभी राहून म्हणाली.

मी "हो" म्हटलं आणि रेडकराला नमस्कार करताना पुनः आठवण करून दिली, "चिटकोवा आले कधी, तर त्यांना बापूसाहेब चिटणीसांच्या त्या पन्नास रुपयांची आठवण करा. किंवा त्याचा पत्ता मिळाला तर..."

"असल्या माणसांना पत्ते कुठं असतात?" तो घोरल्यासारखा बोलला.

"पण निदान भेटले चिटकोवा तर त्याना आठवण द्या!"

"निश्चित! तुम्ही निर्धास्त राहा!"

नमस्कार करून मी बाहेर पडलो. चाळीतली बायका–मुलं डोकावून डोकावून मला बघत होती. कुठल्याही जुन्या चाळीचा हा एक गुणच आहे!

घड्याळात पाहतो तो दीड वाजला होता. दोन वाजेपर्यंत ऑफिसात पोचायचं होतं. म्हणून घाईघाईनं ठाकुरद्वारच्या नाक्यावर आलो आणि धावत धावत गर्दीत घुसून एकदाची बस पकडली. तिकिटासाठी कंडक्टर आला. दहा पैशाची दोन नाणी काढून तिकिट घेतलं. तिकिटाची सुरळी करीत मी विचार करू लागलो. चिटकोवा कसा दिसत असेल, कुठं सापडेल? आणि सापडून तरी उपयोग काय? जो दाजीवा रेडकरांच्या दहा हजार रुपयांची पर्वा करीत नाही तो बापुसाहेबांच्या पन्नास रुपयांची कां पर्वा करील? तथापि आपले दहा हजार रुपये बुडत असतानासुद्धा दाजीवा रेडकर बघता बघता झोपू शकतो, घोरू शकतो याचं मला कौतुक वाटलं.

मी ऑफिसात आलो आणि टेबलाशी बसून बापूसाहेब चिटणीसाना काय लिहावं याचा विचार करू लागलो. त्यांचं पत्र काढून पुनः एकदा वाचत बसलो. तेवढ्यात दत्तू नाडकर्णी आला. म्हणाला, "सकाळी कुठं गला होतास?"

"बापूसाहेब चिटणीसांचं एक काम होतं!"

"पन्नास रुपयांची वसुली! होय ना?"

मी एकदम चमकलो! आणि विचारलं, "तुला कसं कळलं?"

"सहा महिन्यांपूर्वी बापूसाहेबांनी मला हेच काम सांगितलं होतं. त्यापूर्वी तेच काम चितू पाडगांवकराला... त्यांनी पोस्टात ज्याना ज्याना चिकटवलं त्या सर्वांना याच एका कामावर सोडायचा त्यांचा विचार दिसतोय..."

"हे मला ठाऊक नव्हतं. मी आपला आज जाऊन आलो."

"मग? रेडकर भेटला असेल? आणि त्याची ज्याम हसणारी बायको?"

"हो!"

"आणि त्यांच्या पोरानी स्काऊटचा ड्रेस करून सलाम ठोकला की नाही?"

"सलाम? वर आणखी दोन दोन रुपये काढले!"

"दोन अं? म्हणजे स्काऊटचाही भाव



अनुक्रमणिका

वाढलेला दिसतो. पाडगांवकराकडून एक रुपया घेतला होता, माझ्याकडून दीड रुपया. . . ''

''पण पैसे स्काऊटलाच जातात ना?'' मी विचारलं.

''हट्! या पोरांचं हे वर्षभर चाललेलं असतं!''

''च्यामारी!'' मला एकदम पश्चात्ताप झाला. चार रुपये गेले म्हणून नव्हे! तर त्या पोराना वाईट वळण लागतं म्हणून!

''आणि नात्यागोत्याची चौकशी करून तुझ्याशी आपलं नातं त्यानी जुळवलं की नाही?''

हे दत्तू नाडकर्णीनं विचारताच मी आणखीनच खजील झालो.

''म्हणजे? दत्तू, तुझ्याशीही नातं त्यांचं?''

''बदमाप माणसं साली!'' दत्तू म्हणाला, 'इकडली तिकडली नाती काढून त्या रेडकराच्या बायकोनं मी तिचा दूरचा मावस भाऊ आहे असं सांगितलं. सालं मलाही ते खरं वाटलं! आपल्याला तरी कुठं माहीत असतं आपल्या दूरदूरच्या मावशा कोण आणि कुठं असतात त्या! आणि मीही साला बावळट! सगळे दिवस सोडून त्यांच्याकडे भाऊबीजेच्या दिवशी गेलो. तर त्या बाईनं मला चक्क ओवाळलं आणि अकरा रुपयांची भाऊबीज घेतली!''

''पण तू तिचा दूरचा मावसभाऊ नाहीस हे तुला कळलं कशी?''

''पाडगावकराचं कळलं तेव्हा–''

''म्हणजे? पाडगांवकराचं काय?''

''तो वसुलीला गेला तेव्हा त्याला दूरचा मामेभाऊ ठरवून त्याला त्यानी सरळ जेवायला बसवलं. मी बुशशर्ट घालून गेलो होतो म्हणून बरं! पाडगावकर साला कोट घालून गेला होता. जेवायला बसताना पाडगावकरानं कोट काढून बाहेर खुंटीला लावला. परत घरी आला आणि पाहातो तो काय? कोटातले पंचेचाळीस रुपये घूल! ही त्या पोरांची बालवीर चळवळ! मी बुशशर्टमध्ये गेलो. म्हणून मला जेवण नाही, नुसती आरती! पण तेवढ्यावरच सुटलो!''

ते ऐकता ऐकता मी विरघळत होतो. माझ्या कोटाच्या आतल्या मोठ्या खिशात हात घालावा अशी मला तीव्र इच्छा होत होती, पण या दत्तू नाडकर्णीच्या पुढ्यात मला खिशात हात घालायचा नव्हता.

''तुझं नातं काही जुळवलं की नाही?'' मध्येच दत्तूनं विचारलं.

''हो ना! माझ्या वहिणीवरून–''

''शाब्बास! मग जेऊन आलेला दिसतोस . . . कोट . . . '' दत्तूला विलक्षण आनंद होत होता.

''छे–छे!'' दत्तूच्या हाती चेष्टेचं कोलीत लागू नये म्हणून मी घाईघाईनं म्हटलं, ''जेवायचा ज्याम आग्रह करीत होती. पण सुदैवानं मी आधीच जेऊन गेलो होतो. म्हणून मी जेवायला बसलो नाही आणि सुटलो!''

दत्तूचा चेहरा आंबट झाला. रेडकराच्या घरी माझंही गेपूट तुटलं असतं तर त्याला आनंद झाला असता.

''पण हा दाजीबा रेडकर त्या चिटकोबाचा कोण?''

कधीपासून मला ही एक शंका जाचत होती. पण ती शंका ऐकताच दत्तू खो खो हसू लागला.

''तुला हसायला काय झालं?'' मी गोंधळून विचारलं.

''एवढा चक्रम कसा तू?'' जो तुझ्याशी दाजीबा म्हणून बोलला तोच चिटकोबा!''

मी बर्फासारखा थंड झालो आणि टेबलावर डोकं टेकलं.

''पाडगावकराला त्यानं आपलं नांव बाळोबा रेडकर म्हणून सांगितलं आणि मला तातोबा रेडकर म्हणून सांगितलं! पण गंमत अशी की माझे चौदा रुपये गेल्यानंतर पाडगावकरानं त्याचे सत्तेचाळीस रुपये गेल्याचं सांगितलं. पाडगावकरानं मला ते आधी सांगितलं असतं तर निष्कारण भाऊबीज साजरी करायचा माझ्यावर प्रसंग आला नसता. तरी पण तू चार रुपयावरच सुटलास हे बरं झालं!'' असं म्हणत दत्तू नाडकर्णी आपल्या खात्यात निघून गेला.

तो गेल्याबरोबर मी कोटाच्या आतल्या खिशात हात घातला. हरे राम! पैसे गेल्याचं दुःख नाही, पण कुणी आपल्यास फसवलं, ठकवलं हे सहन करणं फार कठीण! पण एक बरं झालं! या प्रकरणाचा पुनः पुनः विचार करीत बसण्याऐवजी मी तडक बँकेत गेलो, पन्नास रुपये काढले आणि 'चिटकोबा रेडकराकडून वसूल केलेले आपले पन्नास रुपये सोबत पाठवीत आहे.' असा मजकूर मनिऑर्डरच्या कूपनात लिहून मी ते पन्नास रुपये बापूसाहेब चिटणीसांना पाठवून दिले. एवढ्यासाठीच की, चिटकोबात समाविष्ट असलेल्या बाळोबा, तातोबा, दाजीबा बा—बा––बा–यांनी आणखी कुणाला बळी द्यायला नको.

त्यानंतर बापूसाहेब चिटणीसांचं अत्यानंदानं लिहिलेलं आभाराचं पत्र आलं. त्यात त्यानी लिहिलं होतं, 'आजवर आठ जणांना मी हे काम सांगितलं, पण ते फक्त तुलाच जमलं. यावरून तुझी हुशारी दिसून येते. तू पोस्टखात्याऐवजी पोलीस खात्यात जाशील तर खात्रीनं चमकशील!'

तथापि या आठ जणांपैकी आम्ही तिघे मी, दत्तू नाडकर्णी आणि चितू पाडगावकर! बाकीचे मुका मार खाणारे पांच जण कोण असतील याचा मी अद्याप विचार करीत असतो. चिटकोबा उर्फ दाजीबा रेडकरानं मला फसवलं याचं मला दुःख होतं, पण हा दुःखी विचार आला की डोळ्यांसमोर मी एक चित्र खेळवतो––

रंगीत पाटावर दत्तू नाडकर्णी बसला आहे. . . त्याची दूरची मावसबहीण पानानं चिकचिकलेल्या हिरड्या दाखवीत हसते आहे, त्याच्या कपाळावर ओलं कुंकू लावते आहे, त्याला ओवाळते आहे आणि दत्तू तिला अकरा रुपयांची भेट देतो आहे!

मग मी माझं दुःख विसरतो आणि खुदकन् हसतो.

• • •


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास





# गानतपस्विनी श्रीमती अंजनीबाई मालपेकर

## जरा न शिवली कधी जियेला

**का**ही ऋणे अशी असतात की, ज्यातून अल्पांशाने तरी उतराई होण्याचा योग कधी येईल की नाही, याची काहीच कल्पना आपल्याला नसते. श्रीमती अंजनीबाई मालपेकर यांचे मजवरील ऋण अशाच प्रकारचे आहे.

मी त्याना १९१६ सालच्या डिसेंबरमध्ये प्रथम पाहिले. दत्तजयंती नुकतीच होऊन गेलेली होती. केडगावचे सुप्रसिद्ध सत्पुरुष श्रीनारायणमहाराज यांच्या कीर्तीचा सौरभ त्यावेळी मुंबई शहरात दरवळलेला होता. एके दिवशी दुपारच्या सुटीत आर्यन एज्युकेशन सोसायटीच्या शाळेतील माझा वर्गबंधू प्रभाकर वेंगुर्लेकर मला म्हणाला, "का रे गजानन, तुला नारायणमहाराजांना पहायची इच्छा आहे का?" मी त्याला विचारले, "काय पहाण्यासारखं आहे त्यांच्यात? ते काही चमत्कार वगैरे करून दाखवितात का? बुक्का, खडीसाखर किंवा फुलं काढतात का?" तेव्हा प्रभाकरने मला उत्तर दिले, "लोक सांगतात, ते चमत्कार करतात म्हणून. पण मी तर काही बाबा अद्याप त्यानी केलेला चमत्कार बघितलेला नाही. पण दिसतात मात्र छान — गोरेगोरे पान, लोभस आणि प्रेमळ! "मग चलतोस का दर्शनाला त्यांच्या?" त्यावर मी त्याला विचारले, "पण कुठं जायचं त्यांच्या दर्शनासाठी?" त्यावरोबर प्रभाकर उद्गारला, "अरे, आमच्या जातवालीकडेच तर उतरतात नेहमी ते. केनेडी पुलाच्या रस्त्यावरच्या आमच्या चाळीसमोरच्या बाजूला ती निळी बंगली आहे ना 'नारायण आश्रम' असं नाव असलेली, तिथं उतरले आहेत ते अंजनीबाई मालपेकरांकडे. तू येत असशील, तर आज संध्याकाळीच आरतीला जाऊ आपण."

प्रभाकरच्या या सूचनेनुसार त्या दिवशी सायंकाळी सातच्या सुमारास मी आणि आमचा दुसरा वर्गबंधू शंकर गणेश वैद्य असे आम्ही दोघे ऑपेरा हाऊसवरून केनेडी पुलाकडे जाणाऱ्या रस्त्यावर उजव्या बाजूला असलेल्या नारायण आश्रमात गेलो.

बंगली टुमदार पण थोडी कोंदट होती. त्या दिवशी गुरुवार असल्याने रस्त्यापर्यंत महाराजांच्या दर्शनाला आलेल्या लोकांची रीघ लागलेली होती. प्रभाकरच्या ओळखीमुळे जिन्यावरून मोठ्या मुष्किलीने वाट काढून आम्ही कसेबसे एकदाचे माडीवर गेलो. दिवाणखाना खेचोखेच भरलेला होता. मखमलीचा गालिचा घातलेल्या प्रशस्त चौरंगावरील व्याघ्रचर्मावर श्रीनारायणमहाराज विराजमान झालेले होते. दिवाणखान्याच्या मध्यभागी असलेल्या झुंबराच्या लखलखीत प्रकाशात पद्मासन घातलेली त्यांची शांत मूर्ती उजळून दिसत होती. प्रभाकरने आम्हा दोघाना थेट महाराजांच्या समोरच्या बाजूला नेऊन बसविले. गोरीपान नाजूक अंगकाठी, उथळ बटबटीत डोळे, लालसर जाड ओठ, जिवणीला मेहरप करणाऱ्या दाट मिशा आणि कपाळावर आडवे केशरी गंध! — पहाताक्षणीच मनाला प्रसन्नता वाटावी, असे काही हे रूप नक्कीच नव्हते. तथापि त्यांच्या गौर वर्णातली केतक-कांती आणि डोळ्यातली चंचल चमक मात्र मन वेधून घेत असे. जरीकाठी उमरेडी धोतर ते नेसलेले होते व केशरी रंगाची शाल त्यांच्या अंगाभोवती लपेटलेली होती. गळ्यातल्या तुळशीच्या माळेला झाकणारा गुलाबाच्या फुलांचा कमालखानी हार त्यांच्या मांडीवर रुळत होता. त्या वेळी ते तिशीच्या जवळपास असावेत. तथापि, त्यांच्या चेहऱ्यावर असा काही कोवळे-पणाचा भाव होता की, हसऱ्या डोळ्यांनी आणि ओठानी आपल्या-

पुढे बसलेल्या भाविकांकडे बघणारी त्यांची वालवृत्ती त्यांच्याविषयी मनात लोभ उत्पन्न करीत असे.

पण, त्याहीपेक्षा त्या बैठकीत बसल्याबरोबर माझे मन जर कोणाला पाहून मोहीत आणि विस्मित झाले असेल, तर ते श्रीमती अंजनीबाई मालपेकर यांना. त्या वेळी त्यांची तिशी उलटून गेलेली होती. तथापि, त्यांच्या तारुण्याचा तजेला यत्किंचितही कोमेजलेला नव्हता आणि त्यांच्या सौंदर्यावर तर नजर ठरत नव्हती. त्याना पहाताच पुराणात वाचलेली अप्सरांची आणि कथासरित्सागरात वाचलेली गणिकांची वर्णने माझ्या डोळ्यांपुढे उभी राहिली व क्षणभर मनात असा विचार येऊन गेला की, एखादी शापभ्रष्ट अप्सरा तर साधुसेवा करण्यासाठी भूलोकी जन्म घेऊन इथे आलेली नसेल ना? तोच प्रभाकर माझ्या कानाशी लागून म्हणाला, "गजानन, अरे याच अंजनीबाई. आमच्या गोवेकर समाजात देवतेसारखा मान आहे याना ! " मी मृच्छकटिक नाटक गंधर्वांच्या रंगमंचावर नुकतेच पाहिलेले होते व मूळ संस्कृत नाटकही श्री. भालचंद्रशास्त्री देवस्थळी यांच्या मदतीने समजावून घेतलेले होते. प्रभाकराचा हा उद्‌गार ऐकताच, – "अये, कथं देवतोपस्थानयोग्या युवतिरियम्! " – "अहो, देवतानी जिचा वहुमान करावा अशी ही तरुणी आहे !"– हे चारुदत्ताने वसंतसेनेविषयी काढलेले उद्‌गार मला आठवले.

## निरागस पवित्र वातावरणात —

तोच अंजनीबाईंचे भजन सुरू झाले. त्या मोरपंखी इंदुरी साडी नेसलेल्या होत्या. शुक्री मोत्यासारख्या त्यांच्या अंगकांतीला त्या साडीचा गडद अस्मानी रंग खुलून दिसत होता. नाकातली चमकी, कानातली कुडी आणि हातातली काकणे सोडली, तर त्यांच्या अंगावर एकही दागिना नव्हता. विभ्रमाशिवाय जसे त्यांचे यौवन, तसे अलंकाराशिवाय सौंदर्य शोभून दिसत होते. जणु, जीवनातला अनुराग आता ओसरत चाललेला असून त्याची जागा विरागाने घेतलेली आहे, अशी जाणीव त्यांची ती सौम्य, सात्विक वेशभूषा देत होती. तंबोऱ्यावरून बोटे फिरताना जो अंगठीवरला पुष्कराज चमके, तो जणु त्यांच्या कंठातून बाहेर पडणाऱ्या संथ स्वरांच्या तेजाशी स्पर्धा करीत होता ! "अजि आनंदु रे। एकी परमानंदु रे॥ जया श्रुति नेति नेति म्हणति। तो हा एक गोविंदु रे,"– हे महाराजांचे आवडते भजन त्या तन्मयतेने म्हणत होत्या व ते हातानी ताल धरून त्याना साथ देत होते. अंजनीबाईंच्या चेहऱ्यावरील भक्तिभाव आणि महाराजांच्या चेहऱ्यावरील वालभाव यानी असे काही निरागस, पवित्र वातावरण त्या निःशब्द दिवाणखान्यात निर्माण केले की, आपण एका गोवेकरणीच्या माडीवर बसलेले आहोत, याचा मला विसर पडला. फक्त भजनासक्त महाराज आणि त्यांच्यासमोर भलाथोरला तंबोरा घेऊन भावसमाधीत विलीन होत चाललेली गायिका या दोन व्यक्तींचेच भाव काय ते माझ्या मनाला उरले. यौवन, सौंदर्य आणि गांभीर्य यांचा जो अपूर्व आध्यात्मिक संगम नारायण आश्रमातील त्या बैठकीत मी त्या दिवशी रात्री पाहिला, तो पहिला आणि शेवटलाच! त्यानंतर अनेक साधुसंतांचे दर्शन मी उत्सुकतेने घेतले आणि

## ग. त्र्यं. माडखोलकर

अनेक गायिकांच्या मैफलीही मनमोक्त ऐकल्या. पण अष्टसात्विक भावांच्या लहरीवर लहरी अंगावर उठविणारे असे रूपलावण्य आणि कंठमाधुर्य काही मी पुन्हा पाहिले नाही.

आणि अशा रीतीने त्या दिवशी प्रथम दृष्टीस पडलेल्या आणि त्यानंतर श्रीनारायणमहाराजांच्या मुंबईतील बहुधा प्रत्येक मुक्कामात पुनः पुन्हा पाहिलेल्या अंजनीबाई पुढे सतरा वर्षांनी, अगदी अभावितपणाने, माझ्या 'मुक्तात्मा' या कादंबरीचा नायक चंद्रशेखर याच्या मातेच्या रूपाने प्रकट झाल्या.

☆ ☆

१९२४ च्या सप्टेंबरमध्ये मी मुंबई सोडून नागपूरला रहावयाला आलो. त्यानंतर श्री. अंजनीबाईंची आणि माझी भेट होण्याचा जो योग पुन्हा आला, तो १९६३ सालच्या मार्च महिन्यात. माझे गुरु कै. श्री. कृ. कोल्हटकर यांच्या गोमंतक मराठा समाजातील अग्रशिष्या कै. हिराबाई पेडणेकर यांच्यासंबंधीची माहिती गोळा करण्यासाठी मी मुंबईस गेलो होतो. त्यावेळी त्या समाजाचे एक प्रमुख कार्यकर्ते श्री. सु. शा. मांद्रेकर यानी श्रीमती अंजनीबाई या हिराबाईंच्या वर्गभगिनी आणि वालमित्र असल्याचे मला सांगितले. म्हणून माझे रसिक स्नेही श्री. उमाकांत भेंडे यांच्यावरोबर, दि. ३ मार्च १९६३ रोजी सायंकाळी, श्री. अंजनीबाई यांच्या भटवाडीतील

**सुप्रसिद्ध भारतीय चित्रकार राजा रविवर्मा यानी त्या काळी घेतलेले श्रीमती अंजनीबाईंचे एक दुर्मिळ छायाचित्र**



'पितृच्छाया' या निवासस्थानी, मी त्यांना भेटावयाला गेलो. ज्या नारायण आश्रमात त्यांनी आपल्या तारुण्यातील वैभवाचा काळ घालवलेला होता, तो नारायण आश्रम ही पुसट अक्षरे जरी त्या निळ्या बंगलीच्या प्रवेशद्वाराच्या खांबावर अजूनही त्या रस्त्याने जाणाऱ्या-येणाऱ्यांच्या नजरेस पडत असली, तरी त्या बंगलीत आता मिस्त्री नामक होत आलेले आहे व श्री. अंजनीबाई या आपले एकुलते एक चिरंजीव श्री. श्रीपाद वसनजी यांच्यासह 'पितृच्छायेत येऊन राहिलेल्या आहेत.

## पेशीच्या घरातही बुलंद आवाज

मनेचाळीस वर्षांनी झालेल्या या भेटीत श्री. अंजनीबाईंना जेव्हा मी प्रथम पाहिले, तेव्हा माझ्या मनाला धक्का बसला. स्वतःच्या डोळ्यांवर माझा मुळी विश्वासच बसेना. भर्तृहरीने जी सप्तशल्ये वर्णन केलेली आहेत, त्यात 'गलितयौवना कामिनी' या शल्याला त्याने दुसरे स्थान दिलेले आहे. म्हणजे चंद्रानंतर चंद्रानना! त्या शल्याचे मूर्तिमंत दर्शन त्या दिवशी मला घडले. पांढरे शुभ्र पातळ नेसलेल्या, हातात जपाची माळ घेतलेल्या आणि एक डोळा शिल्लक असलेल्या श्री.अंजनीबाई जेव्हा वेताच्या आराम-खुर्चीवर बसलेल्या मी बघितल्या, तेव्हा भवभूतीच्या 'उत्तररामचरित्रा'तील "जिथे पूर्वी पुण्यसलिला गोदावरीचा रम्य प्रवाह वहात होता, तिथे आज रेताड वाळवंट पसरलेले दिसत आहे." हा प्रभु रामचंद्राचा खेदोद्गार मला आठवला व माझे मन क्षणमात्र सुन्न होऊन गेले. एखाद्या वैभवशाली प्रासादाचे रीट बघितल्यावर जशी मनाची अवस्था होऊन जावी, तशी माझी स्थिती झाली. तथापि, तो सगळा आवेग गिळून टाकून मी जेव्हा त्यांना हिराबाई-विषयी एकदोन प्रश्न विचारले, तेव्हा त्यांच्या व्यक्तित्वातली तडफ आणि तळप ही, ऐंशीच्या घरात आल्यावरही, तशीच कायम आहे, हे माझ्या अनुभवाला आले आणि त्यावरोबरच त्यांच्या आवाजाचा बुलंदपणाही! हिराबाईसंबंधी आम्ही बोलत असतानाच त्यांचे एक शागीर्द रियाज करण्यासाठी त्यांच्याकडे आले. तेव्हा बाई मला म्हणाल्या, "भाऊसाहेब, आपण थांबा आता जरा थोडा वेळ. हिराबाईविषयी उद्या सकाळी फुरसतीनं बोलू आपण. पण माझं मन म्हातारपण पाहून तुम्ही इतके हळहळलात ना? मग माझ्या आवाजाची या वयातली करामत आता पाहून घ्या थोडा वेळ!" आणि आपल्या त्या शिष्याला शिकवण्याच्या निमित्ताने, बाईंनी जेव्हा हातानी ताल धरून सूर लावला, तेव्हा त्यांच्या आवाजातली पहिली चमक आणि चारुता अद्याप कायम असल्याचा प्रत्यय येऊन माझ्या अंगावर रोमांच उभे राहिले. त्या क्षणी माझे मन एकदम चाळीस वर्षे मागे नारायण आश्रमात गेले, आणि "आज आनंदु रे। एकी परमानंदु रे" या भजनाचे सूर माझ्या मनात घोळू लागले.

☆ ☆

दुसऱ्या दिवशी सकाळी दहाच्या सुमारास जेव्हा आम्ही पुन्हा श्री. अंजनीबाईंकडे गेलो, तेव्हा हिराबाईंसंबंधी बोलणे सुरू झाल्या-बरोबर, त्यांनी मला 'कलावंतांचे चारित्र्य' या विषयावर मुळी व्याख्यानच सुनावले. तेही खणखणीत आणि सडेतोड! त्या मला म्हणाल्या, "हिराबाईचा आवाज गोड होता आणि ती बुद्धिमान होती. नाटकाची तर तिला उपजत आवड होती. त्यामुळे नाटक-वाले आणि नाटककार यांच्या फंदात ती सापडली. तिला वाईट वळण लागायला त्यांची संगत कारण झाली. त्यांच्यामुळे तिला दारूचे व्यसन लागले, तिची प्रकृती विघडली आणि त्यांनी तिचा फायदा घेऊन नंतर तिला सोडून दिल्यामुळे तिचे आयुष्य पुढे निराशेत गेले. नाहीतर तिने चांगले नाव कमावले असते. आम्ही मिशन शाळेत एकत्र शिकलो आणि नजीरखाँसाहेबांपाशी मी गाण्याची तालीम घेत असताना, ती बऱ्याच वेळेला माझ्यापाशी येऊन बसत असे. ती सावळी पण नाकीडोळी नीटस आणि ठसठशीत होती. पुढे ती नाटकवाल्यांच्या नादी लागल्यावर माझा आणि तिचा संबंध तुटला. 'चारित्र्यवान कलावंत मिळणं कठीण', असा लोकांचा सर्वसाधारण समज आहे आणि आम्हा कलावंतांनी आपल्या वर्तनानं तो बळकट केलेला आहे; पण, कलावंत जर मनात आणील, तर आपल्या चारित्र्यानं तो साधुसंतांनाही मान डोलवायला लावील, अशी माझी खात्री आहे. कलावंतानाही स्वतःची नीतीमत्ता आणि चारित्र्य असते, हे लोकानी विसरू नये." श्रीमती अंजनीबाईंना असा आत्मविश्वास असल्यामुळेच त्यानी आपल्या दि. ४ जानेवारी १९६८ च्या पत्रात मला असे लिहिले होते की, "ज्या गोवेकरणींबद्दल लोक "बाजारचा मेवा न् बापलोकानी खावा" असे हीन उद्‌गार काढले, त्याच गोवेकरणींच्या जातीत जन्मून मी चारित्र्य टिकवले आहे. मी गाण्याच्या बैठकीला आले म्हणजे राजे-महाराजसुद्धा उठून उभे रहात असत. एवढी मी आपल्या चारित्र्याने माझ्या गोवेकरणींच्या समाजाला प्रतिष्ठा प्राप्त करून दिली."

## खिडकीतून उडी मारावी लागली

श्रीमती अंजनीबाईंचे हे बोल त्यांना ऐन तारुण्यात आलेल्या अनुभवांच्या रसरशीत अंगारातून उफाळलेले आहेत. त्या जर नुसत्याच गायिका असत्या, तर त्यांच्या गाण्यावर जरी रसिकांच्या उड्या पडल्या असत्या, तरी त्यांच्या चारित्र्यावर धाड पडण्याचा प्रसंग बहुधा येता ना. पण, त्यांच्या अद्वितीय कंठमाधुर्याला जी तितक्याच








अतुल रूपसौंदर्याची जोड मिळालेली होती,त्यामुळे वयाच्या सोळाव्या वर्षी त्या मुंबईतील मुजफराबाद हॉलमध्ये पहिला जलसा करावयाला बाहेर पडल्या दिवसापासून त्यांच्या मागे लक्ष्मीपुत्र, उद्योगपती, राजेरजवाडे आणि बडे सरकारी अधिकारी यांचा ससेमिरा लागला. मुजफराबाद हॉलमधील जलशानंतर दीड–दोन वर्षाच्या आतच त्यांच्यावर पहिला दुर्धर प्रसंग ओढवला. जयपूरच्या महाराजांचा मुक्काम मुंबईस वाळकेश्वर येथे होता. त्यानी श्रीमती अंजनीबाईची ख्याती ऐकून त्याना आपल्या बंगल्यावर गाण्याचे निमंत्रण मोठ्या अगत्याने दिले. त्या रात्रीची ती बैठक इतकी काही रंगली की, महाराजांचे देहभान नाहीसे होऊन गेले.तेव्हा त्यांच्या तावडीतून सुटण्यासाठी अंजनीबाईनी खिडकीतून बाहेर उडी टाकून धूम ठोकली. वयाच्या अठराव्या वर्षी मुंबईस आलेल्या या प्रसंगानंतर, वयाच्या तिसाव्या वर्षी गोव्यात जो कहर त्यांच्यावर गुदरला, तो तर फारच भयंकर ! आरावे येथील श्रीमंत देसाईसाहेबांच्या वाड्यात बाईंचे गाणे होते. गोव्याच्या पोर्तुगीज गव्हर्नर–जनरलचा तरणाबांड मुलगा त्यांच्या रुपगुणांचा लौकिक ऐकून मद्दाम त्या बैठकीला हजर झाला होता. तो एका अर्थाने गोव्याचा युवराजच असल्यामुळे त्याचा लवाजमाही त्याच्याबरोबरच होता. आपल्या राशीला तो लागणार हे लक्षात येताच बाई वाड्यातून बाहेर निसटून ज्या एका गोठ्यात दडून बसल्या, त्या दुसऱ्या दिवशी पहाटे सुखरूप आपल्या मुक्कामी जाऊन पोचल्या. या प्रसंगानंतर, गोवा स्वतंत्र होईपर्यंत त्यानी काही पुन्हा गोव्यात पाऊल टाकले नाही. इतकेच नव्हे, तर या त्रासाला कंटाळून वयाच्या अवघ्या चाळिसाव्या वर्षी १९२३ मध्ये त्यांनी अखेर गाण्याचे सार्वजनिक कार्यक्रम करणे अजिबात सोडून दिले.

✲ ✲

अशा या श्रेष्ठ गायिकेचा जन्म, दि. २२ एप्रिल १८८३ रोजी, गोव्यात त्यांच्या मूळच्या गावी मालपे येथे झाला. मालपे ही लहानशी वाडी पेडणे महालात आहे. मूळवीर हे त्यांचे कुलदैवत. त्यांच्या घराण्यात गेल्या चार पाच पिढ्या गायन–वादनाची विद्या चालत आलेली असल्यामुळे, 'गायन–नायक' म्हणूनच त्यांच्या कुटुंबाला लोक गोव्यात ओळखीत असत. पण सवाशे वर्षापूर्वी त्यांच्या पणजी श्री. गुजाबाई या मुंबईस येऊन स्थायिक झाल्यावर त्यांच्या ग्रामनामावरून मालपेकर हे आडनाव त्याना लोकांनी दिले. ग्वाल्हेर घराण्याच्या ध्रुपद धमाराच्या गायकीचा वारसा आपल्या संगीत आणि संस्कृत या दोन्ही विद्यांमध्ये निष्णात असलेल्या पणजोकडून श्रीमती अंजनीबाईना लाभला. त्यांचे आजोबा वासुदेवराव हे उत्तम गवई आणि तबलियेही होते. त्यांच्यापासून श्रीमती अंजनीबाईच्या मातोश्री श्रीमती नबुबाई यानी संगीताची दीक्षा घेतली; पण बाईचे वडील वासुदेवराव हे मात्र एंजिनियर होते. मुंबईस त्यांचे बिऱ्हाड नवीवाडीत असल्याकारणाने त्या वाडीतील मिशनरी शाळेतच त्यांचे इंग्रजी चौथीपर्यंत शिक्षण झाले. त्यांची धाकटी बहीण कमळा उर्फ बुचीबाई ही जन्मसिद्ध गायिका होती. वयाच्या अवघ्या बाराव्या



लहरीवर लहरी अंगावर उठविणारे हे रूपलावण्य

वर्षी तिचे जे पहिले गाणे तत्कालीन विख्यात गायक–नट नरहरीबुवा कोल्हापूरकर यांच्या डोंगरवाल्यांच्या बंगल्यातील जलशाच्या वेळी अचानक झाले, तेव्हा त्या परकरी पोरीची संगीतातली प्रगती पाहून खाँसाहेब अल्लीहुसेन खाँ यांच्यासारखे बीनकारदेखील थक्क होऊन गेले; पण त्या दिवशी झालेल्या बुचीबाईच्या या कौतुकामुळे तिला दृष्ट लागल्यासारखे होऊन ती प्लेगने लवकरच गेली. तिच्या अकालमृत्यूनंतर नबुबाईनी आपल्या या थोरल्या मुलीला शाळेतून काढून गाणे शिकायला बसवले.

## उस्ताद नजीरखाँसाहेब यांचा गंडा बांधला

श्रीमती अंजनीबाईना वयाच्या आठव्या वर्षी भेंडीबाजारवाले नजीरखाँसाहेब यांचा गंडा बांधण्यात आला. खाँसाहेबांची गायकी तानसेनच्या परंपरेतली असून मुरादाबादचे इनायतहुसेनखाँ आणि बहादुर हुसेनखाँ हे त्यांचे उस्ताद होते. छज्जूखाँ, नजीरखाँ आणि खादीम हुसेनखाँ असे हे तिघे बंधु रामपूरहून मुंबईस येऊन भेंडीबाजारच्या वस्तीत स्थायिक झाले. त्यामुळे त्याना 'भेंडीबाजारवाले' असे नाव पडले.या तीन भावात छज्जूखाँ हे ध्रुपद धमार गाणारे असून त्यानी पाचशे नवीन चिजाही बांधलेल्या होत्या. धाकटे दोघे बंधू हे ख्यालिये होते; श्रीमती अंजनीबाई या त्यांच्या तालमीत तयार झाल्यामुळे त्यादेखील ख्यालगायिका म्हणूनच प्रसिद्ध आहेत. बंदेअलीखाँच्या पद्धतीनुसार मींड आणि सूर यांच्यावर खाँसाहेबांचा फार भर होता. स्वतः श्रीमती अंजनीबाईनी त्यांच्याविषयी असे उद्गार काढलेले आहेत की, "माझे उस्ताद नजीरखाँसाहेब हे





आवर्तनांचा ख्याल भरण्यात निष्णात होते. या कलेत त्यांचा हात धरणारा एकही गायक त्या वेळी नव्हता. खटका, सूद, मींड, कण, मुरकी इत्यादी एकशेसाठ चिजा शागिर्दाने शिकावयाच्या असतात. या सगळ्या चिजा खांसाहेबानी, त्यातील बारकावे समजावून सांगून मला शिकविल्या. सर्वसामान्य गवई तीस सेकंदांचा श्वास भरू शकतो. पण खांसाहेब हे चाळीस ते पन्नास सेकंदांचा श्वास भरीत असत. त्यानी माझा दमश्वास एक मिनिटाचा तयार करून दिला. अशा उस्तादाची तालीम मला छत्तीस वर्षे लाभली, हे मी माझे भाग्य समजते." गंडा बांधण्याच्या वेळी नबुबाईंनी तबकात विड्याच्या पानांवर पाच रुपये ठेवून खांसाहेबाना नजर केले. तेव्हा त्यापैकी एक रुपयाची मोड त्यांनी आणावयाला सांगितली. त्यातले फक्त सवापाच आणे ठेवून बाकीचे पैसे त्यांनी परत केले आणि ते नबुबाईंना म्हणाले, "आज मी या मुलीच्या हाताला गंडा बांधला आहे. तो जेव्हा मी तिच्या गळ्याला बांधीन, तेव्हा तुमच्याकडून भरपूर नजर घेईन." त्याप्रमाणे, श्रीमती अंजनीबाई जलसे करून जेव्हा पुढे हजारो रुपये मिळवू लागल्या, तेव्हा त्यानी गंडा बांधण्याचा मोठा समारंभ करून खांसाहेबांना पंधरा हजार रुपये नजर केले. पण, तोपर्यंत नबुबाईंनी आपण होऊन कबूल केलेल्या मासिक वेतनाची-सुद्धा अपेक्षा न ठेवता, त्यांनी श्रीमती अंजनीबाईंना अगदी निरपेक्ष बुद्धीने तालीम दिली. त्यांची शिस्त मोठी कडक होती. पहाटे चार वाजता ते नबुबाईंच्या घरी यावयाचे आणि सकाळी ९–१० वाजे-पर्यंत तालीम चालावयाची. त्यांच्या या कडक शिस्तीला शोभेल असाच श्रीमती अंजनीबाईंचा तंबोराही होता. झांजिबार येथून मुद्दाम आणवलेल्या भल्याथोरल्या भोपळ्यापासून हेमराज नावाच्या कारागिराने तयार केलेला हा अवजड तंबोरा त्याना तालीम करताना सारखा कुशीत ठेवावा लागल्यामुळे त्या जागी खळगा पडे. पण तो तंबोरा घेऊनच श्रीमती अंजनीबाईंना बारा बारा तास रियाज करावा लागत असे. पाऊणशे वर्षापूर्वीचा हा तंबोरा आजही त्यांच्या आरामखुर्चीच्या मागे गवसणी घालून ठेवलेला दृष्टीस पडतो. अजब चिजा गोळा करण्याचा षौक असलेल्या अनेक देशी-विदेशी विचित्र-वस्तु–संग्राहकानी त्याना हजारो रुपये देऊ करून या तंबोऱ्याची मागणी केली व त्याचप्रमाणे मोठमोठे गायनपंडित आणि संगीतसंस्था यानीही तो आपल्याला देऊन टाकण्याबद्दल त्याना गळ घालून पाहिली. पण, त्या सर्वांना श्रीमती अंजनीबाईंनी असे उत्तर दिले की, "मी हयात असेपर्यंत हा तंबोरा मजजवळ राहील. १९३० साली माझ्या मातोश्री गेल्यापासून मी त्याला हात लावलेला नाही, ही गोष्ट खरी, पण, या तंबोऱ्याने वयाच्या आठव्या वर्षापासून मला साथ दिली, अगणित पैसा मिळवून दिला आणि फार मोठी प्रतिष्ठाही प्राप्त करून दिली. त्याला मी कशी अंतर देऊ? माझ्या संगीत जीवनाचा मूक साक्षी म्हणून मरेपर्यंत हा तंबोरा मजजवळ राहील आणि नंतर तो नॅशनल म्युझियममध्ये माझी आठवण म्हणून ठेवण्यात येईल."




## स्वरांची तुलना मोत्यांच्या किंमतीशी

श्रीमती अंजनीबाईंच्या वयाच्या आठव्या वर्षापासून तो अठराव्या वर्षापर्यंत खांसाहेबांनी त्यांच्यावर विलक्षण मेहनत घेतली. आपल्या उस्तादानी आपल्यावर घेतलेल्या या अपरिमित परिश्रमांचे वर्णन स्वतः बाईनीच असे केलेले आहे की, "खांसाहेबाना आपल्या कल्पनेप्रमाणे आपली स्वतःची मूर्तिमंत गायकीच अशी एक नमुनेदार शिष्या तयार करावयाची होती. त्यासाठी त्यानी मला निवडले. होते. त्यामुळे मला शिकवताना वेळेची किंवा पैशाची फिकीर त्यानी कधीच केली नाही. तालमीच्या वेळी आमच्या बैठकीत ते कोणा-लाही येऊ देत नसत. तबलाही ते स्वतःच वाजवीत. यमनाचा नुसता ख्याल आपल्या मनाप्रमाणे बसवून घेण्यासाठी प्रत्येक स्वर तोलाचा, वजनदार आणि लयकारीने बद्ध असा ते बसवून घेत असत. ते मला निरनिराळ्या आकाराची मोत्ये दाखवीत, व त्यातील गोल आणि सुबक मोत्यासारखी माझी प्रत्येक तान दाणेदार सुरेल झाली पाहिजे, असे मला सांगत असत. वादी स्वर म्हणजे इतक्या किमतीचा मोती, संवादी स्वर म्हणजे इतक्या किमतीचा मोती, विश्रांतीस्थानाचा स्वर म्हणजे इतक्या किमतीचा मोती, अशा रीतीने स्वरांची मोत्यांशी तुलना करून त्यानी मला तानेचें महत्त्व समजावून सांगितले आणि त्या ताना माझ्या गळ्यातून काढून घेतल्या. याप्रमाणे प्रथम साडेतीन वर्षे त्यानी मला यमन हा राग शिकवला आणि नंतर दीड वर्षपर्यंत भैरवी! ते म्हणत असत, 'यमन हा सर्व तीव्र सुरांचा आणि भैरवी हा सर्व कोमल सुरांचा राग आहे. या दोन रागांच्या अभ्यासामुळे सप्तकातील सगळे स्वर गळ्यावर उत्तम प्रकारे चढतात. मग कोणताही राग गाणे कठीण जात नाही'. रागांच्या जोडीला खाँसाहेबानी लयीचीही संथा मला दिली. त्यासाठी नुसत्या त्रितालाचे १०५ पलटे त्यानी मला शिकवले, व त्याबरोबरच खंडमेराच्या गणिती पद्धतीने स्वरांचे ८७२ प्रकारही त्यांनी माझ्याकडून बसवून घेतले. खडमेराचे हे जे प्रकार त्यानी माझ्याकडून एका वहीत लिहून घेतले, ती वही मी अजून जपून ठेवलेली आहे. अशा पद्धतीने ५,९४० ताना त्यानी माझ्या गळ्यातून घोटून घेतल्या! माझा दमश्वास जो त्यानी एक मिनिटाचा तयार करून घेतला होता, तो याच उद्देशाने! इतकी तालीम झाल्यावर मग ते मला म्हणाले, 'बेटा, आता तुझाआवाज तयार झाला. सुरावर पुरा काबू आला. लयकारीची






समजही उत्तम झाली. म्हणून यापुढे तुझ्यावर मला जास्त मेहनत घेण्याची गरज नाही. आता मी दिवसातून फक्त एकदोन तास माझ्या सोईने येत जाईन ' आणि खरोखरीच, त्यानंतर बुटाचे बंद बांधता बांधता, त्यांनी मला अनेक राग शिकवले।'' १९२० साली खाँसाहेब वारले. त्यानंतर श्रीमती अंजनीबाईंनी त्यांचे बंधु खादीम हुसेनखाँ यांची तालीम घेतली. याप्रमाणे या तिघाही बंधूंच्या गायन-वादनातील गाढ पांडित्याचा संस्कार त्यांच्यावर झाला.

## गोहरजानबाईंची छाप

तथापि, श्रीमती अंजनीबाई यांची संगीताचे शास्त्र आणि कला ही दोन्ही सांगोपांग संपादन करण्याची आकांक्षा इतकी काही उत्कट होती की, या बंधुत्रयाच्या तालमीवरच समाधान न मानता, त्यांनी संगीताचार्य पं.वि.ना. भातखंडे यांच्यासारखे जे अग्रगण्य संगीतशास्त्रज्ञ आणि गायक त्या काळी हयात होते, त्यांच्यापासून विद्या घेतली. पं. भातखंडे हे त्या सुमारास आपल्या हिंदुस्थानी संगीतावरील ग्रंथा-साठी रागरागिण्या आणि चिजा याचे संशोधन आणि संग्रह करण्याच्या उद्योगात गढलेले होते. भेंडीबाजारवाले बंधुत्रयाजवळ छज्जूखाँनी स्वतः रचलेल्या आणि परंपरेने चालत आलेल्या शेकडो उत्कृष्ट चिजांचा संग्रह होता. हा आपला संग्रह पंडितजींना खुल्या दिलाने देण्याची त्यांची तयारी होती. त्या बंधूंशी पंडितजींची जी शास्त्रीय चर्चा चालत असे, तिला श्री. अजनीबाई हजर रहात असत. इतकेच नव्हे, तर हिंदुस्थानी गायकीवरील ही चर्चा आपल्याला समजावी, म्हणून त्या मुद्दाम संस्कृत, अरबी आणि उर्दू या तिन्ही भाषा शिकल्या. प्राचीन भारतीय संगीताचा व्यासंग केल्यामुळे हनुमंत मत, पारिजात मत, नारद मत आणि भरत मत हे त्या संगीतातील चार पुरातन संप्रदाय आणि त्यातील भेद यांची त्याना माहिती झाली; संगीतातील परस्परविरोधी घराण्यांचा उद्भव आणि विस्तार कशा रीतीने झाला याचे मर्म त्याना कळले व त्यावरोबरच अरबी आणि फारशी संगीताचा जो परिणाम मुस्लीम राजवटीत भारतीय संगीतावर झाला, त्याचेही ज्ञान त्याना होऊन गेले. त्या काळातले नामांकित लावणी गायक श्री. सखारामबुवा आणि श्री. काशिनाथबुवा यांच्या-कडून लावणीचा ढंगही त्यांनी शिकून घेतला; पण एवढ्यावरच त्या संतुष्ट झाल्या नाहीत. काशी, मथुरा, काकोली आणि बडोदे येथील पुष्टिमार्गी वल्लभ संप्रदायाचे गुरु श्री देवकीनंदनाचार्य, श्री जीवन-लालजी महाराज, श्री घनश्यामलालजी महाराज, श्री गोकुलनाथ-महाराज, श्री कन्हैयालालजी महाराज आणि श्री बाळकृष्ण-लालजी महाराज हे गायन–वादन निपुण असून अव्वल दर्जाचे संगीतकारही होते. भारतीय वैष्णव पंथातील पुष्टिमार्ग हा रसमार्ग आहे. त्यामुळे, त्याच्या उपासनापद्धतीत संगीताला प्राधान्य असून गुजरात, राजस्थान, उत्तर प्रदेश, बंगाल इत्यादि राज्यातील द्वारका-धीशाची मंदिरे ही गायनकलेची आगरे होऊन वसलेली आहेत. पं. भातखडे यांच्यासारख्या संगीताचार्यांनी जिथे श्री जीवनलालजी महाराजांच्या चरणापाशी बसून बीन आणि सतार यांचे शिक्षण घेतलेले होते, तिथे अंजनीबाईंनी त्यांची सेवा करून त्यांच्यापासून विद्या संपादन केली, यात आश्चर्य नाही. बाईंची ही शागिर्दी ज्या वेळी चालू होती, त्या वेळी गोहरजानबाईंच्या गायकीचा डंका अखिल भरतखंडात दुमदुमत होता. ठुमरी, दादरा, कज्जली, गझल, कव्वाली इत्यादि गायनप्रकारांची तर ती सम्राज्ञीच समजली जात असे. मुंबईच्या नगरभवनात झालेला तिचा जलसा जेव्हा अंजनी-बाईंनी प्रथम ऐकला तेव्हा तिचे रुबाबदार व्यक्तित्व, पल्लेदार आवाज, दीर्घ दमश्वास, अर्थानुरूप शब्दोच्चार, सूर लागल्याबरोबर श्रोत्यांचे दिल खेचून घेण्याची करामत, निरनिराळ्या भारतीय भाषांतली लोकप्रिय गाणी सहज त्या त्या भाषेच्या सरणीनुसार म्हणण्याची शैली इत्यादी गुणांची छाप बाईंच्या मनावर पडली व तिचा आदर्श डोळ्यांपुढे ठेवून त्यांनी आपल्या गायकीला पूर्णता आणण्याचा प्रयत्न केला.

✫ ✫

अशी रीतीने श्रीमती अंजनीबाईंचा संगीताचा व्यासंग चालू असतानाच, मुजफराबाद हॉलमधील त्यांचा पहिला जलसा झाल्या-नंतर लगेच, श्रीमती नबुबाईंनी त्यांचे लग्न करून टाकले. स्वतः बाईंनीच यासंबंधी असे उद्‌गार काढलेले आहेत की, '' माझी तालीम चालू असताना माझ्या मातोश्री आणि माझे उस्ताद या दोघांची माझ्यावर कडक निगराणी असे. मला आपल्या रूपाची जाणीव होऊ नये म्हणूनच की काय, खाँसाहेबांनी मला अशी ताकीद दिलेली होती की, 'ऐनेमे मूंह मत देखना, बेटा! संगीत ही पोट भरण्याची विद्या नाही. ती शास्त्र आहे, कला आहे आणि तपस्या आहे. म्हणून तू कोणत्याही मोहात न पडता त्याची साधना एकनिष्ठेने कर.' ही





अनुक्रमणिका







अनुक्रमणिका

त्यांची शिस्त मी तंतोतत पाळली. ही स्त्री आणि हा पुरुष या भावनेने मी कोणाकडेही डोळा वर करून कधी पाहिले नाही. पण, माझा पहिला जलसा झाल्यापासून मोठमोठे राजेरजवाडे आणि शेटसावकार यांची नजर माझ्याकडे गेली. माझे सौंदर्य हेच माझे शत्रू ठरले. त्यामुळे लोकांच्या विषारी नजरेची शिकार न होण्यासाठी माझे लग्न करून टाकणे हाच एक बचावाचा मार्ग आहे असे माझ्या आईला वाटले. म्हणून श्रीमती नबुबाईंनी १८९९ साली मुंबईचे तत्कालीन प्रमुख उद्योगपती शेठ लक्ष्मीदास खिमजी यांचे नातू श्री. वसनजी भगवानदास वेद यांच्याशी त्यांचा विवाह करून दिला. श्रीमती अंजनीबाईंच्या पहिल्या जलश्याच्या वेळी त्याना पाहिल्यापासून त्या सुमारास नुकतीची विशी उलटलेल्या तरुण वसनजींचे मन त्यांच्यावर गेलेले होते व श्री. नबुबाईंच्या मध्यस्थीने त्यांच्या या रूपगुणसंपन्न कन्येची ओळखही त्यानी करून घेतलेली होती. या परिचयाची परिणती अखेर लग्नात झाली, पण हे लग्न आंतरप्रांतीय आणि आंतरजातीय असल्याकारणाने, काही दिवस गुप्त ठेवावे लागले. दि. ४ जानेवारी १९६८ रोजी पाठविलेल्या पत्रात श्री. अंजनीबाईंनी आपल्या वैवाहिक जीवनासंबंधी असे उद्गार काढलेले आहेत की, "माझे यजमान हे भाटिये वैष्णव जातीचे होते. शेठ गोवर्धनदास खिमजी, श्री.लक्ष्मीदास खिमजी आणि श्री. धरमदास खिमजी यांचे ते नातू असून, त्यांच्या गिरणीच्या मालकीत त्यांची भागिदारी होती. लग्नाच्या वेळी माझे वय सोळा आणि त्यांचे एकोणीस होते. त्यांना संगीताचा फार शौक होता. ते मला गाण्याच्या बाबतीत प्रोत्साहन देत असत; पण मी पैसे घेऊन जलसा करणे, हे मात्र त्याना पसंत नव्हते. त्यामुळे अशा कार्यक्रमाना ते हजर रहात नसत. मी जेव्हा बैठकीसाठी किंवा जलश्यासाठी बाहेर जात असे, तेव्हा गाडी आणि चौकीदार यांचा बंदोबस्त ते ठेवीत असत. मला अठ्ठावीस वर्षे त्यांचा सहवास लाभला. माझ्या आईचे त्यांच्यावर पुत्रवत् प्रेम होते. अशा रीतीने आमचा संसार फार सुखाचा झाला. आम्हाला झालेल्या मुलांपैकी फक्त श्रीपाद वसनजी हा आमचा मुलगा आज हयात आहे. व्यापारात पैसे गेल्यामुळे माझ्या यजमानांच्या मनाला फार मोठा धक्का बसला. त्याचा परिणाम त्यांच्या प्रकृतीवर होऊन दि. ३ जुलै १९२७ रोजी ते ॲनिमियाच्या विकाराने गेले. त्यांच्या कर्जाचा बोजा जवळ जवळ दहा लाख रुपये होता. मी आपली इस्टेट विकून तो फेडला. म्हणूनच आज मला ही दयनीय अवस्था आलेली आहे.' श्रीमती अंजनीबाईंच्या मातोश्रीना वयाच्या अवघ्या तिसाव्या वर्षी आणि त्याना स्वतःला चव्वेचाळिसाव्या वर्षी वैधव्य आले. तथापि, हा आघात झाल्यावर, त्या दोघीनीही व्रतस्थ राहून आपले कौटुंबिक कर्तव्य उत्तम रीतीने पार पाडले, हे त्याना भूषणास्पद आहे.

## राजे-महाराजांकडून गुणग्रहण

संगीताच्या क्षेत्रातील श्री. अंजनीबाईंच्या सार्वजनिक जीवनाला मुजफराबाद हॉलमधील कार्यक्रमानंतर सुरुवात झाली. त्यानी मोबदला घेऊन केलेली पहिली बैठक शेठ मंगळदास त्रिभुवनदास यांच्याकडे झाली. मुंबईतील तत्कालीन अग्रगण्य उद्योगपती शेठ गोवर्धनदास गोकुळदास तेजपाल हेही त्यांच्या गाण्याचे चहाते होते व कोणताही नवीन राग त्यानी गाऊन दाखविला म्हणजे ते मोठ्या कौतुकाने त्यांची उत्तम संभावना करीत असत. बडोद्याचे श्रीमंत सयाजीराव गायकवाड, ग्वाल्हेरचे श्रीमंत माधवराव शिंदे, इंदूरचे श्रीमंत तुकोजीराव होळकर, कोल्हापूरचे श्रीमंत शाहू छत्रपती, कच्छचे महाराज, पालनपूरचे नवाब, नेपाळचे सेनापती राणा चंद्रसमशेर जंग बहादुर इत्यादि राजेरजवाडे त्यांच्या गायनावर लुब्ध होते. दि. ४ जानेवारी १९६८ च्या आपल्या पत्रात श्री. अंजनीबाईंनी या राजाश्रयासंबंधी असे लिहिलेले आहे की, "बडोदे सरकार सयाजीराव गायकवाड यांचा माझ्याशी संबंध वडील आणि मुलगी असा होता व शेवटपर्यंत त्यानी मला तशीच वागणूक दिली. दरवर्षी ते मला साडीचोळी आणि नजराणा मुलगी या नात्याने करीत असत. विलायतेत असतानासुद्धा ते हे कन्याधन नियमाने पाठवीत त्यानी मला वर्षासनही देऊ केले होते, पण मी ते नाकारले. इंदूरचे तुकोजीराव महाराज यानी मला बहीण मानले आहे. अजूनही ते येथे आले, म्हणजे माझ्या मुलाबाळांना भाऊबीजेची भेट देतात. पालनपूरच्या नवाबसाहेबाना मी 'पप्पाजी' म्हणत असे आणि ते मला 'छोटी मिराबाई' म्हणत असत. वैष्णव पंथाच्या महाराजानी तर मला लाखो रुपयांच्या देणग्या आणि हिऱ्यामोत्यांचे दागदागिने देऊन माझा गौरव केला." या माहितीवरून श्रीमती अंजनीबाईना त्यांच्या अलौकिक संगीतसिद्धीमळे ऐन तारुण्यात प्राप्त झालेल्या वैभवाची कल्पना येईल. त्यांच्या दिग्विजयाला प्रारंभ, १९०१ सालच्या वैशाखात, काशी येथे गंगेच्या वार्षिक उत्सवातील जलश्यापासून झाला. या उत्सवाला 'बुढवा मंगल' म्हणतात. काशीतील गर्भश्रीमंत शौकिनांचा हा संगीत नौकाविहार आहे. गंगेला उन्हाळी पूर येण्यापूर्वी फाल्गुन मासातल्या शेवटल्या मंगळवारी तो साजरा करण्यात येतो. आठवडाभर चालणाऱ्या या उत्सवात "बजरोंपर" म्हणज वरती छत असलेल्या क्रीडानौकात बसून काशीतील गणिका आपले नृत्यगायनादि कार्यक्रम या शौकिनाना सादर करतात. त्या वेळी त्यांच्या अंगावर अत्तरगुलाब शिंपडण्यात येते, गुलाल उधळण्यात

येतो व विदागीही चांदीची तबके भरभरुन देण्यात येते. काशीतील वैष्णवाचार्य गोस्वामी श्री. जीवनलालजी महाराज आणि त्यांचे सात बंधू यांनी या उत्सवासाठी श्री. अंजनीबाईना खास आमंत्रण देऊन काशीला बोलाविलेले होते. या आमंत्रणाचा स्वीकार करुन ही अठरा वर्षाची तरुण गायिका आपल्या मातोश्रींसह काशीला गेली. त्यांचे तबलिये श्री. नरहरि मांद्रेकर व सारंगिये श्री. गोविंद-रामजी अजीमबक्ष, श्री. अब्दुल अजीज आणि श्री. रघुनाथजी हेही त्यांच्याबरोबर होते. काशीला झालेल्या या जलश्यात आणि त्यानंतर १९०२ साली मथुरा येथे यमुनेच्या उत्सवाच्या वेळी झालेल्या दुसऱ्या जलश्यात श्री. अंजनीबाईच्या गायकीचा जो प्रभाव पडला त्यामुळे संपूर्ण उत्तर भारतात त्यांची कीर्ती पसरली. त्या काळी गायकाचा सर्वात मोठा बहुमान करावयाचा म्हणजे त्याला 'गिनी' या सोन्याच्या इंग्रजी नाण्यांनी ओवाळून ती नाणी त्याच्या अंगावर उधळण्याची प्रथा असे. तदनुसार श्रीमती अंजनीबाई या उत्तर भारतात दिग्विजय करुन परत आल्यावर, मुंबईतील तत्कालीन नामवंत गोवेंकर गायिका श्रीमती बापुबाई ताराबाई वेलिंगकर यांच्या घरी, ज्यावेळी त्यांची बैठक झाली, त्या वेळी गिनीनी त्यांचे औक्षण आणि उधळण करुन त्यांचा सन्मान करण्यात आला. ✰ ✰

## श्रीनारायणमहाराजांची कृपा

श्रीमती अंजनीबाईच्या कीर्तीचा मध्यान्ह अशा रीतीने तळपत असतानाच त्याना अचानक एक दिवस ख्रग्रास ग्रहण लागले. १९०२ सालचा हा प्रसंग आहे. दि. २२ डिसेंबर १९६७ च्या पत्रात आपल्यावर अकस्मात् ओढवलेल्या या आपत्तीचे बाईनी असे वर्णन केलेले आहे की, "शेठ गोवर्धनदास तेजपाल यांच्याकडे मी एकदा जलश्याला गेले होते. अनेक नामवंत मंडळी उपस्थित होती. मी गाऊन घरी आले. मला तिथे दूध देण्यात आलेले होते. त्यात काय घातलेले होते– समजत नाही; पण मी तिथून घरी आले आणि गाय-काचे सर्वस्व जो आवाज तो गमावून बसले. माझी आई आणि यजमान याना पराकाष्ठेचे दुःख झाले. त्यानी वैद्य, डॉक्टर, हकीम, मांत्रिक वगैरेचे उपचार केले. हजारो रुपये त्यात खर्च झाले. पण आवाज परत येण्याची चिन्हे काही दिसेनात. मी हताश झाले. जीवनात रस वाटेना. मी श्रद्धाहीन होऊन गेले होते. एकलकोंडी बसून राही. मोठयाने बोलले की, तोंडातून रक्त पडे. माझी ही अवस्था पाहून माझ्या चहात्यां मंडळीना चैन पडेना. शेवटी सॉलिसिटर कोठारेसाहेब, विनायकराव मुळगावकर प्रभृति माझे हितचिंतक केडगावला श्रीनारायणमहाराजांकडे गेले. महाराजांचे वय त्या वेळी १३–१४ वर्षांचे होते. लंगोटी लावून ते बालवृत्तीत मस्त असत. त्यांच्या कानांवर ही गोष्ट घालताच ते म्हणाले, "एवढं काळजी करण्या-सारखं यात काहीही नाही. तिचा आवाज परत येईल, पण तो परत आल्यावर ती मला गाऊन दाखवील का?" त्यावर ही मंडळी म्हणाली, 'जरूर गाऊन दाखवील, पण आपण कृपा करा तिच्यावर!' तेव्हा महाराजानी अंगारा, तीर्थप्रसाद, खडीसाखरेचा खडा आणि लवंग दिली. ती मंडळी तडक केडगावहून मुंबईस आली. मी त्यावेळी भाविक नव्हते आणि बुवाबाजीवर तर माझा मुळीच विश्वास नसे. तरीसुद्धा माझ्या मातोश्री, पति आणि हितचिंतक यांच्या आग्रहास्तव केडगावहून आणलेल्या त्या सगळ्या प्रसादाचे मी सेवन केले. त्याबरोबर माझा आवाज सुटला आणि एकदम पहिल्यासारखा झाला. मी त्या दिवशी मुंबईत अन्नपाणी न घेता तडक केडगावला गेले आणि महाराजांसमोर तीन तास भजन केल्यावर मगच अन्नग्रहण केले. त्या वेळेपासून माझी महाराजांवर नितांत श्रद्धा जडली." या घटनेनंतर श्री. अंजनीबाईनी, केनेडी पुलाच्या रस्त्यावरील छोटी बंगली १९०४ साली खरेदी करुन, तिला 'नारायण आश्रम' असे नाव दिले व १९०७ साली महाराजांच्या हस्ते आश्रमाची वास्तुशांत केली.

श्रीमती अंजनीबाईच्या जीवनात पुढे जे परिवर्तन घडून आले, त्याचा हा प्रसंग प्रेरक आणि प्रारंभ ठरला. त्या महाराजांच्या चरणी लागल्यापासून नारायण आश्रम हेच त्यांचे आवडते निवास-स्थान होऊन बसले व चातुर्मास संपल्यावर महाराज केडगावहून मुंबईस येऊन आश्रमात रहात असत. ते अतिशय संगीतलोलुप होते. त्यामुळे त्यांचा मुक्काम आश्रमात असला, म्हणजे श्री. अंजनीबाईना पांच–सहा तास त्यांच्यापुढे भजन करावे लागे. अर्थात् त्या प्रमाणात बाईचे जलशाचे कार्यक्रम साहजिकच कमी होऊन गेले. त्यामुळेच बहुधा, महाराजांच्या आज्ञेपायी त्यानी गाणे सोडले, असा प्रवाद उठला असावा. तो प्रवाद कानांवर आल्यामुळे खवळून जाऊन गायनाचार्य पं. रामकृष्णबुवा वझे यानी एकदा असे उद्गार काढले की, "त्या रांडेच्याला गाण्याची काय चव? म्हणे गाणे सोड! याचे काय



## माझे मला कळेना

आलो इथे कशाला माझे मला कळेना
या बेगडी जगाशी हा सूरही जुळेना

नाकारिले फुलांचा बाजार मांडणे मी
म्हणुनीच संकटांची माध्यान्ह ही टळेना

झेलून घाव सारे केली अपार प्रीती
पण प्रीतिचा हिशोबी व्यवहार आकळेना

ही रक्त शोषणारी सिंहासने सभोती
सत्तेपुढे अशा या माझा दिवा जळेना

धनवन्त पत्थरांच्या दिसल्या अमाप राशी
दगडात देव कोठे शोधूनही मिळेना

मी हाक घातली अन् माझेच शब्द आले
माझ्या घरावरोनी काळोख हा ढळेना

मी आसवात माझ्या ही चिंब रात्र केली
पण ध्यास लागलेला तो चंद्र आढळेना

आलो इथे कशाला माझे मला कळेना
या बेगडी जगाशी हा सूरही जुळेना

—मंगेश पाडगांवकर

दोन चव्वल खर्च झाले? याला मिळवायला काय श्रम पडले आहेत, म्हणून हा एक चांगली कला सोड म्हणतो? नारद–तुंबर काय करीत होते? उर्वशी, मेनका, रंभा काय गात नव्हत्या? का या रांडेच्याच्या घरी त्या भांडी घाशीत होत्या? एक चांगली गाणारी गेली याचे दुःख आम्हाला! या अरसिकाला त्याचे काय?" पण बुवांचा हा जळफळाट अनाठायी होता. बाईंना गाणे सोडावयाला जशी अध्यात्मिक तशीच सामाजिक आणि सांसारिक कारणेही झालेली दिसतात. ही कारणे त्यानी स्वतःच अशी सांगितलेली आहेत की, "१९२३ साली मी मैफली करण्याचे अजिवात सोडून दिले. याला अनेक कारणे झाली. माझ्या बहुतेक मैफली राजेरजवाड्यांकडे होत असत. त्यातले काही अत्यंत दुर्व्यसनी होते. त्यांचे मला अनेक वाईट अनुभव येऊ लागले. कित्येक वेळा तर मी मोठमोठ्या संकटातूनही सुटले. या अनुभवामुळे अशा मैफली घेण्याचे धैर्य मला होईनासे झाले. मी असा विचार केला की, या सगळ्या खटपटी केवळ पैसा मिळविण्यासाठीच करावयाच्या ना? मजजवळ तर या वेळेपर्यंत आयुष्यभर पुरेल एवढा पैसा झालेला होता. म्हणून मला असे वाटले की, आता यापुढे या दगदगीत पडाच कशाला? आपण गाणे शिकलो, ते आपल्या स्वतःच्या, मित्रांच्या आणि चहात्यांच्या आनंदासाठी. ती मंडळी तर केव्हाही माझ्या घरी येऊन माझे गाणे ऐकू शकत होती. मग जाहीर मैफली कशासाठी करावयाच्या? हे झाले एक कारण. दुसरे कारण असे की, या वेळेपर्यंत माझी वृत्ती अध्यात्माकडे जास्त झुकत चाललेली होती. खुद्द महाराज माझ्या घरी येऊन नेहमी राहू लागल्यामुळे त्यांच्या शिष्यगणाचा रावता आमच्या आश्रमात नित्याचा झाला होता. त्यांच्या सहवासात निव्वळ गाण्या-बजावण्यापेक्षा, मला भजन–पूजनाचा आनंद घेण्यात आपल्या जीवनाचे अधिक सार्थक आहे, असे वाटत चालले होते. त्यामुळे मी शेवटी सार्वजनिक कार्यक्रम घेणे सोडून दिले. बाईंच्या मनोवृत्तीत हा बदल होत असतानाच त्यांच्या कौटुंबिक स्वास्थ्यावर एकामागून एक असे तीन दारुण आघात झाले. त्यांच्या यजमानाना व्यापारधंद्यात जबरदस्त ठोकर बसली. तिच्यामुळे रक्तक्षय होऊन १९२७ साली त्यांचे देहावसान झाले. बाईंच्या मातोश्रींवरही या दुर्घटनांचा परिणाम होऊन दि. ३० मार्च १९३० रोजी त्या दिवंगत झाल्या. त्यांच्या शेवटल्या इच्छेनुसार श्री. अंजनीबाईंनी त्यांच्या अंतसमयी त्याना तीन तास आपले गाणे ऐकवले. त्यानंतर जो तंबोरा त्यानी हातातून खाली ठेवला, तो कायमचाच! दि. ३ सप्टेंबर १९४५ रोजी श्रीनारायणमहाराज समाधिस्त झाल्यावर त्यानी भजनपूजन करणेही सोडून दिले. अशा रीतीने क्रमाक्रमाने त्यानी संगीतसंन्यास घेतला.

### संगीताचा समारंभपूर्वक संन्यास

श्रीमती अंजनीबाईंनी संगीताची साधना जशी समारंभाने सुरू केली, तसाच त्याचा संन्यासही समारंभाने घेतला. या समारंभाचे वर्णन त्यांनी स्वतःच असे केलेले आहे की, "१९२३ साली मी मैफली करणे अजिवात सोडून दिले. मात्र त्यापूर्वी मी सर्व तीर्थयात्रा केल्या व प्रत्येक क्षेत्राच्या ठिकाणी माझे गाणे परमेश्वराला ऐकवले. यात्रेहून परत आल्यावर मी शेवटची मैफल मुंबईच्या नगरभवनात केली. त्या मैफलीला माझे मित्र आणि चहाते हजर होते. मला वाटते, त्या शेवटल्या बैठकीत २५,००० रुपयांपेक्षा जास्त बिदागी मला मिळाली असावी." महाराज गेल्यापासून मानसपूजा, जप आणि मौन एवढीच काय ती उपासना या वृद्धापकाळात त्या आता करतात. दि. ४ जानेवारी १९६८ च्या पत्रात त्यानी असे लिहिले आहे की, "महाराज गेल्यावर मला सगुण भजन–पूजनात रस वाटेनासा झाला. आता मी फक्त मानसपूजा करते. दुपारी एक वाजल्यापासून चार वाजेपर्यंत माझे मौन चालू असते. संध्याकाळी माझ्याकडे गाणे शिकावयाला किंवा आपले गाणे मला ऐकावयाला माझे चाहते आणि विद्यार्थी सारखे येतच असतात. अशा वेळी हातानी ताल धरून मी विद्यार्थ्यांना माझ्या शक्तीनुसार तालीम देते." अशा रीतीने श्री. अंजनीबाईंनी,

अनुक्रमणिका

चाळिशी लागण्याच्या सुमारास, ऐन तारुण्यात संगीताचा संन्यास घेतला. दैवाची लीला अशी अजब की, त्यानंतर लगेच चार वर्षांनी त्यांचे यजमान श्री. वसनजीशेठ हे दिवंगत होऊन त्याना झालेले लाखो रुपयांचे कर्ज फेडण्याची जबाबदारी बाईंच्या अंगावर येऊन पडली. त्यामुळे एका काळी 'अमीर' असलेल्या या गायिकेवर त्यांच्याच शब्दात सांगावयाचे म्हणजे 'फकीर' होण्याचा प्रसंग ओढवला. दिल्ली येथे दि. १२ मार्च १९५८ रोजी संगीत नाटक अॅकॅडमीतर्फे, राष्ट्रपती डॉ. राजेंद्रप्रसाद यांच्या हस्ते त्याना 'फेलो ऑफ दि संगीत नाटक अॅकॅडमी" ही पदवी देऊन महामंत्री श्री. नेहरू यांच्या उपस्थितीत, मोठ्या थाटाने त्यांचा सन्मान करण्यात आला. संगीत नाटक अॅकॅडमीच्या त्या पहिल्या फेलो आहेत, एवढे सांगितल्याने या बहुमानाची कल्पना येईल. तथापि, ज्या या श्रेष्ठ गायिकेला तिच्या वयाच्या पंचाहत्तराव्या वर्षी आपण ही अत्युच्च पदवी देत आहोत, तिच्या योगक्षेमाची त्या पदवीला शोभेल अशी योजना आपण करावयाला हवी, ही अगदी साधी गोष्टसुद्धा काही आमच्या सरकारला सुचली नाही. वस्तुतः युनिव्हर्सिटी ग्रँट्स कमिशन जेव्हा सेवानिवृत्त वृद्ध अध्यापकाना पुन्हा खास अध्यापक नेमून त्यांचा बहुमान करते, तेव्हा त्याना आपल्या प्रवृत्तीनुसार अध्ययन, संशोधन आणि अध्यापन करता यावे म्हणून त्यांच्या दर्जाला शोभेल असे वर्षासन देत असते. हे उदाहरण केंद्रीय सरकारच्या डोळ्यांपुढे आहे. तरीसुद्धा श्रीमती अंजनीबाईंच्या चरितार्थाची व्यवस्था करण्याचा विचार काही आमच्या सरकारच्या डोक्यात आला नाही. त्यामुळे, सध्याच्या भयंकर महागाईच्या काळात बाईना आपली जीवितयात्रा चालवणे किती कठिण होऊन गेले असेल, हे कोणाच्याही सहज ध्यानात येईल.

**सरकारकडून संभावना—**

१९६३ च्या मार्चमध्ये श्रीमती अंजनीबाईंशी माझा परिचय झाल्यापासून मी मुंबईस गेलो म्हणजे प्रत्येक वेळी त्यांना भेटावयाला जात असे. त्यामुळे त्यांची विकट परिस्थिती माझ्या निदर्शनाला आली. म्हणून सरकारने त्यांच्या चरितार्थाची व्यवस्था करावी, यासाठी मी प्रयत्न सुरू केला. सुदैवाने नागपूरचे नामांकित कायदेपंडित श्री. दादासाहेब हजारनवीस हे १९६५ मध्ये केंद्रीय सरकारच्या सांस्कृतिक खात्याचे मंत्री होते. त्याचप्रमाणे नागपूरचे कर्तबगार आय. सी. एस्. अधिकारी श्री. म. वि. देव हे महाराष्ट्र सरकारच्या शिक्षणखात्याचे सचिव होते. या दोघा सुहृदांच्या तत्परतेमुळे हा प्रयत्न यशस्वी झाला. दि.२५ एप्रिल १९६५च्या 'तरुण भारता'त लिहिलेल्या 'या वृद्ध गायिकेकडे सरकारने लक्ष द्यावे' या संपादकीयाचे कात्रण जेव्हा मी बाईना पहावयाला पाठविले, तेव्हा ते वाचून दि. १ मे १९६५ रोजी त्यानी मला धाडलेले पत्र त्यांच्या बाणेदार वृत्तीचे निदर्शक आहे. या पत्रात त्यानी असे उद्गार काढले होते की, "आपले पत्र व अंकाचे कात्रण बुधवारी मिळाले. पत्र वाचून व आपण केलेली कामगिरी पाहून मनोमन आनंद झाला. त्याबद्दलची कृतज्ञता शब्दांकित करणे सर्वथा अशक्य आहे. परिस्थिती माणसाच्या मनाचा पीळ सैल करू शकत नसावी. कारण, गतवैभवाचा काळ माझ्या अंतःचक्षूसमोरून जरी अस्पष्ट होऊ शकत नसला तरी, त्यामुळेच सद्यःस्थितीच्या अनुभवाची वेदना कितीही टोकदार बनलेली असली व ती बोच कमी करण्याचे साधन माझ्या स्वतःपाशी नाही ही जाणीवही कटु असली, तरी भारत सरकारपुढे वा अन्य कुणापुढेही याचना करणे मला कधीच जमले नसते. भाऊसाहेब, काळाने मला गरीब केलंय्—लाचार नव्हे. त्यामुळेच या बाबतीत काहीतरी होणे आवश्यक आहे, याची जाणीव असूनही मी स्तब्ध होते. कारण, 'मला मदत करा' हे शब्द माझ्या ओठाबाहेर कधीही पडणार नाहीत – हाताने लिहिलेही जाणार नाहीत. अशा वेळी इतर कोणी पाऊल पुढे घातल्यासच ही गोष्ट होणार होती आणि ते काम आपण केलं. खरे पाहता आपला व माझा तसा जिव्हाळ्याचा संबंध कधीच निर्माण झाला नव्हता. असे असता केवळ गुणग्राहकता व निरपेक्षता यांचे पोटी आपण हे काम अंगावर घेतले व ऋणानुबंध म्हणून काहीतरी असतातच याचा पुन्हा एकदा प्रत्यय आला. . . . आपण हाती घेतलेले हे काम यशस्वी होईल की नाही, मला ठाऊक नाही, आणि खरे सांगू, त्याबद्दल मला स्वतःला हर्षही नाही, खेदही नाही. तुम्हाला जेवढे करणे शक्य होते तेवढे तुम्ही केलेले आहे आणि हेच केवढे तरी आहे!" श्री. हजारनवीस आणि श्री. देव यांच्या सहृदयतेमुळे, अवघ्या सहा महिन्यांच्या कालावधीत, हा प्रश्न निकालात निघाला व दि. १ ऑक्टोबर १९६५-पासून पांच वर्षेपर्यंत बाईना दरमहा ३०० रुपये मानधन देण्याचा सरकारी ठराव, दि. २२ ऑक्टोबर १९६५ रोजी त्यांच्या हाती पडून त्यांची चरितार्थाची विवंचना कमी झाली. या ठरावासंबंधी मला दि. ३१ ऑक्टोबर १९६५ रोजी पाठविलेल्या पत्रात बाईंनी असे म्हटले होते की, "मला जाणणारी अनेक माणसे माझ्याभोवती होती – आहेतही. असे असता जी गोष्ट वस्तुतः केव्हाच – यापूर्वीच कितीतरी वर्षे व्हायला हवी होती, ती घडवून आणण्यासाठी आपण अपार श्रम घेतले,— मनापासून धडपड केली. मीच नव्हे, माझे सर्व कुटुंब आपले ऋणी राहील."

☆ ☆

श्री. अंजनीबाईंनी या पत्रात स्वतःला माझे ऋणी म्हटलेले आहे. पण, त्यांचे जे ऋण माझ्यावर आहे, त्याची मुळी त्यांना कल्पनाच नाही. १९१६ पासून १९२२ साली मुंबई सोडून पुण्यास रहावयाला जाईपर्यंत, त्या पाच वर्षांच्या कालावधीत, त्यांच्या भाविक, विरागी व्यक्तित्वाचा जो ठसा माझ्या मनावर उमटला, त्याचे प्रतिबिंब 'मुक्तात्मा' कादंबरीच्या 'अश्रूंचा मुका निरोप' या बत्तीसाव्या प्रकरणातील चंद्रशेखरच्या आईच्या वर्णनात पडलेले आहे. माझा हा पहिला नायक एका गोवेकरणीचा मुलगा म्हणून मी निर्माण केला. 'मुक्तात्मा' कादंबरीचे हस्तलिखित माझे गुरुबंधु श्री. गं. दे. खानोलकर यांच्या हाती ज्या वेळी पडले – विशेषतः 'अँग्लो–मराठ्याची

[ पान ७२ वर पहा ]








# कारागृह

**ख**रपूस भाजलेले मक्याचे कणीस हातात घेऊन ते अधाशीपणे खात जव्वीन माझ्याजवळ उभी होती. दाणा न् दाणा दुधाळ होता, अन् तो कुरतडून कुरतडून खाताना तिच्या आधीच लाडीक असलेल्या ओठांना एखाद्या बाळाच्या जिवणीसारखी मुरड पडत होती. वाटत होते की आपणही तोंड पुढे करावे अन् कणीस ओरबाडण्याच्या मिषाने जव्वीनच्या लुसलुशीत कोवळ्या ओठांचा हलकेच चावा घ्यावा !

कणीस अगदी गरमगरम भाजलेले होते. पण दाणे बकाबका खाण्याची तिला घाई लागलेली होती. तिच्या डोळ्यांत पाणी साचत होते, अन् एखाद्या लहान मुलीसारखी 'हाय्–हुय्' करीत तीआपल्य ाशीच किंचाळत होती. डोळा मारल्यागत माझ्याकडे पाहात डोळ्यांनीच हसत होती.

जव्वीनने तोंडात कोंबलेल्या मक्याचे कणीस पाहून मला एक कल्पना सुचली. तिच्या कानात मी ती बोलून दाखविली, तेव्हा ती वेगळ्याच उंच स्वरात किंचाळली अन् अंगावर लटके शहारे आल्यासारखे तिने केले.

माझेही कणीस भाजून झाले. मनाजोगते मीठमिरची अन् लिंबू मी चोळून घेतले आणि पैसे चुकते केले.

मग हातात हात घालून आम्ही पुन्हा पुळणीतून चालू लागलो. आपोआपच आमची पावले एका लयीत पडत होती; वाळूमुळे आमच्या चालीला आपोआपच आलेल्या संथपणाची ती लय किती छान जुळत होती. जणू आम्ही जुहूच्या त्या पट्टयावरून कबूतरांच्या एखाद्या जोडीसारखे अतिशय सावकाश नृत्य करीत चाललो होतो !

दिवस पावसाळ्याचे होते म्हणून की काय, संध्याकाळ झालेली असूनसुद्धा

**....त्या रात्रीच्या काळाखोत माझ्या पेटत्या शरीराभोवतालचे सारे जगच एक प्रचंड आग होऊन धगधगत होते! कोसळणाऱ्या कवाडांचा आवाज कानांवर पडत होता, मनाला भेडसावून टाकीत होता ! किंकाळी फोडायलाही अवसर नव्हता !........**

आमच्या त्या पक्षीनृत्याला त्या क्षणी कोणी प्रेक्षक लाभलेले नव्हते ! अर्थात् आम्हाला ते कोणी हवेही नव्हते; आमच्या ओळखीचे, आम्हाला एकत्र पाहून आमच्याविषयी तर्ककुतर्क करतील असे परिचित लोक आम्हाला आसपास नको होते. भेटीसाठी कोणता दिवस ठरवायचा, कोणती जागा निवडायची हे जव्बीनला नसले तरी मला कळत होते– सावधगिरीची गरज माझी एकट्याची होती! –आणि त्यामुळे आमच्यावर कोणाच्या नजरा टिपण धरून बसलेल्या नाहीत या खात्रीनेच मी तिचा हात हातात धरून लाटांच्या काठाकाठाने चाललो होतो !

"आता तहान लागणार असेल ! " अखखेच्या अख्खे कणीस चांगले ओरबाडून झाल्यावर गोफणीतल्या दगडासारखे ते दूरवर भिरकावण्याच्या तयारीत जव्बीन होती, त्यावेळी मी म्हटले.

"हो, पण आज मी ती आवरून धरणार आहे! " जव्बीन म्हणाली, "तुझ्या वायकोसारखं, रात्री टेबललॅंप मालवून अगदी झोपी जायच्या वेळेला, पाणी आणून दे म्हणून सांगणार नाही ! "

"अग, पण पाणी तर पीतच राहावं लागतं अशा वेळी! तिची काय चूक आहे?" मी म्हणालो.

"साधी गोष्ट आहे अगदी! रात्रीची झाकपाक झाल्यावर पलंगाजवळच्या टेवलावर पाण्याचा तांब्या अन् फुलपात्र नेमानं ठेवायला काय झालं ? रीत मला माहीत आहे, मग . . ."

जव्बीनला पुढे बोलू न देता मी म्हणालो, "त्यालाही एक खुलासा आहे ! सांगतो मी तुला! पण आधी वसू कुठं तरी! आणि तुला नको असलं तरी मी नारळपाणी घेणार आहे हं ! "

खुशीत आल्यासारखे मी तिच्या दंडाला एक चिमटा काढला. जव्बीन पुन्हा लाडीकपणे किंचाळली, परंतु मला काही बोलण्याऐवजी तिने आपल्या दोन्ही हाताचे पंजे जपानी पंख्यासारखे पसरून आपल्या डोळ्यांवर धरले. क्षितिजावर पाण्यात बुडी घेत असलेल्या सूर्यबिंबाचे मलूल किरणसुद्धा तिच्या नाजुक दृष्टीला जणू असह्य होत होते.

"ती पाहा, ती सपाट जागा कशी एखाद्या सिंहासनासारखी दिसतेय्!" एका उंच, तिरक्या वाढलेल्या माडाच्या पायथ्याशी वोट दाखवीत जव्बीन म्हणाली.

"मला वुवा ती एखाद्या वाकासारखी दिसतेय् !" असे म्हणताना मी चोरून जव्बीनकडे पाहिले, पण माझ्या चिडवाचिडवीच्या डावाला वळी पडण्याचा तिचा इरादा दिसला नाही ! काही असलं तरी वसायला बरी आहे जागा !"

पुन्हा हातात हात घालून, एखाद्या पाश्चात्य नृत्यातल्यासारखी लयबद्ध पावले टाकीत, आम्ही कॉन्क्रीटच्या टाकीसारख्या दिसणाऱ्या त्या सिंहासनावर जाऊन बसलो!

आता माझे दोन्ही हात मोकळे होते. जव्बीनचेही. एक नारळपाणीवाला मोपला येऊन आमच्या पुढ्यात तोंड वेंगाडू लागला.

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

## ज्ञानेश्वर नाडकर्णी

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

जुहूवर आज गर्दी नव्हती, त्यामुळे गिऱ्हाइकाविना त्याचे प्राण कासावीस झालेले होते. जव्बीनने मला मुद्दाम खुणावले, पण मी मानेनेच 'नको' म्हणत त्या विचाऱ्याला पुढे घालविले ! मग मी हलकेच माझा उजवा हात जव्बीनच्या कमरेभोवती टाकीत म्हटले, "काय ग, मला नारळपाणी प्यायचंय् म्हणजे काही ते अगदी तावडतोब नव्हे! आयुष्यात याहीपेक्षा महत्त्वाच्या गोष्टीसाठी थांबायची सवय झालेली आहे मला!"

नकळत माझ्या तोंडून कडू शब्द बाहेर पडले होते. तिच्या वर्मी घाव बसला होता.

त्या क्षणी आम्हा दोघांच्या मनात एकच विचार होता : बारा वर्षे, माझ्या लग्नापूर्वीपासून, आमचे प्रेम चालू होते. आमच्या प्रत्येकन् प्रत्येक भेटीत अगदी नव्याने मला बारा वर्षांपूर्वीची हकीकत आठवत असे. जखम झालेल्या ठिकाणी एखाद्याने जाणूनबुजून टोचकारल्यासारखी ! चारचौघांसारखे मी जेव्हा तिला स्थळ अन् प्रसंग पाहून 'लग्न करू या' असे सुचविले तेव्हा तिने प्रथम आपल्या अगम्य स्वभावाची मला ओळख करून दिली होती. अंग शहारल्यासारखे करीत ती त्या वेळी म्हणाली, "प्रकाश, लग्नाची मला भीती वाटते रे !"

"याचा अर्थ तू माझ्याशी लग्न करणार नाहीस असाच ना ? " मी विचारले.

"मला काहीच सांगता येत नाही ! " जव्बीन म्हणाली, "पण तू थांबू नकोस, प्रकाश! मला नंतर पश्चात्ताप झाला तर तर दोष माझाच समजेन मी! "

जाणूनबुजून जरी नाही तरी एखाद्या लोकप्रिय चित्रपटातल्या नायिकेच्या थाटात तिने हे वाक्य उच्चारले होते. आपण जे म्हटले ते आपल्याला पुरते उमगलेले नव्हते हे जव्बीनला कळून यायला फारसा वेळ लागला नाही ! जेव्हा एके दिवशी माझ्या कचेरीच्या पत्त्यावर रजिस्टर्ड पोस्टाने मी तिला लिहिलेली दहा–पंधरा प्रेमपत्रे परत आली तेव्हा मला तिच्या मनातल्या घालमेलीचा सुगावा लागला. प्रत्यक्ष माझे लग्न लागेपर्यंत तिने सहनशीलता दाखविली. माझ्या लग्नाला हजर राहण्याची औपचारिकताही तिला सुचली. पण खरोखरी माझे लग्न झालेले पाहिल्या क्षणापासून 'आपल्या हातातून हा आता कायमाचा निसटला !' या विचाराने जव्बीनचा पुरता छळ मांडला . . .

आता जुहूच्या किनाऱ्यावरल्या या निर्जन संध्याकाळी आपल्या कमरेभोवती घातलेली माझ्या हाताची पकड जव्बीनने घाईघाईने सोडवून घेतली होती. माझ्या तोंडून नकळत निघून गेलेले कडू शब्द तिच्या जिव्हारी लागले म्हणून नव्हे. तिचा हा जीवघेणा संकोच माझ्या चांगल्याच परिचयाचा होता.

कधीतरी मी जव्बीनला विचारणार होतो, "काय ग, आपण प्रियकर आणि प्रेयसी मानतो एकमेकांना ! माझं लग्न झालं तरी आपलं नातं कायमचं तुटलं



अनुक्रमणिका






नाही ! मग तू आपलं शरीर कां सतत चोरून ठेवतेस माझ्यापासून! मी तुझ्या बोलण्यावर, तुझ्या चालण्यावर, तुझ्या आविर्भावांवर, तुझ्या स्वभावावर दोन हात अंतर राखून प्रेम करावं असं का तुझं म्हणणं आहे ! छे, हा सारा निव्वळ गाढवपणा आहे, जव्वीन!"

जव्वीन माझी बायको असती तर कदाचित् मी समजलो असतो की आसपासचे लोक आमच्या प्रेमचेष्टा पाहतील म्हणून ती लाजते आहे, वावरते आहे ! त्या संध्याकाळी आमच्या जवळपास जुहूला येणाऱ्या लोकांची नेहमीच वर्दळ दिसत नाही हे माझ्या बायकोच्या ध्यानीमनीही नाही– याचे कारण केवळ तिचा नेहमीचा मठ्ठपणा असे मी गृहीत धरले असते ! पण मग मी माझ्या बायकोच्या संकोचाची कदर तरी कुठे केली असती? बिनदिक्कत हाताची बोटे खाली सरकविली असती. रेशमी पातळाच्या तलम पोतामधून स्पर्शाला जाणवणारा तिच्या शरीर-शिल्पाचा उंचसखल भाग आधाशीपणे चाचपला असता, दर वेळी मनावर नव्याने चढणारी धुंदी अनुभविली असती !

पण रूपासुद्धा हे सारे चालू असताना जणू कट केल्यागत मख्खपणे बसून राहिली असती ! आपल्या नितळ गोऱ्या कमरेच्या पन्हळीवरून प्रेमाने, सूचकपणे फिरणारी माझी बोटे तिने आसुसल्यासारखी आपल्या हातात घेतली नसती. उलट लज्जेने– नव्हे, कोडग्या कोरडेपणाने आपले अंग शहारल्यासारखे करीत ती माझ्यापासून किंचित् दूर सरकली असती. आणि मग, आम्हा दोघांच्या हातांच्या पंज्यांचा खेळ काही क्षण तरी लाडीकपणे चालू राहावा अशी इच्छा मनात उबवीत, तसाच काही काळ पशूसारखा तिचे मांसल अंगप्रत्यंग माझ्या अधीर, वेडया, रानटी नखांनी टोचकारीत राहिलो असतो.

लग्नानंतर काही दिवसांनी मी जव्वीनला म्हणालो, "पूर्वी लोक लग्नाला शरीरसंबंध म्हणत माहीत आहे का ? तो शब्द ऐकला की गंमत वाटे! अंगावर शहारेसुद्धा येत ! पण त्या शब्दाची खरी मख्खी कळायला लग्न प्रत्यक्ष व्हावं लागतं!"

जव्वीन अशा वेळी काही न बोलता फक्त मन लावून ऐकत बसायची. तिने तोंड उघडले नाही तरी माझ्या बोलण्याचा शब्दन् शब्द ती कानात साठवीत आहे हे मला कळत असे.

"काय सांगू तुला ?" मी जव्वीनला म्हणे, "माझ्यात अन् रूपात जे काही चालतं त्याचं चित्र मी तुझ्या डोळ्यांपुढं रेखाटलं तर बेभान होशील तू! खरं म्हणजे आमची गुपितं मी तुला सांगितली तर ते पाप ठरेल, नाही का?"

"रूपाशी प्रतारणा करून माझ्याबरोबर तू फिरतोस त्याच्यापेक्षाही मोठं पाप ?" जव्वीनने मला असे विचारले की क्षणभर मी निरुत्तर होत असे.

पण हळूहळू, जे दुसऱ्या कोणाही जिवाला सांगू नये–ज्याचा पुनरुच्चार रूपासमोरसुद्धा करू नये–ते मी सारे निःसंकोचपणे जव्वीनला सांगू लागलो. जणू चोरून विकत घेतलेल्या एखाद्या अतिशय अश्लील कादंबरीतल्या एकापेक्षा एक रसाळ अशा हकीकती तिला सांगत होतो. जरी ती बाहेरून शांत असे तरी आतून खोलवर ती कुठे तरी हलते आहे असे मला वाटे. रूपाची आणि माझी एकेक गोष्ट म्हणजे जव्वीनच्या कानात पडणारी एक ठिणगी होती. . . ती पडली की अंधुकपणे का होईना तिच्या अंतरात, कदाचित तिच्या शरीरातसुद्धा, काहीतरी पेटून उठत होते !

माझा पहिला मुलगा वर्षभराचा झाला त्या सुमाराला जव्वीनने मला विचारले होते, "काय रे प्रकाश ? मूल झाल्यावर रूपा बदलली असेल ? "

मीही कळवळून उत्तर दिले, "हो ग, काय सांगू तुला? लग्न झालं तेव्हा रूपा कित्ती कित्ती passionate होती ! पण आता तिची अवघी आसक्ती ओसरली आहे!"

मग मी तिला सांगितले, की आताशा रूपा आणि मी वेगवेगळ्या पलंगावर झोपतो म्हणून खवचटपणे जव्वीन म्हणाली, "हल्ली डॉक्टर लोक तेच बरं म्हणून सांगतात!"

"ते ठीक आहे ग ! " मी केविलवाण्या स्वरात म्हटले, "पण मुद्दा असा की हल्ली रूपाचं सारं लक्ष तिच्या मुलाकडे असतं! तो मुलगा, माझा मुलगा आपल्या बापाचा चक्क प्रतिस्पर्धी झालाय्!"

बिचाऱ्या रूपाला कल्पनाही नसेल की तिच्या प्रत्येक आलिंगन-चुंबनाचे, तिच्या रुसव्या-फुगव्याचे, तिच्या देहलतेच्या नवनव्या फुलोऱ्याचे चित्र न चुकता दुसऱ्या

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत


दीनानाथ दलाल मेमोरिअल ट्रस्ट

कोणासमोर रेखाटले जात असेल! तेसुद्धा नवऱ्याला नादी लावणाऱ्या एका स्त्रीसमोर, जणू खास तिचाच हक्क म्हणून!

आत्ता, या संध्याकाळी, जव्वीनच्या शेजारी बसल्यावेळी मला आश्चर्य मात्र एकाच गोष्टीचे वाटत होते. रूपाच्या आणि माझ्या प्रणयाची हरेक भरती-ओहोटी एव्हाना जव्वीनच्या परिचयाची झालेली होती. तिच्या कानात आमच्या गुपितांच्या असंख्य ठिणग्या पडलेल्या होत्या. अन् तरीही आग पुरती पेटून का उठलेली नव्हती? आपला स्वाभाविक संकोचसुद्धा जव्वीन अजून झटकून टाकून का देत नव्हती? ती स्वतःशी ... माझ्याशी काहीतरी लपंडाव तर खेळत नव्हती ना?

मी याच विचाराच्या तंद्रीत होतो इतक्यात हाताच्या कोपराने माझ्या कमरेत ढोसून जव्वीनने मला जागे केले. आमच्या पिछाडीला बंगलीवजा इमारतींची एक रांग होती, तिच्याकडे बोट दाखवून तिने मला विचारले, "इथं कोण राहात असेल बरं?"

मला गंमत वाटली. त्या बंगल्यांमध्ये मी स्वतः कधीच गेलेलो नव्हतो, परंतु त्यांचा–माझा परिचय होता! जव्वीनला मी म्हटले, "अग, आपल्यासारखे चोरून प्रेम करणारे लोक वापरतात त्या बंगल्या!"

जव्वीनच्या भुवयांची प्रश्नार्थक चिन्हे वर उंचावली गेली!

"हो, तुला वाटतं त्याच कामासाठी!" मी म्हणालो, "काही तास राहायचं, भाडं भरायचं–क्वचित् बंगलीचं अन् बाईचं दोघांचंही!– अन् मजा लुटायची! व्यवस्था चोख असते!"

मग आंगठा वाकवून तो तोंडाकडे नेत मी पुस्ती जोडली, "ह्याचीही व्यवस्था असते!"

जव्वीनने अंगावर शहारे आल्यासारखे केले. चटकन् ती संधी साधून मी तिच्या पाठीभोवती माझ्या उजव्या हाताचा विळखा घातला, अन् तिला अगदी लगटून बसलो. प्रतिकार करण्याची तिला आता जणू शुद्धच नव्हती. त्या बंगल्यांचा विचार करण्यात तिचे डोके गुंग झालेले होते, अन् तिचा संकोच गळून पडला होता! त्या बंगल्यातून प्रेमचेष्टा करणारी जोडपी त्या घटकेला तिच्या नजरेसमोर वावरत तर नव्हती!

बऱ्याच वेळाने, गुंगीतून सावध होत असल्यासारखे, तिने विचारले, 'तू गेलायस् का रे, प्रकाश, असल्या बंगल्यात कधी?"

"मी? मी कोणाला घेऊन जाणार?" जव्वीनचा उजवा दंड धसमुसळेपणाने चाचपीत मी विचारले.

"तुझ्या बायकोला रे!"

"अग, तुझ्या काहीच ध्यानात येत नाही!" मी खुलासा केला, "लोक इथं घेऊन येतात ते स्वतःच्या बायकोला नाही काही! रूपाला अन् मला असला चोरटेपणा करण्याची गरजच काय? एक बाळंतपणाचा काळ सोडला तर ती अन् मी..."

"हो, खरंच! ते सर्व तू मला वारंवार सांगितलं आहेस!" जव्वीन म्हणाली, "इतर काही नसलं तरी तुझ्या संसाराचं एकूणएक गुपित ऐकण्याचा बहुमान दिलायस् तू मला!"

"आज मात्र तसलं काही बोललो नाही हं आपण!" मी म्हटले.

"हो, आज सगळंच वेगळं वाटतंय्! वेगळं घडतंय! नेहमीची गर्दीसुद्धा नाही जुहूवर!"

सूर्यास्त होऊन बराच वेळ झाला होता. आमचे नीटसे लक्ष नसताना दिवेलागणी-सुद्धा झालेली होती. डावीकडे दूर क्षितिजाच्या पट्ट्यावर मुंबईचे दिवे लुकलुक करीत होते. एका रांगेत असल्यासारख्या दिसणाऱ्या त्या दिव्यांच्या माळा पाहून दूर त्या जागी रोषणाई केलेली आहे की काय असे वाटत होते!

मी मागे वळून पाहिले. त्या बंगल्यांपैकी एकदोन घरात दिवे पेटल्याचे दिसत होते. मी जव्वीनचे लक्ष तिथे वेधू पहात होतो, तर नेमकी त्याच वेळी तिची मान वळली. त्या बंगल्यांमध्ये चाललेल्या प्रकाराबद्दल मला जे काही तिला सुचवायचे होते ते काही साक्षात्कार झाल्यागत तिला अगोदरच कळल्याचे तिच्या नजरेवरून माझ्या लक्षात आले! अन् काय आश्चर्य! जव्वीन लाजून लाजून एकदम लाल झाली!

त्या क्षणी मी कधी नाही ते फार मोठे धाडस केले. माझा हात तिच्या कमरेभोवती होताच; त्याची पकड घट्ट करून तिला खूप खूप जवळ घेतले आणि बेभान झाल्यासारखे तिच्या ओठांवर ओठ टेकले.

ही आश्चर्यांची, चमत्कारांची, साक्षात्कारांची संध्याकाळ... रात्र होती! जव्वीनने त्या क्षणी मला प्रतिकार तर

केला नाहीच, उलट माझ्या मानेमागे आपल्या दोन्ही हातांची गुंफण करीत माझे ओठ जास्तच ठामपणे आपल्या अनोळ्या ओठांवर रोवून घेतले.

मग मी तिच्या कानाशी ओठ नेले आणि घोगऱ्या आवाजात म्हणालो, "हल्ली रूपानं चुंबनाची एक नवीन पद्धत शोधून काढलेली आहे! . . . खरं म्हणजे अलीकडे ती दररोजच नवनवीन पद्धत शोधून काढतेय् ! प्रथम दोन्ही ओठ . . . !"

जव्वीनने मला जास्त बोलूच दिले नाही. आपल्या ओठांनी तिने खरोखरीच माझी जबान बंद करून टाकली ! ती माझ्या मिठीत सुस्तावली. एखाद्या सोललेल्या केळ्यासारखे तिचे अवघे लुसलुशीत शरीर तोंडात टाकावे असे मला वाटले! मघा खाल्लेल्या कणसाची मला आठवण आली . . . थेट त्या कणसाप्रमाणे गच्च भरलेले माझ्या जव्वीनचे अंग कणसाप्रमाणेच पेटत्या निखाऱ्यांनी वेढले जात होते. स्वतःच पेटता निखारा बनून राहिले होते!

"आपण जाऊ! मला भीती वाटते!" विव्हळल्यासारख्या स्वरात जव्वीन मला म्हणाली, "कारमध्ये जाऊन बसू, प्रकाश!"

आम्ही दोघेही बसल्या जागेवरून उठलो. आम्ही ज्या माडाच्या तळाशी बसलो होतो तेथे काळ्या शाईची दौत सांडल्यासारखा अंधार भरून राहिलेला होता. मागल्या बाजूच्या बंगलीचे दिवे, डावीकडच्या क्षितिजावरील शहरचे दिवे, पलीकडे उजवीकडे अधूनमधून तेवणारे म्युनिसिपालिटीचे दिवे हे सर्वच त्या काळोखामुळे आम्हाला फार प्रखर भासत होते.

एकमेकांना कवटाळलेल्या स्थितीतच, चालायला अडचण होत असतानाही, जव्वीन आणि मी हळूहळू कारकडे जाऊ लागलो. आमच्या धिम्या चालण्याची लय नृत्याचीच होती, पण शरीरात घुमसत होते उन्मुक्त, पिसाट तांडव – एकाचेच नव्हे, आम्हा दोघांचे द्वंद्व ! लॅटिन अमेरिकेत अशीच काही वासनेने पेटलेली, अन् वासना पेटविणारी नृत्ये असतात म्हणे ! तसले नृत्य लपले होते आमच्या सावकाश चालण्यात!

कारजवळ कोणीही नव्हते ! मी दारे उघडली. आम्ही दोघेही मागच्या सीटवर बसलो. खिडक्यांच्या काचासुद्धा वर करायला मला उसंत न देता जव्वीनने मला आपल्या मिठीत ओढले.

अन् मग एकदोन क्षणातच गेल्या साऱ्या ओळखीच्या काळातील संकोचाची भरपाई ती करू पाहू लागली.

मला जेव्हा बोलायची संधी मिळाली तेव्हा मी तिला म्हटले, "जव्वीन, तुला आठवतं? तुझं खरं नांव मला सुरुवातीपासूनच आवडत नव्हतं. खोटं वाटायचं! म्हणून मी तुझं नांव बदललं!"

"हो," जव्वीन म्हणाली, "जव्वीन नांवाच्या कोणा नटीसारखी मी दिसते असं तू म्हणालास! म्हणून तू मला तिच्या नांवानं हाक मारू लागलास!"

मग पुन्हा बराच वेळ आम्हाला काही बोलण्याचे प्रयोजनच राहिले नाही. आपल्या एकेका हालचालीने जव्वीन मला चकीत करीत होती! इतकी की एकदा माझ्या ओठांवर आले होते, "जव्वीन, रूपासुद्धा रंगात आली की तुझ्यासारखीच . . . रूपाच्या गोष्टी ऐकून तर तू धडे नाही घेतलेस ?" पण रंगाचा बेरंग होईल या भीतीने मी बोललो नाही!

पण खरेच, इतके दिवस गप्प राहून आमच्या गोष्टी ऐकणाऱ्या जव्वीनने गुप्तपणे हे अध्ययन केलेले नव्हते ना ?

आणि मग एक क्षण असा आला की आम्हा दोघांचेही भान पार सुटले. आम्ही कारमध्ये आहोत याची शुद्ध राहिली नाही!

त्याच क्षणी अनपेक्षितपणे जव्वीन म्हणाली, "प्रकाश, आपण त्या बंगल्यांपैकी एकात जाऊ या ! रात्र घालवू या!"

ती काय म्हणते आहे याचा बोध मला काही वेळ झालाच नाही!

अज्ञातवासातील पांडवांना कोंडीत पकडू पाहाणाऱ्या लाक्षागृहाप्रमाणे माझे शरीर पेटताना, धुमसताना मला दिसत होते. त्याची तकलादू दारे, तुळया, भिंती धाड्धाड कोसळून पडत होती. अवघ्याची राख होत होती. अन् प्रचंड आगीत काही क्षण एखादी अलिप्त पोकळी टिकून राहावी तसे मनात कोणीतरी क्षीण स्वरात म्हणत होते, "हे खोटं आहे ! तुला माहीत आहे हे खोटं आहे ते! तुझ्या प्रेयसीच्या तू ठेवलेल्या नावाइतकंच ते खोटं आहे!"

पण तितक्यातच त्या पोकळीलासुद्धा त्या राक्षसी ज्वालेच्या जिभांनी चाटून, गिळून टाकायला सुरुवात केली तो स्वर लुप्त झाला.

आणि जव्वीनचा हात हातात धरून मी त्या बंगल्यांच्या दिशेने चालू लागलो तसे मला वाटले, मी त्या तसल्या प्रकारच्या बंगलीत जात नाही तर साक्षात् लाक्षागृहात प्रवेश करीत आहे! आम्हा दोघांची शरीरे ह्या रात्री तिथे भस्मसात् होणार आहेत! पुन्हा सापडणार नाहीत !

जुहूच्या त्या रात्रीच्या काळोखात माझ्या पेटत्या शरीराभोवतालचे सारे जगच एक आग होऊन राहिले होते! कोसळून पडणाऱ्या कवाडांचा आवाज माझ्या कानांवर पडत होता, मनाला पुरता भेडसावून टाकीत होता! किंकाळी फोडायलासुद्धा मला अवसर नव्हता!

आणि जव्वीन ? सतीसारखी, पाच नवऱ्यांच्या विधवेसारखी. ती आगीच्या कुशीत धाव घेत होती. आगीच्याच पावलांनी! ●





अनुक्रमणिका



....चाफ्याच्या वाढलेल्या झाडाने आपली सारी मुळे जमिनीतून काढून फांद्यांबरोबर त्यांचे वोचके वांधले नि ते पाठीवर टाकून खोकत असलेल्या शेळीच्या आवाजात विचारले, 'येतोस मुंबईला? मी आता शिमिटाच्या खोलीत वाढणार आहे....'

सोनू आंगलीने हातात आलेल्या सहा मळकट नोटा दोन-तीनदा सावकाश मोजून पाहिल्या व तितक्याच विनघाईने त्या दोनतीन उलथ्या पालथ्या करून तपासून घेतल्या. होय, सारे ठीक होते. दररोज दोन रुपये मजुरीने तीन दिवसांच्या चुना लावण्याच्या कामाचे सहा रुपये झाले होते. नोटा बरोबर सहा होत्या आणि त्या मळकट दिसल्या तरी त्यांच्यावर तेलाचा डाग नव्हता. त्याला फार समाधान वाटले व त्याने मान हलवली. गिळायची वेळ झाली की मात्र ऐसपैस मांडी ठोकून वसतो झाले, असे म्हणायची आतातरी कोणाच्या बाची प्राज्ञा नव्हती. त्याने नोटांची पुरचुंडी करून जाकीटाच्या खिशात टाकली. गेले दोन तीन दिवस भट्टीजवळ कोणाच्या पुढे तरी तोंड वेंगाडत चहाचा एकादा कप काढायला त्याला तसे काही विशेष वाटले नव्हते, पण आता मात्र एखाद्या राजरोस रोखठोक गिऱ्हाईकाप्रमाणे ऐटीत बसून चहा आणि रोट उसळ मागवावी की काय याचा तो विचार करू लागला.

त्याने हातातील चुन्याची वादली व झाडणी काळजीपूर्वक कोपऱ्यात ठेवली. व तेथल्याच एका खुर्चीवर त्याने शिणले अंग टाकले. त्याचे लक्ष सहज समोरच्या आरशात स्वतःकडे गेले. आणि तो आपला अवतार पाहून त्याला हसूच आले. अस्ताव्यस्त पांढऱ्या केसात कणीवशी खुपसून ठेवलेली, शास्त्रापुरताच आपला गोल आकार सांभाळून असलेली काळी टोपी त्याला अपरिचित नव्हती; परंतु आता ठिकठिकाणी अंगावर चुन्याचे डाग पडले होते आणि अंगावर सांडगे घातल्याप्रमाणे दिसत होते. त्याने हातानेच तोंड पुसले,








व सैलसर अंगाने तो खुर्चीत पसरला. दाण्याना कोंभ सुटावेत त्या-प्रमाणे हनुवटी भिजल्यामुळेच आठदहा लांब केस उगवले आहेत, असली दाढी असलेला एक माणूस शेजारच्या खुर्चीवर बसला होता. आधाशीपणाने खाली वाकून तो वाफा निघत असलेली मसालेदार लालभडक उसळ तोंडात भरत होता आणि प्रत्येक चमच्यानंतर मान वर करत समाधानाने स् स् करत होता. सोनूच्या तोंडाला एकदम पाणी सुटले व आपणही उसळ घ्यायचा त्याला अतिशय मोह झाला. त्याने पुन्हा विचार केला व फार कष्टाने तो बाजूला सारून त्याने फक्त चहाच मागवला.

हॉटेलात फोनो चालू होता पण प्लेट केव्हाच संपून सुई मात्र घरघरत राहिली होती. परंतु तेथे कोणालाच त्याची काही दरकार दिसत नव्हती. मागच्या बाजूला खाण्याच्या जिन्नसांवर माशा मध्येच ठिपक्याठिपक्यांच्या आवाजाच्या तुकड्यांप्रमाणे उडत व पुन्हा निगरगट्टपणे परत जाऊन बसत. त्यातून लाल डोक्याची, हिरव्या अंगाची एक मोठी घोडमाशी आली आणि गरगरत्या प्लेटवर जाऊन बसली आणि स्वतः गरगर फिरू लागली. चारपाच फेऱ्यानंतर जणू कंटाळल्याप्रमाणे ती उडाली आणि घोळक्यात नाहीशी झाली. सोनूला उगाचंच गंमत वाटली. सालं सुई नसताना आम्हाला गाणे कळत नाही, तुला काय कळणार टाळके! त्याला वाटले व तो स्वतःशीच थोडा हसला.

मळकट सदऱ्यातल्या एका वीतभर पोराने चहाचा कप आणून त्याच्यासमोर ठेवला. त्या पोराची गालफडे बसली होती व हात काटक्यासारखे वाळले होते. याच पोराला मघाशी चहा सांडल्या-बद्दल मालकाने मुस्कटात भडकावली होती आणि एकदम गुडघे मोडल्याप्रमाणे ते कोलमडून खुर्चीखाली पडले होते. गालावरची खूण अद्याप जिवंत दिसत होती, चेहरा अद्याप रडका होता. परंतु आता सवय अंगवळणी पडल्याप्रमाणे डोळे मात्र वाळल्या सुपारीप्रमाणे कोरडे होते. त्याच्याकडे पहाताच सोनूला पुन्हा आरशात पाहिल्या-प्रमाणे वाटले व त्याने उचललेला कप पुन्हा खाली ठेवला.

कितीतरी वर्षामागे तो कोकणातून पळून इकडे आला तेव्हा प्रथम तो गाडीअड्ड्याजवळच्या माधवाश्रमात कपबशा विसळायला राहिला होता. तेथे उजाडायच्या आत कामासाठी हाडे गोळा करावी लागत आणि नाटकाचा खेळ सुटला की ती गोण-पाटावर पसरायला पुन्हा वेळ मिळे. कडाक्याच्या थंडीत हाडांच्या अगदी आतदेखील ठणक जागी व्हायची. मग थोडी चाळवाचाळव करत झोपेचे पांघरूण अंगावर ओढतो न् ओढतो तोच राजाभाऊ सगळ्याना लाथेने डिवचत जायचा आणि मग मरगळलेले घोडे पुन्हा दोन पायावर तयार! एखादी बशी जर हातातून निसटून खाली भुईवर पडली की पोट नाही, पाठ नाही, राजाभाऊ अशी करकचून लाथ हाणे की डोळ्यांपुढे हिरव्या निळ्या मेणबत्त्या लागत. अनेकदा मन अगदी आवळून घेऊन सोनू शेजारच्या देवळामागे जाऊन बसे आणि फुसफुसत असलेल्या कुत्र्याच्या पिलाप्रमाणे एकटाच रडत बसे.

त्यावेळची हाडे पोखरत असलेली उपाशी थंडी, आतडी कुरतडत असलेली गारठ भूक त्याला अद्यापही झोपेत आठवे. मग झोप खाडकन् उडे व नंतर अर्धा तास तो घाबरा होऊन चटईवर तळमळत पडे. एक दिवस राजाभाऊच्या मुलीच्या गळ्यातील साखळी नाहीशी झाली. नामू भट्टीवाल्याने तिला खेळवायच्या निमित्ताने आत आणले होते व ती साखळी तटकन् तोडून कनवटीला लावली होती. ते पाहून सोनू एकदम वाचा गेल्याप्रमाणे गप्पगार झाला होता व त्याचे हात थरथरू लागले होते. आता आपण येथून एकदम नाहीसे व्हावे असे त्याला फार वाटू लागले. नामू त्याच्या-जवळ आला व त्याने शांतपणे त्याच्यासमोर एक रुपयाचे झगझगीत नाणे धरले व म्हटले, "तोंड बंद ठेवलं तर सारं ठीक होतं या जगात!"

**— जी. ए. कुळकर्णी**

सोनूच्या भेदरलेल्या अंगातही काहीतरी उसळल्यासारखे झाले.

"मला नको असलं काही शेण." तो धीटपणे म्हणाला.

"नको तर राहिलं, आपलं काय!" खांदे उडवत नामूने म्हटले. त्याने कांदेबटाटे कापायची लांबलचक सुरी उचलली व सोनूचा खांदा पकडून तिची थंडगार धार त्याच्या गळ्याला लावली. पण लगेच ती बाजूला टाकत त्याने आपला रुंद पंजा सोनूच्या अशक्त गळ्याभोवती टाकला व बोटे पसरत म्हटले, "छा:, तुला सुरी तरी काय करायची घेऊन? असा गळा बोटात घेऊन आंगठा दाबला की दोन मिनिटात काम खलास! सारा वीतभर तर गळा आहे तुझा—"

तो निघून गेल्यावर थरथर कांपत सोनू उभा होता. त्याने गबागबा आपले दोन मळके कपडे गोळा केले व त्यांचे बोचके बांधून ठेवले. आता या ठिकाणी रहाण्यास त्यास धैर्य उरले नव्हते. संध्या-काळी केव्हा एकदा राजाभाऊ येतो याची तो वाट पाहू लागला. हातात कामाचा एक रुपया पडला की तो गाडीअड्ड्यातून जाणाऱ्या एखाद्या बैलगाडीतून येथून निसटून जाणार होता.

साखळी हरवल्याचा संध्याकाळी मोठा गवगवा झाला. राजाभाऊने सगळ्याना दरडावून विचारले, पण कोणीच ताकास तूर लावू दिली नाही. मग नामू राजाभाऊला घेऊन स्वयंपाकघरात आला व त्याने सोनूच्या बोचक्याकडे बोट दाखवले. कोणीतरी ते उघडून त्यातील मळके कपडे इकडे तिकडे फेकले. अगदी तळाशी काळ्या टोपीवर साखळी चमकत होती. राजाभाऊने छत्रीच्या लोखंडी दांड्याने हाडांवर खट्खट् आवाज करत सोनूला पंधरा मिनिटे गुराप्रमाणे झोडपून काढले. नंतर नामूने दोन लाथा हाणून त्याला उचलले व सरळ म्युनिसिपालटीच्या गटारात नेऊन फेकले. ती आठवण येताच सोनू अगदी शरमून गेला व अंग अजूनही घाणीने माखले असल्या-प्रमाणे त्याला एकदम किळस वाटू लागली.

ते गाव सुटले. मग अनेक धंदे झाले. त्याने तेलकट बासाच्या दुकानात सायकली पुसल्या, जळाऊ लाकडाच्या वखारीत हाडे ताणत लाकडे फोडली, थेटरात पाठ मोडून बादल्या बादल्याभर केर काढला, मन घट्ट करून दवाखान्यातील घाणेरडी भांडी हाताने स्वच्छ केली, सतत बारीक धागे नाकातोंडात घेत कापसाच्या गिरणीत हाडे झिजवली आणि या साऱ्या पसाऱ्यात शिल्लक राहिले








ते म्हणजे रडका चेहरा, निर्लज्ज होऊन जगलेले ते निर्जीव डोळे आणि सतत खांद्यावर बसलेल्या माकडासारखी वाटणारी ती जळजळीत, कधी न भागणारी भूक . . .

चहा आणणारे पोर केव्हाच निघून गेले होते आणि चहाही निवत चालला होता. बऱ्याच वांझ दिवसानंतर हातात पुष्कळ पैसे मिळाल्याचा आनंदसुद्धा थोडा विझला होता. सोनूने दोनचार घोटातच चहा संपवला व एक विडी काढली. ती त्याने नोटाप्रमाणच उलटसुलट तपासून पाहिली, तिचा दोरा पिळून घट्ट केला व मग त्याने ती पेटवली. आता पुन्हा अंग सुखकारकपणे विसावत गेले आणि खुर्चीतच रुजत चालल्याप्रमाणे त्याला पुन्हा स्वस्थ वाटू लागले.

" काय बा सोनू, अगदी ऐटीत बसलास की सोकाजीसारखा! " कोणीतरी मागून म्हणाले. त्याने मागे वळून बघायच्या आतच बाजूच्या खुर्चीवर मेहबूब येऊन टेकला. त्याच्या माजलेल्या अंगाला नेहमी जाड उग्र वास येत असे, आणि तो स्वतः काही अंतरावर असतानाच त्या वासाने पोटात उमळायला लागे. तो शेजारी येताच सोनूच्या विडीची लज्जतच गेली व तो उठला.

" अरे बस की! " आपल्या अजस्र पंजाने त्याला खांद्यावर दडपत मेहबूब म्हणाला, " काय उसळ मारतोस प्लेटभर ? "

आपली जीभ तात्काळ फितूर होणार असे सोनूला एकदम वाटले व त्याने घाईने मान हलवली; परंतु तो पुन्हा खाली बसला.

" मग काय झालं तुझ्या त्या शेळीचं? " मेहबूब म्हणाला, " बघ, चार रुपयात मामला भागवून टाक! अरे, आता आहे काय तिच्यात? दोन हाडे आणि वीतभर कातडं उरलं आहे सगळं! आणखी थोडे दिवस थांबलास तर चार रुपये तर जाऊ दे, चार पैसे




मिळायचे नाहीत तुला! नुसतं म्हातारं मढं झालंय, खायला घालायची मात्र किटकिट! त्यापेक्षा लावून टाक तिची विल्हेवाट. तुला चार पैसे मिळतील. मला चार पैसे मिळतील. मग कसं म्हणतोस, येऊ आत्ता बरोबर? "

सोनूने पुन्हा निश्चयाने मान हलवली. मेहबूबची ही जिकीर नाही म्हटले तरी गेले दोन महिने चालली होती व त्या अवधीत तो तीन रुपयांवरून चार चार आणे चढत चार रुपयांपर्यंत आला होता. तसे पाहिले तर त्याचे म्हणणे काही चूक नव्हते. शेळी कोरडी तर केव्हाच पडली होती पण शिवाय तिची हाडे वर आली होती आणि ती सतत लांबलचक, खरखरीत खोकू लागली होती. तिला बाहेर सोडायचे दिवस तर केव्हाच संपले होते. मागे देखील ती अनेकदा तरवाळासारखे भटकत कुठच्याकुठे गेली होती आणि दोन-चार प्रसंगी तर सोनूला बाघाचे डोळे हातावर टिकवून तिला कोंड-वाड्यातून सोडवून आणावे लागले होते. ती घरात शिरली की सगळीकडे तोंड घालून घरात सर्वत्र लेंड्या टाकत घाण करत असे. त्यामुळे सारा दिवस तिला काथ्याचा दोर बांधून बाहेरच्या खिडकीजवळ ठेवावे लागे. मग तेथच्या तेथेच फूं फूं करत ती दोन-चार पाने तोडण्याचा प्रयत्न करी. मेहबूबला ही गोष्ट माहीत नव्हती, पण गेल्या आठदहा दिवसात तिला कोपऱ्यापर्यंतदेखील हिंडायची ताकद उरली नव्हती. खरे म्हणजे आता चार रुपये म्हणजेसुद्धा अगदी चांगला चंगळ सौदा होता, पण उघड्या डोळ्यानी तिला कसाबाच्या हातात द्यायचे, या कल्पनेने सोनूच्या अंगावर काटाच आला. नाही म्हटले तरी त्याने तिला ती एक फूट उंच असल्या-पासून वाढवले होते, कोणाकोणाच्या तरी आवारातून चोरून हिरवा चारा आणून तिच्या पुढ्यात टाकला होता, उग्र वासाचे दीड दोन कप दूध प्याले होते. रात्री ओवरीत अंग पसरले की बाजूने येणारा तिचा उग्र दर्प अंगावरील कांबळ्याच्या परिचित वासाप्रमाणे त्याच्या अगदी अंगवळणी पडून गेला होता.

" अरे मेहबूब, ती बात छोड दे. ती राहील, मरेल म्हणे माझ्याच घरात! तिचं काय मला ओझं आहे होय? मी काही तिला कसाबाच्या सुरीखाली देणार नाही. "

" मग बस तर कुल्ले आपटत! चार रुपये घालव आणि मग दे आणखी एक रुपया कुणालातरी तिला घरातनं ओढून न्यायला! " मेहबूब चिडून म्हणाला.

सोनूने व्यग्र होऊन एक झुरका घेतला. त्याला देखील अने-कदा वाटून गेले होते–शेळी एकदाची मेली तर बरे होईल! घरी दत्तू, कमळी तिला एकतरी लाथ हाणल्याखेरीज आत–बाहेर होत नसत. तिच्या पाठीत एक तरी झाडणी घातल्याखेरीज येसूबाईचा कचरा काढून होत नसे. आपल्याला आता काही तिच्याकडे लक्ष द्यायला होणार नाही. तिच्याचप्रमाणे आपणदेखील आता थकून गेलो! तिच्या अंगावर लाथ बसली की ती धडपडत, बांधलेल्या दोरीत ठेचाळत उठायचा प्रयत्न करी आणि तिच्या त्राण नसलेल्या त्या ओरडण्याने त्याच्या मनावर सतत असह्य ओरखडे पडत. मग का देऊन टाकू नये तिला मेहबूबला?

पण मग त्यापुढचे चित्र त्याला डोळ्यांसमोरही नकोसे वाटे. शेळी अद्याप पाय झटकत पडली आहे आणि तिच्या गळ्यावर सुरी फिरल्याने रक्ताचा पाट वहात आहे, मग तिचे डोळे हळूहळू निर्जीव काचेचे होत मरून जात आहेत...

"छे नको, ती राहील माझ्याजवळ!" तो पुन्हा म्हणाला, "तुम्ही कसाब तिचे हालहाल करून माराल."

"हाच वेवकूफपणा आहे तुम्हा लोकांचा!" आपली हातोड्यासारखी मूठ टेबलावर हाणत मेहबूब म्हणाला, "अरे बंदर, आमचा तो धंदा झाला म्हणजे आम्ही माणसं नव्हे होय? की आम्ही शेळी मेंढी जिवंत ठेवून तिचे लचके तोडत बसतो? चल माझ्याबरोबर आत्ता, दाखवतो तुला आम्ही जनावरं कशी मारतो ते! त्याला कळतदेखील नाही, इतक्या समजुतीने ते येतं ठोकळ्या-कडे. सर्रदिशी सुरी फिरली की काम खलास!" लहानसा फुगा बोटात फोडल्याप्रमाणे मेहबूबने मध्येच चुटकी वाजवली, "बघ, माल तुझा, तू मालक. तुझं तू ठरव, आमची काय वळजबरी आहे होय? पण हे बघ, आता तुम्ही माणसं गाव सोडून मुंबईला जाणार, समुद्र बघणार, सिमेंटच्या खोल्यात रहाणार, तेथे जाताना काय शेळीचं मढं घेऊन जाणार होय? तुझा पोरगा तर म्हणत होता की एक भांडंदेखील न घेता तुम्ही लोक शीट वाजवत ऐटीत जाणार म्हणून!"

सोनू एकदम पेटल्याप्रमाणे संतापला व त्याने एक शिवी हासडली.

"ते कारटं आणि केशवराव दोघेही गेले खड्ड्यात! घाम टाकत, स्वत: राबून मी घर बांधलं ते असं फुंकून टाकण्यासाठी होय रे, कसावा?" तो कर्कशपणे म्हणाला, "ते घर म्हणजे मी आहे. मी त्यातच मरणार, माझी शेळीदेखील तिथंच हाडं पसरणार. तू देखील जा त्याच खड्ड्यात तुझे चार रुपये टाळक्यावर आपटत!"

ओल्या जनावरान पाठ हलवावी तसे मेहबूबने खांदे उडवले व तो उठला. त्याबरोबर त्याचा उग्र वासदेखील उठला. बाहेर एक-मेकीला बांधून उभ्या केलेल्या दोन अशक्त हाडकुळ्या गाईना त्याने चक्चक् करत पुढे हाकलले व निव्वळ सवय म्हणून हातातली काठी त्यांच्यावर हाणली. जाताना तो मध्येच थांबला व रस्त्यावरूनच ओर-डला, "घे आठ आणे जास्त! यापेक्षा कोणीच एक पै जादा टिकवणार नाही. तू दोस्त म्हणून देतो बघ पदरचे–" आणि उत्तराची वाट न पहाता तो निघून गेला.

परंतु सोनू स्वतःच्याच विचारात गढला होता. एकमेकीला बांधलेल्या त्या गाई खरे म्हणजे तर मेहबूब येईपर्यंत अगदी मोकळ्या होत्या, पण तरी त्या उधळून कां नाहीशा झाल्या नाहीत? तो बाहेर आल्यावर जणू त्याचीच वाट पहात असल्याप्रमाणे त्या निमूटपणे चालू लागल्या हे कसे? त्याना माहीत होते म्हणूनच का त्याना माहीत नव्हते म्हणून?

**पण केशवरावविषयींचा संताप अद्याप त्याच्यात धुमसत होता. या लड्डू गलपोजीला त्याने पूर्वी कधी पाहिलेसुद्धा नव्हते. पण येसू-**बाईला काकी काकी म्हणत एक महिन्यापूर्वी तो जो घरात शिरला तो घरात पाली सारखा मुक्काम ठोकून बसला. तो मुंबईला ड्रायव्हर होता आणि आपण दोन महिन्याच्या रजेवर आलो असे तो प्रत्येकाला सांगे. त्याच्या हातात झगझगीत घड्याळ होते, त्याचा सदरा रेशमी असे आणि तो आंगठ्या असलेली बोटे मधूनमधून मिजासखोर मिशांवरून फिरवत असे. त्याने येसूबाईसाठी, कमळीसाठी दोन छटेल पातळे, आणि दत्तूसाठी सारे अंग दाखविणारे कसलेतरी तलम कापड आणताच त्याला कुठे ठेवू कुठे नको, असे येसूबाईला होऊन गेले, पण सोनूला मात्र त्याला प्रथम पाहिल्यापासूनच पांढऱ्या पुष्ट अळ्या खाऊन जगणाऱ्या पांढऱ्या पुष्ट आळीकडे पहात असल्यासारखे वाटत असे आणि एकदा कमळीशी फाजीलपणा करताना त्याला पाहून तर त्याच्या डोक्यात कुऱ्हाड घालावी असा इसाळ त्याच्यात निर्माण झाला होता. या भुक्कड केशवरावने घरात तो साप सोडून दिला होता. "तीस वर्षे या गावात काढली, आणि मिळवलं काय? तर हे वाशांचे छप्पर, या चिखलाच्या भिंती!" त्याने कुत्सितपणे म्हटले होते, "चला माझ्याबरोबर मुंबईला. सिमें-टची खोली मिळेल, आराम काम मिळेल आणि राजासारखं रहाल ऐटीत! कमळीसारखी उजवी पोर, पटकन् गिरणीत काम मिळवून जाईल आणि महिन्याला रुपये मोजताना पाठीचे काटे ढिले होतील ढिले! चला मुंबईला."

गंभीर विषयाचा अभ्यास



प्रो. (प्रोप्रायटर) शंकर आचार्य
V.A.S.U

# मुक्ताचार

मुक्ताचार विद्यापीठ

वयात आलेल्यानाच मुक्त प्रवेश
(वयात येणे वयावर अवलंबून नाही)

❀ खास अभ्यासक्रम ❀

१) काणाडोळा (याने डोळा मारणे) खास नेत्रव्यायाम
२) नवताल (चक्चाल नव्हे) नृत्य!
३) मोजमजाह संवर्धन – एक नवा स्वैराचार
४) डे-टु-डे चेंज – याने सौंदर्य लुटा आणि कुटवा
५) शिव्यायन – च्यायला, म्हणजे काय ते प्रत्यक्षच पहा!



















हाऊ प्लेझंट

'बायका बदल' नृत्य

# विद्यापीठ




विद्यापीठाचे सन्मान्य पदवीधर

वासावर वासू






आणि मग, येसूबाईंचे नांव काढत त्यांच्या मागे लागली. पण आता निश्चयेच ठरल्याप्रमाणे तिने तीन घरची मांडी मोडली. सनूचे शाळेत जाणे बंद झाले आणि शेवटचा विश्वासच त्या बोल्यांना सोनूने तसे देणारे एक गिऱ्हाईक सोनूकडे चक्कर टाकून गेले. त्याच दिवशी आपण ओरड करत सोनूने येसूबाईला सांगितले, "हे बघ, त्या तुम्ही केव्हापासून सांगितलंय, तुम्हांलाही बजावून ठेवतो. हे घर मी बापजन्मी विकणार नाही. हाडाची काडं करून मी बांधलंय ते ! हे चाफ्याचं झाड मी स्वतः हाताने लावलंय!"

"त्यालाच आता मग पळवून लावून मग आता," येसूबाई कळकळीने म्हणाली, "काय करायचं आहे ते घेऊन? घराची कधी ओल जात नाही. सदैवाच्या लाकडाला रोग व्हायचा असल्या ठिकाणी! असं सोन्यासारखं गिऱ्हाईक आलंय तर नशीबाची कलटी फिरली पाहिजे नव्हं!"

"मला माहीत आहे तू मला गाजवाड्यात जन्मलीस ते!" सोनू चवताळून म्हणाला होता. "मी एकदाच सांगून ठेवतो. मी हे घर साफ विकणार नाही. मी मरणार ते या ठिकाणी. मग घरात असो अगर चाफ्याच्या झाडाला असो. आता पुन्हा एक शब्द काढायचा नाही त्या गोष्टीबद्दल!"

त्याला वाटले होते एवढ्यावरच सारे मिटून जाईल! पण मग मेहबूबला ते कागदे भेटून पुन्हा तेच सांगत होते; म्हणजे तो किडा अद्यापही घर पोखरत बसला आहे हेच खरे! सोनूचा राग वाढला व आता घरी गेल्यावरोबर त्या मुंबईवाल्याला घरात पाऊल टाकलेस तर तंगडी मोडून देईन अशी तंबी देण्याचा त्याने निश्चय केला.

त्याची बिडी संपत आली होती. शिवाय आता संध्याकाळची झगमगदेखील उतरली होती. तो जायला उठला, तोच खिडकीपाशी उभ्या असलेल्या पोराने शीळ वाजवली. त्यावरोबर हॉटेलमधील इतर नोकरदेखील हातातील काम टाकून खिडकीपाशी आले. घामाने निथळत असलेला भट्टीवाला तर हातात झारा घेऊनच बाहेर आला. त्यांनी खिडकीपाशी घोळका केला व ते एकमेकाच्या खांद्यावर हात टाकून ताणलेल्या नजरेने बाहेर पाहू लागले.

"आली, मारवाड्याची गाडी आली!" एकाने शेजारच्याला कोपरखळी मारत म्हटले, "आणि आज नट्टापट्टा तर दिलखूप फिल्मी रंगीत आहे!"

"करायचा काय घेऊन तो टिनपॉटी नखरा! सालीला शेळीचा वास आहे!" भट्टीवाला तुच्छतेने म्हणाला.

"तुला रे काय माहीत भटा?"

"काय माहीत म्हणजे?" डोळे मिचकावत भट्टीवाला हसला. "एकदा मी दहा रुपयाची नोट गमावून बसलोय बाबा!"

सगळेजण पाचकळपणे हसले व खिडकीतून एकाग्रतेने पाहू लागले.

सोनूला एकदम कुतुहल वाटले व तो थोडूक टाकून इकडे आला.

त्या घोळक्यातील एकाला बाजूला करून तो पुढे जाऊ लागला, तेव्हा भट्टीवाला त्याच्या पोटात बोट टोचत म्हणाला, "काय करता घेऊन असल्या गोष्टी या वयात राव? आता काय पान रंगायचं वय राहिलं होय?"

सोनू मनमोकळेपणाने हसला व पुढे सरकला. समोरच्या रस्त्यावरुन पाठ सारी उघडी टाकून अंग मुरडत एक नितर पोरगी चालली होती व रस्त्याच्या दोन्ही बाजू न्याहाळत मान जादा मुरडत होती. कोणीतरी पुन्हा शीळ घालताच तिने ठुमकत खिडकीकडे पाहिले व भडक फुलांचा टळटळीत गजरा अडकवलेल्या मानेला उघड लटक्या रागाने तिने एक झटका दिला.

सोनूला सारे अंग एकदम पेटल्याप्रमाणे वाटू लागले व त्याचे हात थरथरा कापू लागले. तो जवळच्या खुर्चीवर दणदिशी बसला व त्याने विकलपणे चेहरा हातावर टेकवला. ती निघून गेल्यावर हॉटेलमधली पोरे परत फिरली. त्यातील एकाला त्याने थांबवले व शांत रहायचा प्रयत्न करत विचारले, "ही पोरगी वरचेवर येते होय इकडे?"

तो पोरगा डोळे मिचकावत खिस्सदिशी हसला व म्हणाला, 'तर काय! मंगळवार, शुक्रवार, बयेचा मुक्काम इथंच की! कधी त्या मारवाड्याकडे, कधी त्या शिप्याकडे. मग येथून भजी काय, शेवचिवडा काय बघायला नको. मग सिनेमा! मालक, आहात कुठं? काम मोठं चैनी आहे. जवान घोडी, लाल लगाम, ऐसा मैदान, ऐसा काम!"

अगदी आखडून गेल्याप्रमाणे सोनू किती वेळ बसला हे त्याचे त्यालाच समजले नाही. तो आवेगाने उठला, त्याने चुन्याची वादली उचलली व पैसे टाकून तो रस्त्यावर आला. त्याचा चेहरा शरमेने जळत होता, पण तेवढ्यातही त्याने सराईत धंदेवाईक दृष्टीने झाडणीकडे पाहिले. ती आता झिजून निरुपयोगी झाली होती. ती त्याने गटारात फेकून दिली व तो घराकडे झपाझपा चालू लागला. चालत असता मधूनमधून काही जण आपल्याकडे कुत्सित, जाणत्या नजरेने पहात आहेत असे त्याला सारखे वाटू लागले. गटारातून तो

घाणेरड्या, चिरडलेल्या अंगाने बाहेर आला होता, तेव्हाच्या भोवतालच्या घोळक्यातच आपण उभे असल्याप्रमाणे त्यास वाटू लागले व त्याला मान वर करवेना.

ती पोरगी म्हणजे त्याची धाकटी मुलगी कमळी होती. परवापर्यंत ती मळके परकर नेसून लोकांच्या घरी भांडी घासत असे आणि महिना महिनाभर तिच्या झिज्याना तेल लागत नसे. पण मग ती कुठली तरी मसणी ग्रामोद्योग संस्था निघाली. त्या ठिकाणी दररोज एक रुपया देऊन शिवणकाम शिकवत. कमळीच्या मानेवर दगड ठेवला तरी तिच्या वा लादेखील सुईत दोरा ओवता आला नसता. परंतु तिची मैत्रीण नजमा तिच्याकडे आली आणि त्या दोघी शिवण क्लासला जाऊ लागल्या. पंधरवड्याच्या आतच कमळीच्या अंगावर झकपक पातळे दिसू लागली आणि पाठीवरचा पदर खांद्याच्या अगदी टोकाला ठेवून ती अगदी श्रीमंत गरत्या वायकाप्रमाणे पाठ उघडी दाखवत निर्लज्जपणे मांड्या मोडत रस्त्यावरून चालू लागली. वकावका गिळायला कधी वेळेवर न येणारी कमळी न चुकता शुक्रवारी, मंगळवारी शिवण क्लासला जाऊ लागली.

एकदम जुनी जखम जागी झाली आणि सारे छप्परच कोसळत असल्याप्रमाणे सोनू भांबावला. ती थोरली मुलगी पारू –(तिचे कोवळे मऊ, मक्याच्या कणसातील केसासारखे हात ! तिच्याकडून पायाचे तळवे चोळून घेत असता कापसासारखी झोप लागे ) ती अशीच आपल्या वेशरम मार्गाने निघून गेली आणि सोनूला बरेच दिवस वाहेर तोंड दाखवायला जागा उरली नाही. तो कुठला तरी परजातीचा लोखंडी सामानाचा दुकानदार होता. हातात सुरा घेऊन ओरडत सोनू त्याच्या घरी गेला, तेव्हा त्याने बेगुमानपणे शंभर रुपयाच्या नोटा त्याच्या अंगावर फेकल्या. सोनू एकदम पुढे धावला, पण येसूवाईने त्याला आवरले व सगळ्या नोटा काळजीपूर्वक गोळा करून तो मख्खपणे घरी आली. मग एक दिवस आपले पोर घेऊन पारू बाहेर पडली, ती घरी आलीच नाही.

आता कमळी !

पुन्हा त्याचे अंग हबकून निघाले. वाटेत आपल्याला कोणीतरी हाक मारत आहे, असे त्याला अस्वस्थपणे जाणवले, पण तो तसाच पिसाट कुत्र्याप्रमाणे पुढे गेला व घरापाशी आला. तेथे चापयाच्या झाडाजवळ टाकलेल्या खाटेवर केशवराव ऐसपैस बसला होता आणि येसूबाई व दत्तू बाजूलाच खाली बसली होती. परंतु सोनू आलेला पाहून कोणी हलले नाही की उठले नाही. सोनूने लाथेनेच दार उघडले. केशवरावला असा सोकावून बसलेला पाहून तर त्याच्या कपाळात तिडीक उठली. त्याने रागानेच चुन्याची वादली कोपऱ्यात आदळली व वाटेत एक अल्मीनचे पातेले होते ते लाथेनेच बाजूला भिरकावले. बारीक करून ठेवलेला दिवा त्याने मोठा केला. त्या दत्त्याला तर कपड्यांची किंमतच नव्हती. त्याने आपली चड्डी अशी मध्येच टाकली होती. सोनूने संतापाने ती उचलली व दारातूनच बाहेर फेकली, तेव्हा तिच्यातून दोन सिगरेटी बाहेर पडल्या.

सोनू क्षणभर त्यांच्याकडे पहातच राहिला व एकदम नडकल्याप्रमाणे ओरडला, "दत्त्या, बेरडा, इकडे ये जरा—"

बिजारीच्या खिशात एक हात अडकवून दत्तू येऊन उभा राहिला. त्याने पारदर्शक कपड्याचा सदरा घातला होता व केसाना पाणी लावून ते व्यवस्थित विंचरून त्याने कपाळावर त्यांचा उनाडटप्पू तुरा काढला होता. सोनू लांब टांगा टाकत त्याच्याजवळ आला व बोटे पसरून त्याने दत्तूच्या मुस्कटात दिली. त्या प्रहाराने दत्तू एकदम भिंतीकडे तिरपा झाला.

" कमळी कुठाय ?" सोनूने विचारले.

" ती गेली आहे मार— मला ठाऊक नाही. " मध्येच अडखळत दत्तू उर्मटपणे म्हणाला व गारगोटीसारख्या डोळ्यानी सोकनूडे पाहू लागला. सोनूने पुन्हा एक चपराक देताच तो किंचाळत बाहेर धावला. ते पाहून येसूवाई आत आली व दारातूनच ओरडली, " काय पिऊन आलात की काय ? काय झालं आल्यावरोवर पोराला लाथा हाणायला ?"

" घाल ते पोर खड्ड्यात ! " गळयाच्या शिरा ताणत कर्कशपणे सोनू म्हणाला, "भिकारडं कारटं, एक पै मिळवायची अक्कल नाही. बरोबरीची पोरं शिकली सवरली आणि हा रेडा करतोय काय ? तर नाटकवाल्यासारखं अंग दाखवत केस पुढं आणतो आणि सिगारेटी फुंकत हिंडतो ! "

" जरा आवाज उतरवा की ! घरात पाहुणे आहेत, त्यांच्यासमोर तरी तमाशा नको. " स्वत:चा आवाज कमी न करता येसूबाई म्हणाली.




**गेल्या २ हजार वर्षांत असा संप (व संपादकही) झाला नाही !**

" त्या सिगारेटी केशवरावने ठेवायला दिल्या असतील त्याच्याजवळ, त्यात एवढं भुसभुसायला काय झालं ? तो एवढा तालेवार माणूस, त्याच्यापुढं तरी असं गावढळाप्रमाणे आरडाओरडायला लाज वाटत नाही ?"

" लाज मला की तुला वघ ! " सोनू हात उडवत म्हणाला, "कमळी कुठाय ? ती आली की तिची हाडे सैल करून टाकतो ! गावात मान वर करायला जागा ठेवली नाही भिकारडीने. तीस वर्षे अब्रूने काढली या गावात आणि ही जगांवरून ओवाळून टाकलेली कारटी बाजारबसवीप्रमाणे त्यावर निखारा ठेवायला उठलेय. म्हणे लाज वाटत नाही काय ! तू आणि तुझा तो तालेवार पाहुणा, तुम्ही घाला तुमच्या लाजा चुलीत ! " सोनूने उगाचच बाजूच्या कोनाड्यातील दोन वाट्या उचलून दणादणा जमिनीवर आदळल्या. त्या आवाजामुळे भिंतीपलीकडे असलेल्या शेळीने भेदरलेली हालचाल केली व जुने कापड फाटत असल्याप्रमाणे ती कोरड्या, कातर आवाजात ओरडली.

येसूबाई आत आली व तिने दार ढकलून अर्धवट लावले. ती निर्दयपणे हंसली व हात नाचवत म्हणाली, " मस्त माहीत आहे तुमची अब्रू मला ! आहे हत्तीच्या पायाएवढी अभंड ! आत्ता जाऊन कोठून तरी दहा रुपये उसने आणून दाखवा आणि मग बोला अब्रूच्या गोष्टी ! म्हणे कमळी कुठाय ! ती गेली आहे मसणात ! कशाला पाहिजेत या चांभारचौकशा ? खायला मिळतं नव्हे दोन वेळा ? गिळा आणि गप्प बसा मुकाट्यानं ! "

तिच्या बेगुमानपणाने सोनू खिळल्यासारखा झाला. आपण कमळीला कोठे, कसे पाहिले हे सांगून तिला चकीत करण्याचा त्याचा बेत कोसळला व तो तिच्याकडे पहातच राहिला.

" म्हणजे, ती कुठं जाते, काय करते हे दत्त्याला, तुला ठाऊक आहे











तर !" त्याने अगदी अविश्वासाने विचारले, " मग संपलच की ! आईलाच शरम नाही, तर पोरीला कुठली येणार ? खाण तशी माती . . . " कपाळावर थडाथडा हात मारून घेत सोनू म्हणाला.

येसूबाईने मुठी घट्ट आवळल्या व दातओठ खात दणादणा पावले टाकत ती त्याच्या समोर आली. ती आता रानवटपणे आपल्यावर प्रहार करणार की काय अशी सोनूला क्षणभर भीती वाटली व जणू राजाभाऊसमोरच असल्याप्रमाणे त्याने अंग सावरून सुतळीच्या गाठीसारखे करून ठेवले; पण येसूबाई मुठी आवळून तशीच उभी राहिली व शब्द थुंकत असल्याप्रमाणे म्हणाली, "होय, कमळी जाते मारवाड्याकडे, काय म्हणणं आहे तुमचं ? मी देखील केव्हाच लाज कोळून प्याले आहे, झालं समाधान ? तसं केलं नसतं, तर दारोदार परटं घेऊन भीक मागण्याची पाळी आली असती सगळ्यावर ! तुमचा पगार बघावा तर अगदी साहेबी. सहा महिन्यातून तुम्ही मोप शिप्तरभर दोन रुपये आणणार, मग आम्ही काय पोटाला विब्वा घालायचा होय ? म्हणे तीस वर्षे अब्रूने काढली, काढला असाल की, त्यात काय एवढं मोठं ? दोन वेळ गिळायची ठीक व्यवस्था असली, की अब्रू वासनातनं बाहेर येते कशाला शिदळकी करायला ?"

" हे बघ, मी अगदी भुकेने मरत होतो, तेव्हादेखील सोन्याची साखळी—" सोनू सांगू लागला.

" पुरे ती रडकथा. हजार वेळा तो पराक्रम ऐकून कान किटले माझे ! तुम्ही रुपया घेतला नाही आणि लाथा खाऊन बाहेर पडलात कुत्र्यासारखे! मोठ्ठा दिवा लावलात आभाळात, तुमच्यावर शिणीमा काढायला सांगू या हरिश्चंद्राप्रमाणे ! तीस वर्षे राबलात आणि काय दौलत मिळवलीत ? तर या विळासारख्या दोन खोल्या ! त्यात भिंतीत पिंपळ उगवतो आणि पावसाळ्यात कुत्रं मुतू लागल्याप्रमाणे झरे फुटतात ! आणि दारात शेळीच्या मढ्याचा भरजरी हत्ती. त्या केशवरावाकडे बघून तरी काहीतरी वाटायला पाहिजे मनाला ! चार वर्षात त्याने गावात माडी बांधली, गुरंगोठा केला !" तिने पुन्हा दात आवळले व त्यावरून हात ओवाळले, "आणखी एक सांगून ठेवते. पुन्हा कधी माझी अब्रू काढू नका. तुमच्या आयावहिणींची पुराणं मला चांगली माहीत आहेत. काही झालं तरी मी सुद्धा तुमच्या गावापासून दोन कोसावरचीच बया आहे !"

सोनू एकदम चिडून जाऊन उभा राहिला व त्याचे भान गेल्यासारखे झाले. त्याचे सर्वांग थरथरू लागले व शब्द न फुटता ओठ मात्र बुडबुडल्यासारखे हलू लागले. त्याने खिडकीकडे हात पसरला व तिचे दार उघडे रहावे म्हणून टेकण देण्यासाठी ठेवलेले फळकूट उचलले आणि सारे बळ एकवटून ते त्याने तिच्या कपाळावर आदळले. येसूबाई वेदनेने विव्हळली व जेथे प्रहार लागून रक्ताची धार लागली होती तेथे हात दाबत दरवाजाला ठेचाळत बाहेर आली. तिच्या ओरडण्याने बाहेर शेळी धडपडत उठली व दोरी ताणत बें बें ओरडू लागली. स्वतःशीच काहीतरी ओलसर पुटपुटत सोनू बाहेर आला व वेड लागल्याप्रमाणे तो हातातील फळीचा तुकडा दणादणा शेळीवर हाणू लागला. पहिले दोन तीन प्रहार खट्खट् करत पाठीवरच्या हाडावर बसले व शेळी एकदम बमकली. पण त्याने पुन्हा तिच्या पायावर फळकूट मारताच तिला पायही जवळ घेता येईनात. ती जमिनीवर पसरली व मान ताणत घरघरीत खोकू लागली.

" मरतही नाही एकदाची कटकट !" सोनू म्हणाला व आत आला.

पण आत आल्यावर मात्र तो एकाद्या मळक्या चिंधीसारखा गळाला आणि बावळटपणे तोंड उघडे टाकून ऱ्हमिष्टासारखा बसून राहिला. आई वहीण . . .

बादशाही मटण खानावळीचा नानू कदम वेळी अवेळी घरी येत असे. तो घरात आला की अर्धांगाने एक पाय गेलेला सोनूचा बाप त्याला हाताला धरून वीरेश्वराच्या देवळाकडे न चुकता जायला निघे. मग तासा दोन तासांनी तो परतला की नानूने आणलेला मटण रस्सा ओठ ओले करत तो समाधानाने खात बसे. काही वेळा जर आठवडाभर नानू आला नाही की तो सारखा चौकशी करी. मग पळत जाऊन सोनूला खानावळीत निरोप सांगून यावा लागे. भोवतालची माणसे फिदीफिदी हसत व मग सोनूचे डोळे रडकुंडे होत. बाप एकदाचा वारला. शेवटी तो बोबड्या अडखळत शब्दात काय बोलत होता हे कुणालाच समजले नाही. मग एकदा आई नानू कदमाबरोबर मुंबई बघायला गेली ती परतलीच नाही. घरी थोरला वेडसर भाऊ, हातभर वहीण, दोनचार चिरगुटे, रिकामी गाडगी ! मग एका पहाटे सोनूने घर सोडले. भाऊ अस्ताव्यस्त झोपला होता, वहीण अंग आखडून लुगड्याचे चिरगूट पांघरून झोपली होती. रात्री कोणीच काही खाल्ले नव्हते. त्याना तसेच टाकून जाताना त्याच्या पोटात खळगा पडला होता. नंतर दहाबारा वर्षे तो घरी परतलाच नाही. भाऊ वहिणींची आठवण झाली की त्याची आतडी गोळा होत. पण आपले बूड कुठेतरी टेकले की त्याना आणावे असे म्हणता म्हणता दिवसाला दिवस लागून वर्षे निघून गेली. मग एकदा सुट्टी घेऊन तो गावात आला. भाऊ वारला होता. झावळ्याचे घर नाहीसे झाले होते. वहिणीने मोटर स्टँडवर पानपट्टीचे दुकान लावले होते. तिला पहाताच शरमून शेण झाला. पान खाऊन लाल झालेले ओठ, गळ्यात पुतळ्यांची माळ, दंडात रुतलेली चोळी ! तो गेला, त्यावेळी दोन ड्रायव्हर फळीवर बसून खिदळत होते. त्याला पहाताच वहिणीने एक पिंक टाकली व म्हटले, " कां इकडं बरं फिरकलास ? ठीक आहे नव्हे सगळे ?"

तो गप्पच राहिला. बोलण्यासारखे काही उरले नव्हते. तास गेला दोन तास गेले, तसा तो उठला, आठदहा दिवस रहायच्या तयारीने तो आला होता, पण आता त्याचे मनच मेले होते. "उद्या राहिलास तर ये की !" त्याची वहीण म्हणाली व व्यापारात गुंतली. तो उठला व बसकडे आला. सकाळी त्याला घेऊन आलेली बसच संध्याकाळी परतणार होती. जाताना काही तुटल्याची देखील वेदना न होता सारे संपून गेले होते. त्याच्या मनातील वहीण थंडीत अंग आखडून लुगड्याचे चिरगूट पांघरून झोपली होती व तिचा निरोप घेण्याचे त्याला

अनुक्रमणिका








व तो चटईवरच्या गोणपाटावर आडवा झाला. केशवरावने कंदील किंचित् बारीक केला व तो बाहेर येत म्हणाला," पडा आता काका, डोकं थोडं थंड होऊ द्या."

तो बाहेर आला व वळचणीला उभा राहिला. त्याच्या पाठोपाठ यसूबाई व दत्तू बाहेर आली व त्याच्या शेजारी उभी राहिली. थोडा वेळ कोणी बोलले नाही. तेव्हा येसूबाईच म्हणाली, " केशवराव, खाऊन घेतोस नव्हं थोडं. पोराचं झालंय, पोरगी जेऊनच येईन म्हणाली होती."

केशवराव तंद्रीतून बाहेर आला व त्याने दत्तूच्या पाठीवर थाप मारली. "खाऊन झालंय होय रे तुझं ? मग सिनेमाला बिनेमाला जातोस काय बघ." त्याने एक नोट काढली व दत्तूला दिली. "जा, घे हा रुपया, आणि चैन कर बेटचा ! मार खाल्लास तर खाल्लास, मग सिनेमा तरी बघ ऐटीत ! आणि हे बघ, विड्या फुंकू नकोस आणखी"——

दत्तू खजीलपणे हंसला व आत जाण्यासाठी वळला.थोड्याच वेळात तो कपडे घालून आला. त्याने गळ्याभोवती रंगीत हातरुमाल गुंडाळला होता व केसाचा तुरा जास्तच उठावदार केला होता.

" आणि ती पोरगी भेटली तर सांग, आज कुठेतरी रात्र काढ म्हणून ! बाप भडकला आहे म्हणावं !" तो जात असता केशवराव म्हणाला.

त्यानी वचावचा दोन घास गिळले. केशवरावने बाहेर एक सतरंजी टाकली व तो त्यावर वसला. येसूबाईने पानाची चंची काढली व ती त्याच्यापुढे टाकून ती स्वतःजवळच वसली. केशवराव काहीतरी बोलेल म्हणून ती मघापासून वाट पहात होती पण तो मात्र सिगरेट काढून शांतपणे ओढत वसला होता. आता सोनूच्या खोलीतून दाराच्या फटीत मंद केलेल्या प्रकाशाची सुतासारखी रेषा मात्र दिसत होती. आणि जणू तिलादेखील फुंकून टाकण्याचा प्रयत्न करत असल्याप्रमाणे बंद खिडकीबाहेर शेळी सतत लांब घोगरे खोकत होती.

" काकी, हे प्रकरण सहजासहजी मिटायचं नाही, " मध्येच केशवराव म्हणाला, " पोलीसात उद्याच्या उद्या फिर्याद करीन म्हणतो तो. आणि खरं सांगू ? पोलीसापासून जरा दूर रहाणंच माझ्या धंद्याच्या दृष्टीने फायद्याचं आहे. परंतु मी काही म्हातारा मरेपर्यंत मुक्काम ठोकून वसणार नाही. शिवाय माझे चारशे रुपये तरी तुझ्याजवळ किती दिवस अडकून ठेवू ? आणखी एक बघ काकी, मी आपला घडाघडा स्पष्ट बोलणारा माणूस ! पोरगी जशी उफाड्याने वाढते, तशी ती सुकतेदेखील उफाड्यानेच. आणखी चारपाच वर्षे अशीच गेली की तिच्याकडे कुत्रे देखील ढुंकून पहाणार नाही. आत्ताच आलात माझ्यावरोवर तर तिचं बस्तान वसेल, तू देखील कुठंतरी पान तपकीरीचं दुकान घालशील तेव्हा तुझं तू बघ आणि ठरव आता. मी चालल्लो परत येत्या आइतवारी. "

येसूबाई चिडून म्हणाली, "मग मी तरी काय करू सांग ? मढं मरतही नाही एकदा, म्हणजे मी तरी सुटेन. वीस पंचवीस वर्षे काढली मी या खातेऱ्यात. कसली अन्न नि काय ! कधी धड धडोतं लागल नाही अंगाला, की कधी ढेकर आली नाही पोटाला ! माझं जसं, तसंच त्या पोरांचं ! मघाशी तू उगीच आडवा आलास बघ. मी एकदा सारं कायमचं मिटवून टाकलं असतं वघ!"

" होय, आणि गेली असतीस फासावर ! मग ते करून फायदा काय तुला ?" केशवराव म्हणाला, " धडक देऊन स्वतःचं डोकं देखील फोडून मरायचं, हे रानडुक्कराचं काम. आपण पडलो माणसं, आपलं तसलं काम नव्हे काकी !"

" मग मी करू तरी काय सांग ?" आक्रस्ताळीपणाने येसूबाईने विचारले.

"आम्ही जर उद्या तुझ्याबरोबर निघालो तर तो पोलिसात जाऊन गांवगन्ना करेल की !"

" छे छे, ते तर बिलकूल उपयोगी नाही. आपलं काम तर मांजराच्या पावलानी व्हायला पाहिजे. " केशवराव म्हणाला, पण तो मध्येच एकदम गप्प झाला व हाताच्या बोटांची उघडझाप करत त्यांच्याकडे पहात राहिला. " ही वीत आहे बघ काकी, त्याचा गळा बरोबर एवढ्याच मापाचा आहे." तो थोड्या वेळाने अकस्मात म्हणाला.

येसूबाईने गोंधळून विचारले " आँ ? काय म्हणालास ?" पण नंतर तिच्या ध्यानात आल्यावर ती गप्पगार झाली व खुळ्यासारखे तोंड उघडे टाकून तिने गपकन् त्यावर बोटे ठेवली.

" आता भांडं कशासाठी लपवायचं काकी ? एकदा काहीतरी ठरवून टाकले पाहिजे. जर तू माझ्यावर भार टाकणार असशील तर बघ, मग तुला पुढची काळजी नको कसली. मला असल्या गोष्टी नव्या नाहीत. पण एकदा माझ्याकडे काम दिलंस की मात्र त्यात ढवळाढवळ नको. नाहीतर माझे पैसे परत करून टाक, मी निघालो मुंबईला. मग तुम्ही जाणे, तुमचं फुटकं दरिद्री नशीव जाणे." जणू त्यानंतर काही बोलण्यात अर्थ नसल्याप्रमाणे तो उठला व पुन्हा म्हणाला, "गळा तर सारा वीतभर आहे."

आत सुतासारखी प्रकाशाची रेषा दारात ठेवून सोनू चटईवर पडला होता, पण त्याची झोप सतत विसकटत होती. हॉटेलमधील पोराने सुरी टाकल्याप्रमाणे टाकलेली शीळ; कमळीच्या मैत्रीणीचे लग्न; मैत्रिणीचे लग्न ? सायकलीच्या दुकानात काम केल्यावर जेवताना प्रत्येक घासाला येणारा कुवट तेलकट वास; सिनेमा चालू असता मध्येच उठून मॅनेजरच्या खासगी खोलीत जाणाऱ्या फुकट सिनेमा पहायला चटावलेल्या गरत्या बायका; गिरणीत काम करताना चक्रात सापडलेल्या राणोजीचा जमिनीवर पडलेला सुरकुतलेला पाय; प्लायवुड कारखान्यात राबताना तेथील राक्षसी पात्याखाली फळी सरकवत असता खाडकन् उडालेला अहमदचा पंजा; जिच्याकडे सरळ नजरेने पहातादेखील येत नसे, असली गाडीच्या गाडी जळण खाणारी, अजस्र धगधगीत भट्टी आणि तिच्यात एक दिवस पडलेले ते काळे मखमली मांजर; चाफ्याचे वाढलेले झाड–त्याने नेटाने आपली सारी मुळे जमिनीतून काढली, आपल्या फांद्यांचे बोचके करून पाठीवर टाकले व खोकत असलेल्या

शेळीच्या आवाजात विचारले–'येतोस मुंबईला ? मी आता सिमेंटच्या खोलीत वाढणार आहे !" प्लेटीवर फिर फिर फिरणारी लाल डोक्याची हिरवी माणी समोर आली व वाढता वाढता माणसाएवढी झाली. तिचा चेहरा वहिणीचा होता व ती हिरवे ल्याली होती ––" ये की उद्या राहिलास तर !" प्लेटीसारखे डोळे भिरभिरत ती म्हणाली, व मग भट्टीवाला चावटपणे हसला. भट्टीवाल्याचा नामू झाला. आणि गळ्याला सुरीचे थंडगार पाते लागले, गळ्याभोवती सापासारखी बोटे पसरली–"छे, छे, तुला सुरी कशाला? तुझा गळा तर सारा वीतभर आहे, वीतभर आहे . . ."

सोनूचा गळा एकदम चोंदल्यासारखा झाला. तो घावरा झाला व हातपाय झाडत तो एकदम उठून बसला आणि त्याने दिवा मोठा केला. दाराच्या फटीतील प्रकाशरेषा सुरी धारदार होऊन तयार झाल्याप्रमाणे जास्त उजळ झाली. हे सारे झोपेतच होते हे सोनूला पूर्णपणे जाणवल्यावर हायसे वाटले, पण लगेच आडवे होण्याची त्याला इच्छा झाली नाही. तो तसाच बसून राहिला. कोठून तरी वारे आत शिरत होते व त्यामुळे अंग काकडत होते. खिडकीबाहेर शेळी मध्येच पाय झाडत होती व त्या आवाजामुळेच थरकल्याप्रमाणे चाफ्याचे झाड पाने हलवत होते. सोनू उठला. त्याने अंथरलेले गोणपाट उचलले व दार उघडून प्रकाशाची रेषा रुंदावत तो बाहेर आला.

त्याचा गळा तर सारा वीतभर आहे ! येसूबाईला ते शब्द आठवले व ती खिळल्यासारखी झाली. ते अगदी खरे आहेत हे दाखवण्यासाठीच जणू सोनू बाहेर आल्याप्रमाणे त्याला पहाताच ती चपापली व झटकन् बाजूला झाली. केशवरावदेखील चमकला व त्याच्याकडे पहातच राहिला.

सोनू बाहेर आला त्यावेळी त्याचे अंग जास्तच काकडले. तो शेळीजवळ बसला तेव्हा ती पुन्हा भेदरून काकुळतीने ओरडत उठण्याची धडपड करू लागली; परंतु तिच्या कोणत्याच पायात नेट उरला नव्हता. तिच्या पाठीवर कापूस-हात फिरवत सोनूने तिला समजावले व हातातील गोणपाट तिच्या पाठीवर पसरले. शेळीने पाय हलवण्याचे बंद केले व ती मान ताणून निपचित पडून राहिली, परंतु तिचा श्वास मात्र कांबळ्याचे खरखरीत तुकडे बाहेर पडत असल्याप्रमाणे येत होता आणि दर श्वासाला तिची पाठ पिंजाऱ्याच्या तारेप्रमाणे ताठत होती. तिच्यावर हात फिरवत सोनू थोडा वेळ तेथे बसला, पण आता त्याला उमज पडला होता. त्याने निरोप घेत असल्याप्रमाणे तिला पाठीवर थापटले व तो दडपलेल्या मनाने आत आला.

त्याने दार लावले. प्रकाशाचा पट्टा पुन्हा आकसला व सोनू आत येऊन नुसत्या चटईवर पडला. त्याने दिवा घालवताच प्रकाशाची रेषा एकदम तोडून टाकल्याप्रमाणे नाहीशी झाली व आता वाऱ्याचे धारदार पाते तेथून आत येत राहिले. सोनूने गुडघे अगदी अंगाजवळ दुमडून घेतले व थोड्याच वेळात तो तोंड किंचित् उघडे टाकून घरघरीत घोरू लागला.

येसूबाई आत आली व आपल्या अंथरुणाकडे गेली. केशवराव उठला व कानोसा घेत दारापाशी थांबला. नंतर त्याने उंचावलेले हात कोपराशी दुमडत आळस झाडल्यासारखे केले व मग लगेच हात पसरून त्याने उरलेली सारी रातच आपल्या ताब्यात घेतली.

• • •

" त्या सिगारेटी केशवरावने ठेवायला दिल्या असतील त्याच्याजवळ, त्यात एवढं भुसभुसायला काय झालं ? तो एवढा तालेवार माणूस, त्याच्यापुढं तरी असं गावढळाप्रमाणे आरडाओरडायला लाज वाटत नाही ?"

" लाज मला की तुला बघ ! " सोनू हात उडवत म्हणाला, "कमळी कुठाय ? ती आली की तिची हाडे सैल करून टाकतो ! गावात मान वर करायला जागा ठेवली नाही भिकारडीने. तीस वर्षे अब्रूने काढली या गावात आणि ही जगावरून ओवाळून टाकलेली कारटी बाजारबसवीप्रमाणे त्यावर निखारा ठेवायला उठलेय. म्हणे लाज वाटत नाही काय ! तू आणि तुझा तो तालेवार पाहुणा, तुम्ही घाला तुमच्या लाजा चुलीत ! " सोनूने उगाचच बाजूच्या कोनाड्यातील दोन वाट्या उचलून दणादणा जमिनीवर आदळल्या. त्या आवाजामुळे भितीपलीकडे असलेल्या शेळीने भेदरलेली हालचाल केली व जुने कापड फाटत असल्याप्रमाणे ती कोरड्या, कातर आवाजात ओरडली.

येसूबाई आत आली व तिने दार ढकलून अर्धवट लावले. ती निर्दयपणे हंसली व हात नाचवत म्हणाली, " मस्त माहीत आहे तुमची अब्रू मला ! आहे हत्तीच्या पायाएवढी अभंड ! आत्ता जाऊन कोठून तरी दहा रुपये उसने आणून दाखवा आणि मग बोला अब्रूच्या गोष्टी ! म्हणे कमळी कुठाय ! ती गेली आहे मसणात ! कशाला पाहिजेत या चांभारचौकशा ? खायला मिळतं नव्हे दोन वेळा ? गिळा आणि गप्प बसा मुकाट्यानं ! "

तिच्या बेगुमानपणाने सोनू खिळल्यासारखा झाला. आपण कमळीला कोठे, कसे पाहिले हे सांगून तिला चकीत करण्याचा त्याचा बेत कोसळला व तो तिच्याकडे पहातच राहिला.

" म्हणजे, ती कुठं जाते, काय करते हे दत्याला, तुला ठाऊक आहे












तर !" त्याने अगदी अविश्वासाने विचारले, " मग संपलच की ! आईलाच शरम नाही, तर पोरीला कुठली येणार ? खाण तशी माती . . . " कपाळावर थडाथडा हात मारून घेत सोनू म्हणाला.

येसूबाईने मुठी घट्ट आवळल्या व दातओठ खात दणादणा पावले टाकत ती त्याच्या समोर आली. ती आता रानवटपणे आपल्यावर प्रहार करणार की काय अशी सोनूला क्षणभर भीती वाटली व जणू राजाभाऊसमोरच असल्याप्रमाणे त्याने अंग सावरून मुतळीच्या गाठीसारखे करून ठेवले; पण येसूबाई मुठी आवळून तशीच उभी राहिली व शब्द थुंकत असल्याप्रमाणे म्हणाली, "होय, कमळी जाते मारवाड्याकडे, काय म्हणणं आहे तुमचं ? मी देखील केव्हाच लाज कोळून प्याले आहे, झालं समाधान ? तसं केलं नसतं, तर दारोदार परटं घेऊन भीक मागण्याची पाळी आली असती सगळ्यावर ! तुमचा पगार बघावा तर अगदी साहेबी. सहा महिन्यातून तुम्ही मोप शिप्तरभर दोन रुपये आणणार, मग आम्ही काय पोटाला विब्बा घालायचा होय ? म्हणे तीस वर्षे अब्रूने काढली, काढला असाल की, त्यात काय एवढं मोठं ? दोन वेळ गिळायची ठीक व्यवस्था असली, की अब्रू बासनातनं बाहेर येते कशाला शिदळकी करायला ?"

" हे बघ, मी अगदी भुकेने मरत होतो, तेव्हादेखील सोन्याची साखळी–" सोनू सांगू लागला.

" पुरे ती रडकथा. हजार वेळा तो पराक्रम ऐकून कान किटले माझे ! तुम्ही रुपया घेतला नाही आणि लाथा खाऊन बाहेर पडलात कुत्र्यासारखे! मोठ्ठा दिवा लावलात आभाळात, तुमच्यावर शिणीमा काढायला सांगू या हरिश्चंद्राप्रमाणे ! तीस वर्षे राबलात आणि काय दौलत मिळवलीत ? तर या बिळासारख्या दोन खोल्या ! त्यात भिंतीत पिंपळ उगवतो आणि पावसाळ्यात कुत्रं मुतू लागल्याप्रमाणे झरे फुटतात ! आणि दारात शेळीच्या मढ्याचा भरजरी हत्ती. त्या केशवरावाकडे बघून तरी काहीतरी वाटायला पाहिजे मनाला ! चार वर्षात त्याने गावात माडी बांधली, गुरंगोठा केला !" तिने पुन्हा दात आवळले व त्यावरून हात ओवाळले, "आणखी एक सांगून ठेवते. पुन्हा कधी माझी अब्रू काढू नका. तुमच्या आयाबहिणींची पुराणं मला चांगली माहीत आहेत. काही झालं तरी मी सुद्धा तुमच्या गावापासून दोन कोसावरचीच बया आहे !"

सोनू एकदम चिडून जाऊन उभा राहिला व त्याचे भान गेल्यासारखे झाले. त्याचे सर्वांग थरथरू लागले व शब्द न फुटता ओठ मात्र बुडबुडल्यासारखे हलू लागले. त्याने खिडकीकडे हात पसरला व तिचे दार उघडे रहावे म्हणून टेकण देण्यासाठी ठेवलेले फळकूट उचलले आणि सारे बळ एकवटून ते त्याने तिच्या कपाळावर आदळले. येसूबाई वेदनेने विव्हळली व जेथे प्रहार लागून रक्ताची धार लागली होती तेथे हात दाबत दरवाजाला ठेचाळत बाहेर आली. तिच्या ओरडण्याने बाहेर शेळी धडपडत उठली व दोरी ताणत बें बें ओरडू लागली. स्वतःशीच काहीतरी ओलसर पुटपुटत सोनू बाहेर आला व वेड लागल्याप्रमाणे तो हातातील फळीचा तुकडा दणादणा शेळीवर हाणू लागला. पहिले दोन तीन प्रहार खट्खट् करत पाठीवरच्या हाडावर बसले व शेळी एकदम बसकली. पण त्याने पुन्हा तिच्या पायावर फळकूट मारताच तिला पायही जवळ घेता येईनात. ती जमिनीवर पसरली व मान ताणत घरघरीत खोकू लागली.

" मरतही नाही एकदाची कटकट !" सोनू म्हणाला व आत आला.

पण आत आल्यावर मात्र तो एकाद्या मळक्या चिंधीमारखा गळाला आणि बावळटपणे तोंड उघडे टाकून स्मशिष्टासारखा बसून राहिला. आई वहीण . . .

बादशाही मटण खानावळीचा नानू कदम वेळी अवेळी घरी येत असे. तो घरात आला की अर्धांगाने एक पाय गेलेला सोनूचा बाप त्याला हाताला धरून वीरेश्वराच्या देवळाकडे न चुकता जायला निघे. मग तासा दोन तासानी तो परतला की नानूने आणलेला मटण रस्सा ओठ ओले करत तो समाधानाने खात बसे. काही वेळा जर आठवडाभर नानू आला नाही की तो सारखा चौकशी करी. मग पळत जाऊन सोनूला खानावळीत निरोप सांगून यावा लागे. भोवतालची माणसे फिदीफिदी हसत व मग सोनूचे डोळे रडकुंडे होत. बाप एकदाचा वारला. शेवटी तो बोबड्या अडखळत शब्दात काय बोलत होता हे कुणालाच समजले नाही. मग एकदा आई नानू कदमाबरोबर मुंबई बघायला गेली ती परतलीच नाही. घरी थोरला वेडसर भाऊ, हातभर वहीण, दोनचार चिरगुटे, रिकामी गाडगी ! मग एका पहाटे सोनूने घर सोडले. भाऊ अस्ताव्यस्त झोपला होता, वहीण अंग आखडून लुगड्याचे चिरगूट पांघरून झोपली होती. रात्री कोणीच काही खाल्ले नव्हते. त्याना तसेच टाकून जाताना त्याच्या पोटात खळगा पडला होता. नंतर दहाबारा वर्षे तो घरी परतलाच नाही. भाऊ वहिणींची आठवण झाली की त्याची आतडी गोळा होत. पण आपले बूड कुठेतरी टेकले की त्याना आणावे असे म्हणता म्हणता दिवसाला दिवस लागून वर्षे निघून गेली. मग एकदा सुट्टी घेऊन तो गावात आला. भाऊ वारला होता. झावळ्याचे घर नाहीसे झाले होते. वहिणीने मोटर स्टँडवर पानपट्टीचे दुकान लावले होते. तिला पहाताच शरमून शेण झाला. पान खाऊन लाल झालेले ओठ, गळ्यात पुतळ्यांची माळ, दंडात रुतलेली चोळी ! तो गेला, त्यावेळी दोन ड्रायव्हर फळीवर बसून खिदळत होते. त्याला पहाताच वहिणीने एक पिक टाकली व म्हटले, " कां इकडं वरं फिरकलास ? ठीक आहे नव्हे सगळे ?"

तो गप्पच राहिला. बोलण्यासारखे काही उरले नव्हते. तास गेला दोन तास गेले, तसा तो उठला, आठदहा दिवस रहायच्या तयारीने तो आला होता, पण आता त्याचे मनच मेले होते. "उद्या राहिलास तर ये की !" त्याची वहीण म्हणाली व व्यापारात गुंतली. तो उठला व बसकडे आला. सकाळी त्याला घेऊन आलेली बसच संध्याकाळी परतणार होती. जाताना काही तुटल्याची देखील वेदना न होता सारे संपून गेले होते. त्याच्या मनातील वहीण थंडीत अंग आखडून लुगड्याचे चिरगूट पांघरून झोपली होती व तिचा निरोप घेण्याचे त्याला

अनुक्रमणिका






आयुष्यात लाभले नव्हते आणि त्या आठवणीने तो उगाचच व्याकुळ झाला होता . . .

त्याला ते सारे असह्य वाटू लागले. येसूबाई, पारू, मुली, वहीण, आई . . . म्हणजे आपला हा पिंडच, हे बीजच डागळून गेले आहे की काय ? खाण तशी माती . . .

तो गोठ्यासारखा बसून होता. बाहेर कोणीतरी शेळीला लाथ मारल्याचा वक्‌दिशी आवाज झाला आणि ती दीनवाणे, फुटक्या आवाजात तडकून अशक्तपणे ओरडली. सोनूला एकदम शरम वाटली. तो उठला व त्याने एक जुने कापड फाडून दोन चिंध्या केल्या आणि तो शेळीजवळ आला. त्याला पहाताच एकदम भेदरून ती उठायचा प्रयत्न करू लागली, पण तिचे पुढील ताठलेले पाय काही केल्या जमिनीवर ठरेनात. त्याने हलकेच तिच्या अंगावरून हात फिरवला, तेव्हा तिची धडपड थोडी कमी झाली. त्याने तिचा पुढचा एक पाय हातात घेऊन कोवळ्या हलक्या बोटानी तो चोळला आणि आणलेल्या चिंध्या सांध्यावर हलक्या हातानी गुंडाळल्या. त्याचे डोळे ओलसर झाले आणि गळा आवळल्यासारखा झाला व तो तेथून झटक्याने आत आला.

तो परतून आत बसला असेल नसेल, तोच चुलीजवळ पुष्कळशी भांडी कोसळल्याचा आवाज झाला व येसूबाई आवेशाने येऊन उंबऱ्याजवळ उभी राहिली. तिने पदर आडवा खोचला होता आणि तिच्या हातात लाकडाचे एक दांडके होते. कपाळाला जेथे खोक पडली होती तेथील रक्त थांबवण्यासाठी तिने तिच्यावर मूठभर हळद दडपली होती व त्यातील थोडी तिच्या अंगाखांद्यावर सांडली होती.

" त्याचं मढंच काढते बाहेर, माझ्या जीवावर उठतो काय ? ही येसू अशी उंदरासारखी मरायला आली नाही, " तिने ओरडत म्हटले व ती सोनूकडे धावली. सोनूने फळकूट पुन्हा उचलले व तो सावध होऊन तयारीत उभा राहिला. हा आरडाओरडा ऐकून केशवराव व दत्तू धावत आले. केशवरावने तिला आवरले नसते तर तिने लाकूड सोनूच्या डोक्यात आदळले असते.

" सोड मला, कधीतरी निकाल व्हायचाच की ! मेले तरी बेहत्तर, त्याचं डोकंच फोडते गाडग्यासारखं. मग जाऊन विहिरीत पडते एकदाची! " ती किंचाळत म्हणाली.

सोनूने मुठी आवळत म्हटले, "तू विहिरीत जा, नाहीतर चुलीत जा. मला त्याचं आंघोळीचं देखील सोयरसुतक नाही. . ." त्याने रागीटपणाने केशवरावकडे रोखून पाहिले आणि सांगितले, "आणि तूही माकडा, चालता हो येथून. मोठा आला आहे मुंबईवाला सांजिदा."

ते शब्द ऐकून येसूबाई पुन्हा चवताळून धावत आली, "त्याला काही बोलाल तर जीभच हासडून टाकीन. तो बिचारा आला, ते आमचं भलं करायला आणि त्यालाच लाथ मारता, माणूस आहात की कसाब ?" तिने पुन्हा दांडके उचलले, पण दत्तूने तिला मागे ओढले व केशवरावने तिला ढकलत खोलीबाहेर काढले.

" काकी, तुम्ही जा आत, मी हे सांभाळून घेतो सगळं गाडं, केशवराव म्हणाला व त्याने येसूबाईला डोळ्याने खूण केली.

तो आत आला व एक हात सोनूच्या खांद्यावर टाकत त्याने पंजा त्याच्या गळ्याभोवती पसरला व त्याला नेटाने मागे ढकलत खाली बसवले. मग त्याने एक खोके पुढे ओढले व तो स्वतः त्यावर बसला. त्याच्या अंगाच्या वासाने सोनूला अस्पष्टपणे मेहबूबची आठवण झाली व त्याने चेहरा थोडा बाजूला केला; पण केशवरावचा चेहरा थोडा भडकल्यासारखा दिसत होता व त्याचे दात आवळल्यासारखे दिसत होते.

" बरं का काका, " तो म्हणाला, " एक आधीच सांगून टाकतो. मी इथं आलो ते काही भिकारी म्हणून नाही, की मला स्वतःचे घरदार नाही असेही नाही. तुम्ही आता जे शब्द वाजवलेत, ते जर मला मुंबईत कोणी म्हटले असते, तर त्याची गर्दन खांद्यावर उरली नसती. तेव्हा पुन्हा एकदा असं तोंड वाजवू नका माझ्या बाबतीत. काकीकडे, तुमच्या वयाकडे पाहून मी गप्प बसतो या खेपेला. परंतु मलासुद्धा राग आहे, पुढल्या खेपेला तो मला कदाचित आवरणार नाही, समजलं ? हं आता सांगा. भडकायला झालं तरी काय?"

" काय झालं ? जाऊन विचार तुझ्या त्या बेशरम काकीला ! त्या कमळीनं तोंडाला काळं फासलं. रस्त्यावरची म्हारंपोरं तिच्या विषयी पाचकळ बोलत होती. "

केशवराव थोडा हसला. तो म्हणाला, " काका, वय झालं तरी रक्तातला गाढवपणा गेला नाही ; मी आपलं स्पष्टच सांगतो. अहो, चार दीडदमडी माणसं बोलतात, म्हणून तुम्ही त्यांच्यावर विश्वास ठेवता. कोणाविषयी लोक चांगलं बोलतात ? तुमच्याविषयी की माझ्याविषयी ? थोडा विचार करायला सूत मिळालं की झालं, करायचा त्याचा फांस ? त्या पोराच्या खिशात सिगरेटी दिसल्या की बडव त्याला, पोरगी बाहेर गेली की उचल कुऱ्हाड, बायको बोलली की फोड डोकं—काय चाललं आहे काय ? त्या सिगरेटी माझ्या, जरा थोडी चौकशी तर करायची. घरचे धनी तुम्ही, असं उठलं सुटलं पिसाळून चालत नाही— "

सोनू थोडा विरमला. कोणीतरी बऱ्याच दिवसानी त्याच्याशी आदराने बोलत असल्यामुळे त्याला जिवंत वाटू लागले. विशेषतः केशवरावने त्याला घरचे धनी म्हटल्यावर हा केशवराव म्हणजे अगदीच बेरड नाही असे त्याला वाटू लागले.

" पण ती कमळी नट्टापट्टा करून मारवाड्याच्या घरी गेली, हे तर खरं ना ? तुझ्या काकीनंच बेशरमपणानं सांगितलं की ! "

" त्यात बेशरमपणा कसला ?" केशवराव सहजपणे म्हणाला, "वयाप्रमाणे पोरगी नटली असेल थोडी. आज तिच्या एका मैत्रिणीचे लग्न ठरत आहे, म्हणून ती गेली एवढंच. चार भुक्कड बडबडणार, तुम्ही म्हातारं ऐकणार, झालं! "

सोनू थोडा भांबावला व त्याला आपले चुकल्यासारखे वाटू लागले.

अनुक्रमणिका

" पण मारवाड्याच्या घरी ?" त्याने हट्टाने विचारले.

" होय, मारवाड्याच्या घरी, " केशवरावने आत्मविश्वासाने ठासून सांगितले, "त्याचीच वहीण की भाची तिची मैत्रीण आहे."

सोनू खुळ्यासारखा झाला व केशवरावकडे टकाटका पाहू लागला. तो म्हणतो तसेही असू शकेल की, असे त्याला फार वाटू लागले व त्याच्या चिरडलेल्या मनाच्या तळाशी एक नवी आशा जागी होऊन तो थोडा खुललाही. कदाचित नानू कदमदेखील सहजच घरी येऊन जात असेल. वहीण पान खात दुकानात बसली, एवढ्याचमुळे काही सुद्धा सिद्ध होत नाही . . . त्याच्या मनावरील ताण थोडा कमी झाला व त्याने हातातील फळी बाजूला ठेवली.

" आणि मलाच तुम्ही शिव्या दिल्यात, " केशवराव किंचित् पुढे वाकून म्हणाला, " मी आलो ते तुमचं भलं करण्यासाठी. मुंबईला आलात तर एवढ्या रावण्याने चार पैसे मिळतील, दोन घास पोटात जातील. मी प्रथम तेथे गेलो, तेव्हा अंगावर नुसत्या चिंध्या होत्या चिंध्या! आता मी लखपती झालो असं नाही. पण काका खाऊनपिऊन सुखी आहे, कोणाचा मिंधा नाही. धंदा चालवतो. रेटून खातो पितो."

सोनूचे मन पुन्हा डुचमळले. 'हां बस्स, एवढं बोललास तेवढे पुरे,' तो उसळून म्हणाला, " या घरात मी रक्त गाळलंय् ! मी मरणार तो इथंच या ठिकाणी. तू घेऊन बस तुझी मुंबई तुझ्या पुठ्ठ्याखाली ! आणि हे बघ, तुझ्या मिशा, तुझी मुंडेछाट पैरण याला घाबरणारा मी माणूस नव्हे. जर माझ्या वायकोपोरांच्या बाबतीत तू काही भानगड केलीस तर याद राख. डोके फोडीन, मग फांसावर लटकलो, तर बेहत्तर ! " सोनूचा संताप एकदम वाढला व त्याने केशवरावचा हात गच्च धरला व तो म्हणाला, " बऱ्या बोलानं तू निघून जा. नाहीतर उद्याच्या उद्या पोलीसात जाऊन मी फिर्याद करीन. म्हणे मुंबईला चला, पोरीला कामाला लावा. माझी वायको, माझी पोरगी काय बाजारबसव्या आहेत होय ?

केशवरावचे डोळ किंचित् बारीक होऊन फटीसारखे झाले व त्याने दात जास्तच जोरात आवळले. पण सोनूचा हा उलटा अवतार पहाताच त्याला हसू आवरेना. त्याने आपला हात सहजपणे सोडून घेतला व त्याने सोनूला पुन्हा गळ्याभोवती बोटे पसरून खाली बसवले.

" काका तुमच्या मनात नाही तर राहिलं, त्यात कोणाची बळजबरी आहे होय ? तुम्ही घरचे मालक, त्या माणसांचे पोशिंदे ! तुम्ही ठरवा त्यांचं पुढं मागं ! मी वाटेचा वाटसरू. काकीचं नातं म्हणून मी आलो. आतड्यानं बोललो इतकंच ! आता असं करा. डोकं फार भडकलंय. दोन घास गिळून स्वस्थ पडा. मग सकाळी थंड डोक्यानं विचार करा. . ." केशवरावने बाजूला वळून हाक मारली व म्हटले, " काकी, यांचं ताट तेवढं दे भरून. आज तमाशा झाला तेवढा बस्स झाला ! "

आतल्या खोलीत भांडी वाजली व थोडी आदळआपट झाली. शेवटी दत्तूच ताट घेऊन आला व त्याने ते सोनूपुढे आदळले. भात गरम होता व त्यातून वाफा येत होत्या. ताटात कसली तरी कोशिंबीरदेखील होती. म्हणजे आजदेखील केशवराव जेवायला रहाणार हे स्पष्ट होते. पण त्या मऊ भाताचे गरम घास गळ्याखाली उतरताच गाठी सुटत गेल्याप्रमाणे सोनू सैल पडत गेला. या एवढ्या अन्नासाठी पोरपणापासून कणा झिजवत गेलो, जगण्यासाठी अन्न मिळवण्याची धडपड केली आणि ते मिळवता मिळवता जगण्यासारखे काहीच उरले नाही, या विचाराने तो खिन्न झाला. त्यान ताटातच हात विसळला

व तो चटईवरच्या गोणपाटावर आडवा झाला. केशवरावने कंदील किंचित् वारीक केला व तो बाहेर येत म्हणाला," पडा आता काका, डोकं थोडं थंड होऊ द्या."

तो बाहेर आला व वळचणीला उभा राहिला. त्याच्या पाठोपाठ यसूबाई व दत्तू बाहेर आली व त्याच्या शेजारी उभी राहिली. थोडा वेळ कोणी बोलले नाही. तेव्हा येसूबाईच म्हणाली, " केशवराव, खाऊन घेतोस नव्हं थोडं. पोराचं झालंय, पोरगी जेऊनच येईन म्हणाली होती."

केशवराव तंद्रीतून बाहेर आला व त्याने दत्तूच्या पाठीवर थाप मारली. "खाऊन झालंय होय रे तुझं ? मग सिनेमाला बिनेमाला जातोस काय वघ." त्याने एक नोट काढली व दत्तूला दिली. "जा, घे हा रुपया, आणि चैन कर वेट्या ! मार खाल्लास तर खाल्लास, मग सिनेमा तरी वघ ऐटीत ! आणि हे वघ, विड्या फुंकू नकोस आणखी"—

दत्तू खजीलपणे हंसला व आत जाण्यासाठी वळला. थोड्याच वेळात तो कपडे घालून आला. त्याने गळ्याभोवती रंगीत हातरुमाल गुंडाळला होता व केसाचा तुरा जास्तच उठावदार केला होता.

" आणि ती पोरगी भेटली तर सांग, आज कुठेतरी रात्र काढ म्हणून ! वाप भडकला आहे म्हणावं !" तो जात असता केशवराव म्हणाला.

त्यानी वचावचा दोन घास गिळले. केशवरावने वाहेर एक सतरंजी टाकली व तो त्यावर वसला. येसूवाईने पानाची चंची काढली व ती त्याच्यापुढे टाकून ती स्वतःजवळच वसली. केशवराव काहीतरी वोलेल म्हणून ती मघापासून वाट पहात होती पण तो मात्र सिगरेट काढून शांतपणे ओढत वसला होता. आता सोनूच्या खोलीतून दाराच्या फटीत मंद केलेल्या प्रकाशाची सुतासारखी रेषा मात्र दिसत होती. आणि जणू तिलादेखील फुंकून टाकण्याचा प्रयत्न करत असल्याप्रमाणे वंद खिडकीवाहेर शेळी सतत लांब घोगरे खोकत होती.

" काकी, हे प्रकरण सहजासहजी मिटायचं नाही, " मध्येच केशवराव म्हणाला, " पोलीसात उद्याच्या उद्या फिर्याद करीन म्हणतो तो. आणि खरं सांगू ? पोलीसापासून जरा दूर रहाणंच माझ्या धंद्याच्या दृष्टीने फायद्याचं आहे. परंतु मी काही म्हातारा मरेपर्यंत मुक्काम ठोकून वसणार नाही. शिवाय माझे चारशे रुपये तरी तुझ्याजवळ किती दिवस अडकून ठेवू ? आणखी एक वघ काकी, मी आपला घडाघडा स्पष्ट वोलणारा माणूस ! पोरगी जशी उफाड्याने वाढते, तशी ती सुकतेदेखील उफाड्यानेच. आणखी चारपाच वर्षे अशीच गेली की तिच्याकडे कुत्रे देखील ढुंकून पहाणार नाही. आत्ताच आलात माझ्यावरोवर तर तिचं वस्तान वसेल, तू देखील कुठंतरी पान तपकीरीचं दुकान घालशील तेव्हा तुझं तू वघ आणि ठरव आता. मी चाललो परत येत्या आइतवारी. "

येसूवाई चिडून म्हणाली, "मग मी तरी काय करू सांग ? मढं मरतही नाही एकदा, म्हणजे मी तरी सुटेन. वीस पंचवीस वर्षे काढली मी या खातेऱ्यात. कसली अन्न नि काय ! कधी धड धडोतं लागल नाही अंगाला, की कधी ढेकर आली नाही पोटाला ! माझं जसं, तसंच त्या पोरांचं ! मघाशी तू उगीच आडवा आलास वघ. मी एकदा सारं कायमचं मिटवून टाकलं असतं वघ!"

" होय, आणि गेली असतीस फासावर ! मग ते करुन फायदा काय तुला ?" केशवराव म्हणाला, " धडक देऊन स्वतःचं डोकं देखील फोडून मरायचं, हे रानडुक्कराचं काम. आपण पडलो माणसं, आपलं तसलं काम नव्हे काकी !"

" मग मी करू तरी काय सांग ?" आकस्ताळीपणाने येसूवाईने विचारले.

"आम्ही जर उद्या तुझ्यावरोवर निघालो तर तो पोलिसात जाऊन गांवगन्ना करेल की !"

" छे छे, ते तर विलकूल उपयोगी नाही. आपलं काम तर मांजराच्या पावलानी व्हायला पाहिजे. " केशवराव म्हणाला, पण तो मध्येच एकदम गप्प झाला व हाताच्या वोटांची उघडझाप करत त्यांच्याकडे पहात राहिला. " ही वीत आहे वघ काकी, त्याचा गळा वरोवर एवढ्याच मापाचा आहे." तो थोड्या वेळाने अकस्मात म्हणाला.

येसूवाईने गोंधळून विचारले " आँ ? काय म्हणालास ?" पण नंतर तिच्या ध्यानात आल्यावर ती गप्पगार झाली व खुळ्यासारखे तोंड उघडे टाकून तिने गपकन् त्यावर वोटे ठेवली.

" आता भांडं कशासाठी लपवायचं काकी ? एकदा काहीतरी ठरवून टाकले पाहिजे. जर तू माझ्यावर भार टाकणार असशील तर वघ, मग तुला पुढची काळजी नको कसली. मला असल्या गोष्टी नव्या नाहीत. पण एकदा माझ्याकडे काम दिलंस की मात्र त्यात ढवळाढवळ नको. नाहीतर माझे पैसे परत करून टाक, मी निघालो मुंवईला. मग तुम्ही जाणे, तुमचं फुटकं दरिद्री नशीव जाणे." जणू त्यानंतर काही वोलण्यात अर्थ नसल्याप्रमाणे तो उठला व पुन्हा म्हणाला, " गळा तर सारा वीतभर आहे."

आत सुतासारखी प्रकाशाची रेषा दारात ठेवून सोनू चटईवर पडला होता, पण त्याची झोप सतत विसकटत होती. हॉटेलमधील पोराने सुरी टाकल्याप्रमाणे टाकलेली शीळ; कमळीच्या मैत्रीणीचे लग्न; मैत्रिणीचे लग्न ? सायकलीच्या दुकानात काम केल्यावर जेवताना प्रत्येक घासाला येणारा कुवट तेलकट वास; सिनेमा चालू असता मध्येच उठून मॅनेजरच्या खासगी खोलीत जाणाऱ्या फुकट सिनेमा पहायला चटावलेल्या गरत्या वायका; गिरणीत काम करताना चक्रात सापडलेल्या राणोजीचा जमिनीवर पडलेला सुरकुतलेला पाय; प्लायवुड कारखान्यात रावताना तेथील राक्षसी पात्याखाली फळी सरकवत असता खाडकन् उडालेला अहमदचा पंजा; जिच्याकडे सरळ नजरेने पहातादेखील येत नसे, असली गाडीच्या गाडी जळण खाणारी, अजस्त्र धगधगीत भट्टी आणि तिच्यात एक दिवस पडलेले ते काळे मखमली मांजर; चाफ्याचे वाढलेले झाड—त्याने नेटाने आपली सारी मुळे जमिनीतून काढली. आपल्या फांद्यांचे वोचके करून पाठीवर टाकले व खोकत असलेल्या

अनुक्रमणिका

राजाराम हुमणे



एका संस्थानिकाचा अखंड चांदीचा एक टनी वजनाचा पलंग




# एक रोमहर्षक प्रवास

माणसाचा जन्म पलंगावर होतो आणि मृत्यूही. जन्मापासून मरणापर्यंत पलंग माणसाची शय्यासोबत करतो. आयुष्यातील प्रत्येक सुखदु:खाच्या क्षणी माणसाला आधार देणारा पलंगाशिवाय त्याचा दुसरा कुणी परममित्र असणे असंभवनीय. फार कशाला पलंग हा माणसाचा पतीपेक्षा किंवा पत्नीपेक्षा अधिक जवळचा आप्त मानला पाहिजे. कारण माणूस आपले एकतृतीयांश आयुष्य पलंगाच्या सान्निध्यात घालवतो. जन्मापासून मृत्यूपर्यंत माणसाच्या जीवनात घडणाऱ्या अनंत घटनांचा साक्षीदार असतो पलंग.

मानवी जीवनाला व्यापून टाकणाऱ्या तीन महत्त्वाच्या घटना—जनन, मैथुन आणि मरण—घडतात त्या पलंगाच्या अंगावर. माता प्रसूतीवेदना देत आहे, तिचा चिंतातुर पती बाहेर बसला आहे, तिचे अनेक आप्त संचित होऊन पुनर्जन्माच्या यातनेतून जाणाऱ्या त्या मातेच्या भवितव्याचा विचार करीत आहेत आणि विव्हळणाऱ्या, कण्हणाऱ्या गर्भातून एका नव्या अर्भकाचा जन्म होत आहे. वेदनेने व्याकुळ झालेल्या गर्भवतीलासुद्धा या प्रसंगांचा साद्यंत इतिहास सांगता यायचा नाही. परंतु पलंगाने अथपासून इतिपर्यंत सारे काही पाहिलेले असते.

हे अर्भक युवक किंवा युवती होते. ते दुसऱ्या कुणा युवतीशी किंवा युवकाशी लग्नबंधाने बांधले जाते. लग्नाच्या पहिल्याच रात्री हे युगुल पुष्पमालानी शृंगारलेल्या पलंगाच्या अंगावर पहुडते आणि शृंगाराचे पहिले धडे गिरविते. त्या एकांतात तू अन् मी खेरीज तिसरं कुणी नाही अशा खुळ्या कल्पनेने ती अनेक वेडेचार करतात. परंतु त्याना कल्पना नसते की त्याना अंगावर 'खेळविणाऱ्या' पलंगाने चलच्चित्रपटाच्या कॅमेऱ्याप्रमाणे त्यांची प्रत्येक हालचाल टिपून घेत-लेली असते. स्वर्गाचे दरवाजे सताड उघडे असलेली ती रात्र, त्या दांपत्याच्या आयुष्यातील अत्युच्च्य सुखाचा तो प्रसंग, ते आक्रमण, ते आढेवेढे, ती लज्जा, तो निर्लज्जपणा, ती हुरहूर, ते स्पंदन, ते मीलन, मीलनानंतरची ती तृप्ती आणि सुषुप्ती, सारं काही या खटघाळ पलंगाने राजरोसपणे पाहिलेले असते. त्या युवतीने चाणाक्ष-पणे थरथरत्या हाताने थरथरणारी दीपज्योती मालवली असतानाही पलंग हे सर्व नुसते पहातोच असे नव्हे तर अनुभवतोही. त्या दांपत्या-प्रमाणे त्याचेही हृदय धडधडते. तोही कुरकुरतो, सुगंधाने दरवळतो आणि आनंदाने बेहोष होऊन खदखदतो.

आणि या रम्य जीवनाचा एके दिवशी अचानक शेवट होतो. एक सुंदर स्वप्न भंग पावते. एक चिरेबंदी वाडा कोसळून पडतो. आयुष्यभर धडपडणारा एक जीव मृत्यूच्या पाशातून सुटण्यासाठी शेवटची धडपड करतो. मृत्युशय्येवर पडलेला त्याचा देह आयुष्यात भोगलेल्या साऱ्या सुखदुःखांचा, मनी बाळगलेल्या आशाआकांक्षांचा पट मनश्चक्षूने पुन्हा एकदा पहातो. डोळे थकलेले आणि मिटलेले असतात. मनश्चक्षूंची ताकदही कमी झालेली असते. आपण हळुहळू एका गडद काळोखाच्या प्रदेशात प्रवेश करीत आहोत, असा भास त्याला क्षणोक्षणी होत असतो आणि दुसऱ्याच क्षणाला सारं काही संपतं. सारं काही मिटतं. प्रज्वलित प्राणज्योती विझून जाते. काळयाकुट्ट अंधाराचं साम्राज्य सर्वत्र पसरतं. सगेसोयरे धाय मोकलून हंबरडा फोडतात. हे सारं भीषण दृश्य साश्रु नयनानी पहातो तोही पलंगच. पित्याच्या अंगाखांद्यावर खेळलेल्या मुलाने पित्याच्याच मांडीवर प्राण सोडावा तसा प्राणी पलंगावर देह टाकतो. त्यावेळी पित्याची जी मनोवस्था होते तीच मनोवस्था पलंगाची होते.

असा जन्मापासून मृत्यूपर्यंत आपली साथ करणारा आपला हा साथीदार. आपल्या जीवन–प्रवासातील जन्माच्या जोडीदाराप्रमाणे आपल्यावरोवर असलेला सहचर. आपल्या सुखदुःखांशी निगडीत झालेला सवंगडी. आपल्या जीवनातील प्रत्येक प्रसंगाला साक्षी असलेला भागीदार.

## पलंगावर झालेला अन्याय

प्रत्येक माणसाची कुळकथा माहीत असलेल्या या पलंगाची कुळकथा कुणाला माहीत आहे ? हा या जगात केव्हा आला, कसा आला, कसा वाढला ? आपण आपले एकतृतीयांश आयुष्य त्याच्या सहवासात व्यतीत करतो त्याच्या अस्तित्वाची दखल घ्यायला देखील आपल्याला उसंत सापडत नाही. इतके आपण आपल्याच सुखदुःखात चूर झालेले असतो. माणूस हा असा अप्पलपोटा, आत्मलक्षी प्राणी आहे. दोन पायाचा माणूस या चार पायाच्या पलंगावावत असा चतुष्पाद जनावरासारखा वागतो. पलंगावर होणारा हा अन्याय ( पलंगावर जे सारं घडतं ते नेहमी न्याय्यच असतं असं नाही ) दूर करण्याचा मी तरी एक प्रामाणिक प्रयत्न करणार आहे.

जगातला पहिला पलंग कुणी आणि केव्हा तयार केला याची इतिहासात नोंद नाही. ती कशी असणार? पलंगानेच माणसाला निद्रिस्त बनविले आहे ना ? माझ्या माहितीप्रमाणे माणसाचा पहिला पलंग म्हणजे गवताची गंजी आणि त्याची उशी गवताची पेंढी. पुढे अश्मयुगात दगडांचा ओटा माणसाचा पलंग झाला आणि गुळगुळीत धोंडा उशी. " भुकेला कोंडा आणि निजेला धोंडा " चालायला लागला तो तेव्हापासून. पुढे लाकडाचा ओंडकाही उशी म्हणून मानेखाली आला. नंतर मानव राखेची रास करून तिची शय्या करू लागला. ही रक्षाशय्या म्हणजे त्याचा उबदार पलंग तर होताच, शिवाय तो किडमुंगीपासून त्याचा बचावही करीत असे. आफ्रिकेत अजूनही काही जमाती हा राखेचा पलंग राखून आहेत. उत्तर आणि

> माणसाचे एक-तृतीयांश आयुष्य पलंगाच्या सान्निध्यात जाते, पण अशा या निकटवर्ती मित्राचा इतिहास किती जणाना माहित आहे ?

दक्षिण एस्किमो जनावराची कातडयावर कातडी रचून आपला पलंग सजवू लागले. आशिया खंडात गवताच्या गंजीचे चटईत रूपांतर झाले.

हे सर्व पलंग भुईसपाट पलंग होते. फक्त माणसाच्या उत्तमांगासाठी उच्चासन असायचे. या उच्चासनाची उंची आणि आकार पाहिल्यावर डोक्याला आधार देण्यापेक्षा केशभूषा सुरक्षित राखण्यासाठी ते घडविण्यात आले असावे असे वाटते; परंतु भुईसपाट पलंगही उशी घेऊन वर येऊ लागला, हळूहळू वाढू लागला. ( आता मात्र आपण कलियुगाकडून पुन्हा अश्मयुगाकडे जाऊ लागलो आहोत असे वाटते—कारण वर आलेला पलंग खुजा होत पुन्हा खाली खाली जाऊ लागला आहे. )

जगात आता सर्वत्र प्रचलित असलेल्या पलंगाची सुरुवात पश्चिम आफ्रिका, सुदान, उत्तर अमेरिका इत्यादि देशात झाली. झोपडीतून शय्या म्हणून मातीचे ओटे रचण्यात येऊ लागले. याच सुमारास प्राचीन इजिप्तमध्ये घोटीव दगडाचे, कातीव लाकडाचे नाहीतर धातूचे पलंग जमिनीवर उभे राहू लागले. इजिप्तमध्ये १४ व्या शतकात शिसवीच्या लाकडाचा, सोन्याने मढविलेला, मांजराच्या पायासारखे पाय असलेला, विणलेल्या सुताची जाळी गुंफलेला, फळाफुलांच्या नक्षीने नटविलेला पलंग आपले सारे वैभव दिमाखाने दाखवू लागला. ईजिप्तमध्ये असिरिया, पर्शियातही पलंगाला सजविण्यासाठी निरनिराळे धातू, शिंपले, हस्तिदंत वापरण्यात येऊ लागले.

## राजमुद्रेपेक्षा राजनिद्रा महत्त्वाची

राजे लोक तर सिंहासनापेक्षा शय्यासनावर जास्त जोर देऊ लागले. मग त्यांच्या पलंगावरही सुवर्णलतांचे छत आले. त्याचे अंगप्रत्यंग हिरेमाणकानी भरले जाऊ लागले. सुखद राज्यकारभारापेक्षा सुखद शय्या हेच जणू राजांचे ध्येय झाले. राजमुद्रेपेक्षा राजनिद्रा अधिक महत्त्वाची झाली. ही निद्रा अधिक सुखकर व्हावी म्हणून खाली एकावर एक गालिचे अंथरून त्यावर पलंगाची प्रतिष्ठापना करण्यात येऊ लागली. राजे आपल्या झोपेचे कोड पुरविता पुरविता पलंगाचे भलतेच लाड करू लागले. लाकडाऐवजी कासवाच्या कवचाचे तुकतुकीत पलंग नाहीतर संपूर्ण हस्तिदंताचे पलंग राजप्रासादात चमकू लागले.

युरोपातही पलंगाची अशीच स्थित्यंतरे होऊ लागली. गवताने भरलेल्या खोळया किंवा शेवाळाने भरलेले पेटारे जाऊन त्याच्या जागी परांच्या गाद्या आल्या. मध्ययुगातील पलंग साधेसुधे होते. परंतु १२ व्या शतकापासून लाकडाचे कोरीव पलंग जागोजाग दिसू लागले. त्याच्यावर रंगीबेरंगी चित्रे चित्रित केली जाऊ लागली.





अनुक्रमणिका

त्याच्याभोवती छतापासून जमिनीपर्यंत लोळणारे पडदे सोडण्यात येऊ लागले. चारखांबी छपरी पलंगावर अंथरलेल्या गाद्यांवर भरत-काम केलेले पलंगपोस पसरण्यात येऊ लागले. कधी पलंगाच्या छताला झुंबरे लावलेले दिवे टांगण्यात येऊ लागले. विछान्यावर दिवे जळत ठेवले म्हणजे शयनगृहात भुतेखेते यायला दचकतात अशी त्यावेळी एक भ्रामक समजूत होती. वास्तविक पेटलेल्या प्रेमिकांच्या शृंगारात या जळत्या दिव्यांनी निश्चितपणे व्यत्यय आणला असला पाहिजे. परंतु भूतचोरानी प्रणयचेष्टा बंद पडण्यापेक्षा लख्ख प्रकाशात चक्क शृंगार केलेला काय वाईट असा त्यानी विचार केला असला पाहिजे. मदनाचे चाळे बंद करणाऱ्या पिशाच्चांच्या खेळांपेक्षा प्रकाशाचे खेळ खपवून घेणे त्याना भाग पडले असावे. वास्तविक रतिक्रीडेला अंधारा-इतकीच प्रकाशाचीही (काही काळ का होईना) जरूरी असते आणि पलंगावर माणूस नुसता शृंगारच करत नाही. पलंगावर मनन, चिंतन, वाचन आणि भोजनसुद्धा केले जाते. हे सारे अंधारात कसे शक्य आहे? खरं म्हणजे भूताच्या भीतीपेक्षा आवश्यकता म्हणून आजच्याप्रमाणे त्याकाळीही प्रकाशाची योजना करणे क्रमप्राप्त झाले असावे.

तेराव्या शतकात तर पलंगाला फारच उच्च स्थान मिळाले. इतके उच्च की पलंगावर चढण्यासाठी माणसाला आधी अनेक पायऱ्या चढण्याची पाळी येऊ लागली. पलंगाच्या भोवती गवाक्षे बांधली जाऊ लागली. पलंग ओसरी दिलेल्या भटाप्रमाणे (हात) पाय पसरू लागला. त्याची लांबी आठ फूट आणि रुंदी सात सात फूट झाली.

## एकट्याचे ४१३ पलंग

फ्रान्स आणि इटालीतील लोक मोठे शौकीन. प्रणयक्रीडेला पोषक, कामक्रीडेला उत्तेजक असे नाजूक आणि नजाकतदार, सुंदर आणि आकर्षक पलंग त्यानीच बनवावेत. त्यानी त्याकाळी केलेल्या पलंगात दारे उघडून आत जाता येईल आणि खोलीसारखा आतून बंद करता येईल असा पलंग होता आणि वर, खाली आणि चहू-बाजूला विलोरी आरसे लावलेला आरसेमहालासारखा मंचकही होता. फ्रान्समध्ये तर ६९ प्रकारचे पलंग प्रचलित होते आणि त्या प्रत्येक प्रकाराला वेगळे नांव होते. फ्रान्सचे राजे तर पदरी प्रमदा बाळगण्याऐवजी पलंग बाळगण्यातच भूषण मानत होते की काय न जाणे. त्यांचे प्रासाद म्हणजे नानाविध पलंगाची संग्रहालयेच होती. फ्रान्सचा राजा १४ वा लुई याच्याकडे एक नव्हे, दोन नव्हे, ४१३ पलंग होते!

इंग्लंडमध्येही पलंगाचे परोपरीचे प्रकार पाहायला मिळू लागले. ओक, शिसवी वगैरे अनेक वृक्षांच्या लाकडाचा पलंगासाठी वापर करण्यात येऊ लागला. पहिल्या एलिझाबेथ राणीचा पलंग आक्रो-डच्या लाकडाचा होता आणि त्यावर जरतारी किनखापी कापडाचे पडदे सोडलेले होते. युरोपातील प्रत्येक देशात पलंगावर कोरीव काम, पलंगपोसावर भरतकाम आणि पडद्यांवर चित्रे दिसू लागली. कला विकास पावू लागली की ती विकृतही होऊ लागते. ऑस्ट्रियातील पलंगाना म्हणूनच की काय वटवाघूळ, पाली, इत्यादि भयानक प्राण्यांचे आकार देण्यात येऊ लागले. येथील एका पलंगावर तर दिवाभीताचे दिवे टांगलेले होते आणि त्या दिवाभीतांच्या डोळ्यांतून प्रकाश सोडण्याची व्यवस्था करण्यात आली होती. या एका एका विचित्र पलंगाची किंमत होती ४० हजार फ्लॉरेन्स! इतका अफाट पैसा खर्च करून ऑस्ट्रियातील ती मंडळी झोपत होती घुबडी, पाली आणि वटवाघुळांच्या सान्निध्यात! त्याना निवांत निद्रा लागत होती की नाही हे समजून घ्यायला आता काहीच मार्ग उरला नाही. कारण ती सर्व मंडळी माणूस नेहमी ज्या मार्गाने जातो त्या मार्गाने गेली आहेत आणि खरोखरीच्या घुबडांच्या आणि वटवाघुळांच्या स्मशानभूमीत चिरनिद्रा घेत पडली आहेत.

पाश्चात्य देशातील पुराणा पर्यंक असा आकर्षक आणि उत्तेजक होता. विसाव्या शतकात मात्र तिकडील लोक मंचकाकडे एक सुंदर वस्तू म्हणून पहाण्याऐवजी एक सुखाचे साधन, सुखासीन निद्रा घेण्याची जागा म्हणून पाहू लागले आहेत. सर्व सुखसोयींनी सुसज्ज असा पलंग हा आत्ताचा आदर्श पलंग. परंतु त्यातही ते किती अतिरेक करू शकतात पहा. नुकताच इंग्लंडमधील एका प्रदर्शनात असा एक आदर्श पलंग ठेवण्यात आला होता. या दुहेरी पलंगावरच्या गाद्या अशा आहेत की त्याचे तपमान हवे तसे बदलता येते. पुरुषाच्या गादीजवळ टेलिफोन, टेपरेकॉर्डर, इलेक्ट्रिकचे दाढीचे सामान तर स्त्रीच्या गादीशेजारी मसाज करण्याचे यंत्र, चहा तयार करण्याची विद्युत्-उपकरणे, कपबशा, दोघांसाठी रेडिओग्रॅम आणि टेलिव्हिजनसेट. विछान्यावर पडल्या पडल्या खोलीतील प्रकाश कमी जास्त (आणि एकदम नाहीसाही) करण्यासाठी हाताला सहज लागतील अशी बटनें, विछान्यावरूनच दारांचे किंवा खिडक्यांचे पडदे उघडण्याची किंवा बंद करण्याची व्यवस्था, शय्यागृहातून दुसऱ्या कुठल्याही खोलीतील व्यक्तीशी बोलता येण्याची सोय, असा अनेक सोयींनी युक्त असा हा पलंग नमुना म्हणूनच तूर्त तयार केला जात आहे. या पलंगाची किंमत आहे फक्त २५०० पौंड—म्हणजे अवघे ३७,५०० रुपये! पहा तुम्हाला तो मागविता येतो का!

## खुरांवर चांदीच्या पऱ्या

तुम्हाला असा पलंग मागविता येणार नाही. परंतु हिंदुस्थाना-तील काही संस्थानिक आपले पलंग परदेशातून आयात करीत. पलंगाचा षौक केला तो आमच्या विलीन झालेल्या संस्थानातील राजेरजवाड्यानी. त्यातील एका संस्थानिकाने मागविलेला पलंग संपूर्ण चांदीचा होता. त्याच्या चार टोकांना चार नग्न स्त्रियांचे चंदेरी पुतळे बसवलेले होते. हे निर्जीव पुतळे मात्र सजीव पुतळ्यां-प्रमाणे चांदीच्या चवऱ्या ढाळीत. त्यांचे डोळे इनॅमलचे होते आणि त्यांच्या डोक्यांवर खऱ्या केसांचे टोप लावलेले होते. या पलंगावर पडले की आपोआप सुंदर संगीत सुरू होई. या वजनदार पलंगाचे वजन होते एक टन.

अनुक्रमणिका






एरवी भारतातसुद्धा इतर देशांप्रमाणेच सामान्य माणसाचा पलंग म्हणजे चटई, घोंगडी किंवा गोधडी. खाट मिळाली तर बाळंतीण बाईला, नातहीर रुग्णाईताला. चार पायांची, काथ्याच्या दोऱ्यानी विणलेली चारपाई हा भारतात सर्वत्र प्रचलित असलेला पलंगाचा प्रकार. महाराष्ट्रात खाट किंवा खाटले या नांवाने ओळखला जाणारा लाकडी पलंग किंवा दिवाण वापरणारी मोजकीच. त्याच्या खालोखाल लोखंडी कॉटस् वापरणारी मध्यमवर्गीय मंडळीही मोजकीच. फूटपाथवर वर्तमानपत्राची गादी व पाटीची उशी करणारा हेलपाटी किंवा मातीच्या ढेकळावर दंडाची उशी करून झोपणारा आडदांड शेतकरी भारतात प्रचलित असलेल्या आणखी काही पलंगांचे दर्शन घडवितात. भारतात आणखी एक विचित्र शय्या रूढ आहे आणि ती म्हणजे हठयोग्याची कंटकशय्या! अणकुचीदार खिळचावर सुखाने झोपणाऱ्या साधूची. अपवाद म्हणून काही साधू व्याघ्राजिन वापरतील तेवढेच. मोंगल सम्राटानी किंवा इतिहासकालीन राजेरजवाड्यांनी आणि जहागिरदारानी वापरलेले छपरी पलंग केवळ अपवाद.

चीनमध्ये १४ व्या शतकापासून १७ व्या शतकापर्यंत मच्छरदाणीचे पलंग वापरले जात हे मार्कोपोलोच्या प्रवासवर्णनावरून स्पष्ट होते. जपानमध्ये तर कालपरवापर्यंत पलंग वापरण्याची प्रथा नव्हती. जमिनीवर घरभर अंथरलेल्या 'टाटामी' नावाच्या चटया याच जपानी माणसाच्या गाद्या आणि गिर्द्या!

पलंगाप्रमाणे पलंगपोसही अनेक स्थित्यंतरातून गेला. जनावरांच्या कातड्यापासून ते तुतीच्या पानावर पोसल्या जाणाऱ्या किडचांपासून तयार झालेल्या रेशमापर्यंत. यात सांगण्यासारखी कथा म्हणजे पलंगपोसाच्या रंगाची. १४ व्या आणि १५ व्या शतकात युरोप खंडातील श्रीमंत स्त्रिया आवर्जून काळचा साटीनीचा पलंगपोस वापरीत. पुढे पुढे वेश्याही तसा पलंगपोस वापरू लागल्या. यामागे त्यांचा उद्देश असा की पुरुषांना आपली गौरकाया काळचा पलंगपोसाच्या पार्श्वभूमीवर अधिक उठून दिसावी. रात्रीच्या अंधारात कामांध पुरुषाला स्त्रीकडे इतक्या सूक्ष्म दृष्टीने पहाण्याचे भान नसते हे या स्त्रियांना समजले नसावे.

ठार वेडचा झालेल्या माणसाला काबूत ठेवण्यासाठी किंवा लहान मुलांना शिक्षा म्हणून पलंगाला बांधण्यात येते. परंतु त्यांच्या प्रमाणेच अनेक खुळचट कल्पना आणि भ्रामक समजुती पलंगाला बांधल्या गेल्या आहेत. त्यातील एक कल्पना म्हणजे पुरुषाने आई किंवा वहीण वापरीत असलेल्या पलंगाला नुसता स्पर्श केला तरी त्याला मातागमनाचे पाप लागते. दुसरी अशीच भ्रामक समजूत म्हणजे तरुण माणूस म्हाताऱ्या माणसाबरोबर एकाच पलंगावर झोपला तर त्याच्या तारुण्याचा जोष आणि जोम कमी होतो. पलंगपोसावर पडलेल्या वळयांवर किंवा खुणांवर जादूटोणा करता येतो अशी एक समजूत पूर्व युरोपात आणि ग्रीसमध्ये फार दृढ होती. त्यामुळे लोक पलंगावरून उठल्याबरोबर पलंगपोसावरच्या या सर्व खुणा काढून टाकीत. या खुणांवर खंजिर खुपसला तर ज्याच्या अंगाच्या त्या खुणा आहेत अशी समजूत ऑस्ट्रेलियाच्या आदिवासीतही रूढ होती. सोळाव्या शतकात इंग्लंडचा राजा ७ वा हेन्री आपल्या बिछान्यावर याचसाठी 'पवित्र उदक' शिंपडून घ्यायचा! दक्षिणोत्तर पलंग ठेवला तर झोप येत नाही असं मानणारी माणसं अजूनही सर्वत्र आढळतात. तुळईखाली झोपले म्हणजे वाईट स्वप्ने पडतात असा लोकभ्रम भारतातील खेडोपाडी अजूनही प्रबल आहे.

दक्षिण आफ्रिकेतील पुरुष शिकारीला गेले आणि त्याना शिकार मिळाली नाही की प्रथम त्यांच्या डोळचापुढे उभा राह्यचा घरातील पलंग. घरात आपली पोरं आपल्या पलंगावर हुंदडत असतील आणि म्हणूनच आपली शिकार हुकली असा समज करून घेऊन शिकारी घरी परत यायचा तो पोराना प्रसाद आणि बायकोला शिव्या देण्यासाठी! शिकारी जंगलात गेल्यावर पाठीमागे त्याच्या पत्नीने व्यभिचार केला तर शिकाऱ्याची शिकार तरी हुकते किंवा त्याच्यावर काहीतरी गंडांतर येते अशी समजूत बोलिव्हिया आदि देशात प्रचलित होती. चित्त्याने आपल्यावर झडप घातली याचे कारण आपल्या बायकोच्या अंगावर तिकडे कुणीतरी झडप घातली असली पाहिजे. किंवा आपल्याला सर्पदंश झाला म्हणजे आपल्या पश्चात् आपल्या बायकोचा कुणीतरी ओष्ठदंश करीत असला पाहिजे, अशा भ्रामक समजुतीमुळे अनेक बायका शिकाऱ्यांचीच शिकार झाल्या आहेत, त्यांच्या भाल्याला नाही तर कोयत्याला बळी पडल्या आहेत.

(क्रमशः)



ही आपली परिचयाची काटेरी शय्या

( पृष्ठ ४३ वरून...... **अंजनीबाई मालपेकर** )

जातकुळी' हे बारावे प्रकरण जेव्हा त्यानी वाचले,– तेव्हा त्यासंबंधी मला पाठविलेल्या पत्नात त्यानी असे लिहिले होते की, "तुम्ही आपल्या पहिल्या कादंबरीचा नायक गोवेकरणीचा मुलगा दाखवून विनाकारण वादाला जागा उत्पन्न करून दिली आहे. एरव्ही तशी या कादंबरीवर टीकेची झोड उठणारच आहे. पण त्याच्या भरीस नायकाची जातकुळी ही आणखी एक वादाची वाव तुम्ही टीकाकारांच्या हाती देत आहात. तुमच्या कम्युनिस्ट मित्रानादेखील आपल्या मुंबईतील चळवळीचा प्रवर्तक गोवेकरणीचा मुलगा दाखविलेला आवडणार नाही" श्री. खानोलकर यानी दिलेला हा इशारा मला योग्य वाटला. तरीसुद्धा मी चंद्रशेखरच्या जातकुळीत बदल केलेला नाही. 'स्वर्वेश्या' मानण्यात आलेल्या अप्सरांच्या पोटी जन्मलेले अनेक ऋषि आणि राजे यांच्या पुण्यप्रतापाने आपल्या देशाचा पुराणेतिहास उजळून गेलेला आहे. माझा हा नायक त्या उज्ज्वल प्रणालिकेतला आहे, असे मला दाखवावयाचे होते. अर्थात् त्याच्या या धीरोदात्त व्यक्तित्वाला अनुरूप अशी माता मला हवी होती. ती श्री. अंजनीबाईंच्या ठिकाणी माझ्या दृष्टीस पडली. सौंदर्य आणि कंठमाधुर्य यांचे केवळ निधानच अशी गोवेकरणी असूनही पुन्हा सत्त्वशील आणि साध्वी! – हा अंजनीबाईंच्या चारित्र्याचा आणि लौकिकाचा जो प्रभाव माझ्या मनावर पडला तो पुढे सोळा वर्षांनी चंद्रशेखरच्या आईच्या चित्रणाला साधनीभूत झाला. १९६३ च्या मार्चमध्ये बाईची आणि माझी जी पहिली भेट झाली, त्या भेटीच्या वेळी त्याना 'आईसाहेब' म्हणून जेव्हा मी लवून अभिवादन केले, तेव्हा त्या गोंधळून माझ्याकडे पहात राहिल्या. आता हा लेख वाचल्यावर कोणत्या भावनेने मी त्यांना त्यावेळी 'आईसाहेब' म्हणून संबोधिले होते, याची त्याना प्रथमच कल्पना येईल.

ऐन तारुण्यात केवळ शीलरक्षणासाठी स्वतःच्या चरितार्थाचे साधन स्वेच्छेने गमावणारी गायिका श्रीमती अंजनीबाई याच बहुधा पहिल्या असाव्यात. त्यांची संगीताविषयी अशी भावना आहे की "शील जे टिकवू शकतात, तेच संगीताचे तपस्वी होऊ शकतात आणि तरच संगीताचा दैवी प्रभाव पडू शकेल. सुरातच स्वर्वेश्वराचे स्वरूप सामावलेले आहे. मानवाने त्याचे उपासक होऊन अनन्यभावाने भक्ती केली पाहिजे." पाश्चात्य रसज्ञानी संगीत ही सर्व कलांची शिराणी मानलेली आहे. तथापि आपल्या धर्मशास्त्रानी मात्र "वीणावादनतत्त्वज्ञः श्रुतिजातिविशारदः। तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं निगच्छति" या उक्तीनुसार, संगीत हा मोक्षमार्ग मानलेला आहे. श्री. अंजनीबाईनी गायनाचा धंदा सोडून दिला, याबद्दल मला वाईट वाटत नाही. पण, आपल्या मातोश्रींच्या निधनानंतर त्यानी तंबोरा कायमचा हातातून खाली ठेवला, याबद्दल मात्र पराकाष्ठेचा खेद वाटतो. कुमार गंधर्व आणि बेगम अख्तार यांच्यासारखे शिष्य ज्या या श्रेष्ठ गायिकेच्या तालमीत तयार झाले, त्या गायिकेने जर तंबोरा ठेवला नसता, तर आपल्या उस्तादांच्या पायांपाशी छत्तीस वर्षे बसून जी विद्या तिने संपादन केली, ती विद्या तिच्यापासून गेल्या छत्तीस वर्षात घेण्याचे भाग्य कितीतरी विद्यार्थ्यांना लाभले असते. त्या दृष्टीने श्री. अंजनीबाईंचा संगीतसन्यास ही एक प्रकारची राष्ट्रीय हानीच होय. म्हणूनच संगीताचार्य श्री. रामकृष्णबुवा वझे यानी त्यांच्या या संन्यासाविषयी जो संताप व्यक्त केलेला आहे, तो मला योग्य वाटतो. संगीत ही जर मोक्षदायिनी विद्या आहे, तर ती सोडण्याचं कारण काय? उलट सौभाग्य आणि वैभव यांचा अस्त झाल्यावर बाईनी आपल्या प्रतिभेच्या जोरावर नवीन चिजा बांधून, आपल्या स्वतःच्या गायकीचा विस्तार आणि प्रसार जर संन्यस्त वृत्तीने केला असता, तर त्यांची अलौकिक तपस्या सार्थकी लागली असती.

श्रीमती अंजनीबाईंच्या संगीतसंन्यासाचे कौतुक त्यांच्या अनेक चाहत्यानी केलेले आहे, पण मला मात्र ते कधी पटले नाही. उलट १९१६ साली 'नारायण आश्रमात' भलाथोरला तंबोरा हाती घेऊन "तो एक गोविंदु रे। तो एक परमानंदु रे" हे भजन आळवीत श्रीनारायणमहाराजांसमोर बसलेली जी त्यांची मूर्ती मी पाहिली होती, तीच मूर्ती आजही माझ्या डोळ्यांपुढे आहे. मला त्यांचे ते वार्धक्य आणि तो संन्यास ही दोन्ही दिसत नाहीत. संगीत आणि सौंदर्य यांचे केवळ निधानच अशी ती भावसमाधीत विलीन झालेली तरुण गायिका तेवढीच दिसते. •••










# शिधोजींचं ठसकं

## अघळ पघळ नि तीन मजली



" कोण म्हणतो आम्हाला थट्टा समजत नाही! त्या पेशव्याची, पटवर्धनाची नि छत्रपतींची आम्ही जन्मभर थट्टाच केली की! बिनडोक लेकाचे..इंग्रजाचा स्वभाव थट्टेखोर हे ओळखलं फक्त आम्ही नि थोरल्या छत्रपतींनी... कुठं आहे तुमची विजेरी! चाल-वाना आमच्यावर..." शिधोजीनं आव्हान दिलं... पण ते मी कसं स्वीकारलं...!

" ......मेरगुंड, हदग गोळ, कुडवापी, पाग म्हसवड ही गावं घेऊन रामनवमी आम्ही गुंदीला मुक्कामाला आहोत; त गुंदीला अवश्य येऊन भेटा ...."

——श्रीपतराव गुत्तीकरांचा तातडीच खलिता मी वाचत होतो.

" ....दक्षिण महाराष्ट्राची ही स्वा तोटयात आहे. उत्पन्न मुळीच नाही लागोपाठ दोन वर्षे अवर्षण पडल्याम सारा मुलूख हवालदील झाला आ कोणाचेही चित्त ठिकाणावर नाही. का तरी नवीन करायलाच पाहिजे. जु खेळांच्या चिपाडात 'आता रस राहि नाही. नवीन काही केल्यासच तरणोपा आहे. तरी अविलंबे गुंदीला ये भेटावे ...."

श्रीपतराव गुत्तीकर म्हणजे प्र गुणवंत संगीत मंडळीचे मालक. एकेका गाजलेले गद्यनट. एकोणीसशे चव सालची गोष्ट सांगतो आहे. नाटकमं ळांच्या हलाखीच्या काळातली. ह्या ह खीचंच वर्णन श्रीपतरावानी आपल्या पत्र केलं होतं.

" ....दहा वर्षापूर्वीचा काळ आठव की डोळयात अश्रू उभे रहातात. मुंब- पुणे—खानदेश—वऱ्हाड ह्या त्यावेळ आमच्या मातबर उतारपेठा. वऱ्हाडात कपाशीचा हंगाम म्हणजे नाटक मंडळ्यां पर्वणी. सन चोवीसमध्ये वऱ्हाडात गे होतो; अवघ्या दोन नाटकांवर सहा म मुक्काम ठोकला होता अमरावती संगीत रणभैरवी आणि संगीत ग्रहद अक्षरशः खोऱ्यानं पैसा ओढला. त्यावे आमच्या भूगोलात फक्त चारच गा मुंबई, पुणं, अमरावती, नागपूर, इत आम्ही कधी ढुंकून पाहिलं नाही. आ फिरतो आहोत त्या गावांची नावं स्वप्ना सुद्धा ऐकली नव्हती ...."





अनुक्रमणिका

—— अगदी खरं होतं. संगीत रणभैरवीचा त्या जमान्यातला तो वैभवशाली प्रयोग मला आठवला. उदात्त नाट्यप्रसंग, धारदार संवाद, उत्तम नटसंच, उत्तम पोषाख, देखावे, संगीत व मंडळीचा लौकिक. त्यातही विशेष म्हणजे मास्टर मंगेशनाथाचं तडफदार काम आणि खड्या, पहाडी, फिरत्या पल्लेदार आलापीचं गाणं. सारंच डोळे दिपवणारं ! दृष्ट लागल्यासारखं. संगीत रणभैरवी आणि संगीत ग्रहदशा म्हणजे गुणवंत कंपनीचे हातखंडे खेळ. हुकमी एक्के. हस्ताच्या पावसागत पैसा पाडायचे .... अशा जमान्यात श्रीपतराव कशाला इतरत्र ढुंकून बघतील ? अमरावतीच्या त्यावेळच्या मुक्कामात मी त्याना एकदा भेटायला गेलो होतो–नवीन लिहिलेलं नाटक वाचून दाखवायच्या धाडसी इराद्यानं ! —— नीट बोलणं तर सोडाच परंतु त्यानी त्यावेळी माझ्याकडं नीट पाहिलंसुद्धा नव्हतं ... याची मला आठवण झाली. पण त्यावद्दल त्याना मी कधीच दोष दिला नाही. दोष असलाच तर तो त्या वैभवाचा; धंद्याच्या चलतीचा. एरव्ही, श्रीपतराव उर्फ आबासाहेब गुत्तीकर म्हणजे चारचौघांच्या बैठकीतला माणूस. उमदा, रसिक, दिलदार, श्रीमंत खानदानी घाट घडणीचा.

" .... माणसं नेमकीच ठेवली आहेत. पसाराही कमी केला आहे. तरी खर्च कमी होत नाही. आणि कर्जाचा पारा तर सारखा चढणीवर आहे. कर्जापायी आता जिकीरीला आलो आहे. नवीन सावकार मिळत नाही. नवीन काही तरी केल्यास, केल्याचे सार्थक आहे. ... "

—— पहिल्या बाजीरावनं ब्रम्हेंद्रस्वामीना लिहिलेल्या पत्राची मला आठवण झाली. "नित्य उठोन कर्जदाराचे पाया पडावे ...." आबा गुत्तीकरांप्रमाणंच तोही कर्जापायी जिकीरीला आला होता. मराठ्यांची मुलुखगिरी म्हणजे सारा आतबट्ट्याचा व्यवहार; मग तो बाजीराव असो अथवा श्रीपतराव असो. शाहीर प्रभाकराप्रमाणंच " भ्रमर गुंतले पहा कर्जाच्या कमळात ..."

" .... चित्रपटाच्या पेंढारानं तर पळता भुई थोडी केली आहे. आमचे गोट साफ लुटून फस्त झाले. बुणग्यानी हुजरातीची फौज लुटावी तशी आमची अवस्था झाली आहे .... मुंबई पुण्याकडं तोंड दाखवायचं म्हणजे हातात काहीतरी नवीन पाहिजे. तुमचं नाटक हात देईल असा भरवसा आहे. त्याच्या तालमी तावडतोब सुरू करायला हव्यात. म्हणून म्हणतो काही झालं तरी गुंदीला अवश्य येऊन भेटाच ...."

—— हेच नाटक दहा वर्षापूर्वी त्याना वाचून दाखविण्याकरिता मी कंपनीच्या बिऱ्हाडी गेलो होतो; परंतु त्यावेळी त्याना माझ्याकडे बघण्याससुद्धा सवड नव्हती. दरम्यान मी लेखक म्हणून नांवाजलो. श्रीपतरावांचा व माझा विशेष परिचयही झाला. माझे नाटक मी त्याना नुकतेच वाचून दाखविले होते, ते त्याना पसंत पडून लवकरच रंगभूमीवर आणावयाचे आश्वासनही त्यानी मला दिले होते. आता त्यानाच त्याची निकड होती. त्याच अर्थाचा खलिता त्यानी तातडीनं मला पाठविला होता व पुन्हा पुन्हा आवर्जून लिहिलं होतं, " काहीही झालं तरी गुंदीला अवश्य येऊन भेटा ..."

## — चित्रकार द. ग. गोडसे

आबांच्या हाकेला धावून जाणं भागच होतं. तातडीनंच गुंदी गाठायचं ठरवलं .... खरं, परंतु ही गुंदी आहे कुठं ?

मराठ्यांच्या इतिहासात थोरातांची गुंदी गाजली होती. उत्तरपेशवाईत अनेक उपद्व्याप केल्यामुळं गाजलेला शिधोजी उर्फ आप्पा थोरात हा गुंदीचाच हेही आठवलं .... परंतु ही गुंदी होती कुठं ?

दक्षिण महाराष्ट्रातल्या रेल्वेची सारी टाईम टेबलं धुंडाळली. —— अखेर गुंदी सापडली.

—— शेलारवाडीकडून सोलापूरला जाताना पाचवं स्टेशन. फलॅग स्टेशन. फक्त पॅसेंजर गाड्या दीड मिनीट थांबणारं ! ! !

काय गंमत आहे पहा. थोरातांची एकेकाळी गाजलेली राजधानी गुंदी —— आणि आज तिथं पॅसेंजर गाडीसुद्धा मोठ्या मिननतवारीने थांबते—— तेही दीड मिनीट !

स्वर्गात शिधोजी थोराताना त्याची खबर नसावी. एरव्ही त्या बहाद्दरानं साऱ्या गाड्या जाम साखळदंडानं गुंदी स्टेशनावर बांधून ठेवल्या असत्या, हत्तीच्या पायात अंदू घालतात त्याप्रमाणं. उत्तरपेशवाईत गाजलेला हा शिधोजी उर्फ आप्पा थोरात म्हणजे खरोखरच एक अजब प्रकरण होतं. गुंदीच्या प्रवासात शिधोजीचा सारा चरित्रपट माझ्या डोळ्यांसमोरून सरकला.

गुंदीच्या थोरातांचं हे घराणंच तऱ्हेवाईक. खरं म्हणजे थोरात हे ह्या घराण्याचं नाव नव्हे. त्यांचं मूळचं नाव थोराट; आणि घराणं लिंगायत. गुरुंदीकर थोराट म्हणून जे पुरातन लिंगायत घराणं कानडी मुलखात होतं त्यांच्या पैकीच हे. या घराण्याचा मूळ पुरुष शिदगवंडा. आदिलशाही कारकीर्दीपासून हिरगुप्पी व गुंदी या गावांचे हे इनामदार. शिदगवंडाचा मुलगा सर्जेराव व सर्जेरावाचा भवानराव. शिवशाहीतला हा भवानराव महान उपद्व्यापी. पराक्रमी खरा परंतु वारा वाहील तशी पाठ फिरवणारा. पक्का संधिसाधू. कधी आदिलशाहीची चाकरी कर तर कधी शिवाजीच्या बाजूनं लढ, असा दुटप्पी व दुहेरी. संभाजी राजांच्या कारकीर्दीत त्यानं शिवशाहीला सामील व्हायचं ठरवलं तेही मोठ्या युक्तीनं. लिहिणं वाचणं बेतास बात होतं तरी मोठ्या हिकमतीनं कवी कलुशाची मर्जी संभाळून—साऱ्या सरकारी कागदपत्रातून 'ट' चा 'त' करून या भवानरावानं आपलं आडनाव ' थोराट'चं 'थोरात' केलं आणि अव्वल आदिलशाहीतलं हे काहीश्या साशंक खानदानीचं लिंगायत घराणं, शंभुराजांच्या वधानंतरच्या अस्वस्थ मराठेशाहीतील गोंधळाचा फायदा घेऊन, थेट ब्याण्णव कुळी मराठ्यांच्या पाक पंगतीत जाऊन बसलं.

या भवानरावाला दोन बायका. पैकी थोरलीचा पुत्र खासेराव त्याचा नातू म्हणजेच उत्तरपेशवाईतला पराक्रमी परंतु उपद्व्यापी म्हणून गाजलेला शिधोजीराव उर्फ आप्पा थोरात.

थोरात ह्या नावाचा आप्पा थोराताना येवढा अभिमान असे की कोणी थट्टेनं त्याना थोराट या त्यांच्या पूर्वीच्या नावानं संबोधलं तर थोराट म्हणणाऱ्याची ते तिथल्या तिथं गर्दन उडवीत म्हणतात.








उचलली जीभ की लावली टाळ्याला असला बेजबाबदार प्रकार आप्पा थोरातांच्या सदरेवर चुकूनसुद्धा घडत नसे. 'ध'चा 'मा' केला म्हणून एकाच नारायणराव पेशव्याचा जीव गेला; पण 'त'चा 'ट' केला म्हणून किती जिभांची बोबडी वळली हे एक आप्पा थोरातांची तरवारच जाणे.

या 'त'च्या तडाख्यात आप्पा थोरातानं प्रत्यक्ष इंग्रजांचीही भीड-मुर्वत ठेवली नव्हती म्हणतात. पारनेरच्या चकमकीनंतर इंग्रज फौजांचा सेनापती जनरल माल्कम यानं आप्पा थोरातांशी तहाची बोलणी करावयास दोन खास मराठी बोलणारे गोरे अधिकारी गुंदीला पाठविले. आप्पासाहेब दरवाजाचे सदरेपर्यंत साहेबास सामोरे झाले व त्यास घेऊन दुमजल्यावर बैठक घातली होती तेथे गेले. खैरीय-तीची बोलणी झाल्यावर आलेल्या साहेबानी आप्पासाहेबाना उद्देशून-

"शरदार श्रीमंट आप्पासाहेब ठोराट . . . ." अशी सुरुवात करताच आप्पासाहेबानी दोन्हीही साहेबांच्या मुसक्या बांधून, त्यांची तावडतोब वाड्याच्या तळघरात रवानगी केली. साहेब म्हणून येवढी गय झाली एरव्ही गर्दनच उडाली असती. आपल्या बोलण्यात श्रीमं-तांची काय थट्टा झाली याचा त्या साहेबाना उमज पडेना. शेवटी साहेबांच्या भिकार इंग्रजी भाषेत 'त' हा उच्चारच नाही, फक्त 'ट'च आहे. त्यामुळे केवळ अपरिहार्यतेने बिचाऱ्या साहेबांकडून 'त'चा 'ट' झाला. अशी कोणा दुभाष्यानं आप्पांची समजूत घातली, तेव्हा त्या साहेबांची तळघरातील बंदिखान्यातून सुटका झाली आणि तहाची बोलणी तर सोडाच परंतु तोंडातून एक अक्षरसुद्धा न काढता त्या दोन्हीही साहेबानी गुंदीतून धूम ठोकली.

या अनुभवापासून इंग्रजानी शिधोजी थोराताची येवढी दहशत घेतली म्हणतात की गुंदीला त्यानंतर येणारे साहेब, स्वच्छ शुद्ध व स्पष्ट मराठी बोलू लागले. "पुण्यामाजी मोगरी" आणि "परिमळा-माजी कस्तुरी" वगैरे वगैरे मराठीचं कौतुक पूर्वी एका साहेबानंच केलं होतं हे जरी खरं असलं, तरी ही मोगरी आणि कस्तुरी किती जपून वापरावी लागते हे साहेबाना शिकवलं एकट्या शिधोजी थोरातानंच. अंग्रेजांचे मराठी 'अल्फाज' ठीक करणाऱ्या शिधोजीची ही कामगिरी आज किती लोकाना माहीत आहे ?

या शिधोजीरावाचा जन्म शके १७०० म्हणजे इसवी सन १७७८ साली झाला. शिधोजीची आई आणि कोल्हापूरकर छत्रपती यांची राणी ह्या सख्ख्या वहिणी. शिधोजी जन्मला तो आईबापांच्या मूळा-वर. प्रथम बाप आणि नंतर थोड्याच दिवसात आई वारली. मावशी-नंच त्याला लहानपणी वाढवलं आणि छत्रपतीनी तर त्याच्यावर मुलाप्रमाणं प्रेम केलं. पोरकं पोर म्हणून शिधोजीचे लाडही फार झाले; इतके की त्यापायी तो लहानपणापासूनच बेगुमान व वांड झाला. वर्णानं काळा सावळा, मोठ्या टपोऱ्या डोळ्यांचा, हाडापेरानं दांडगा, धिप्पाड, पाच साडेपाच हात उंच. त्यातच बाळपणापासून कुस्तीचा कोल्हापुरी षौक. लाल मातीची आडदांड गुर्मी आणि बेहिशेबी मस्ती रोमारोमात भिनलेली. वृत्तीनं हूड आणि जिद्दी. तेवढाच उपद्व्यापी. स्वस्थ बसणं माहीत नाही. पोरवया-तील त्याचे उपद्व्याप पाहून छत्रपतीना त्याची काळजीच वाटत होती. वयात आल्यावर त्याला जबाबदारीची जाणीव व्हावी म्हणून छत्रपतीनी त्याला आपल्या खास एकांडे मानकऱ्यात शिलेदाराची जागा दिली. मावशीनं भाच्याचं लग्नही जुळवत आणलं होतं. —सारं काही व्यवस्थित झालं असतं तर शिधोजी मार्गाला लागला असता. पण साऱ्या गोष्टी बिनबोभाट झाल्या तर तो शिधोजी कसला ? पुढे गोष्टीच अशा घडल्या की शिधोजीनं प्रत्यक्ष छत्रपतीशीच कायमचं हाडवैर धरलं.

मावशीनं शिधोजीकरिता मुलगी हेरून ठेवली होती ती कोल्हा-पूरचे एक सरदार शहामतराव खंडागळे, अमीर उल उमराव, यांची. खंडागळ्यांचं घराणं जुनं व खानदानी. मुलगी नाकी डोळी सुंदर—देखणी, परंतु शिधोजीसारख्या आडमाप जवानाच्या मानानं फारच लहान व नाजुक. साऱ्याच दृष्टीनं हा जोडा विजोड. शिवाय खंडागळ्यानासुद्धा मनातून शिधोजीसारखा दांडगा जावई नकोच होता. परंतु राणीसाहेबांचा आग्रहही त्याना मोडता येईना. शेवटी शहामतरावानी प्रत्यक्ष छत्रपतीना खाजगीत भेटून आपली अडचण सांगितली आणि छत्रपतीनाही मुलीची कीव येऊन अखेर खंडा-गळ्यांच्या मुलीचं लग्न छत्रपतीनी स्वतःच पुढाकार घेऊन आपल्या पदरचे हिंमत बहादुर, पवार, उमदेतुल उमराव या तरुण कुलवंत सरदाराशी लावून दिलं.

शिधोजीला हे सहन होणं शक्यच नव्हतं. ह्या अपमानानं शिधो-जीच्या अंगाचा तिळपापड झाला व त्यानं छत्रपतींचा सूड घेण्याचा निश्चय केला. "आता प्रत्यक्ष छत्रपतींचीच मुलगी बायको करीन तरच नावाचा शिधोजी थोरात—" अशी प्रतिज्ञा करून त्यानं

कोल्हापूर सोडलं – ( छत्रपतींची मुलगी तर खंडागळयांच्या मुली-पेक्षाही चार वर्षांनी लहान होती. )

शिधोजी कोल्हापूर सोडून निघाला आणि कोल्हापूरकरांचे कडवे शत्रू पटवर्धन यांच्या पदरी जाऊन राहिला. शिधोजीच्या पराक्रमाबद्दल, त्याच्या शिपाईगिरीबद्दल वादच नव्हता. परशुराम भाऊनाही कोल्हापूरकरांकडचा मनुष्य हवाच होता. परशुरामभाऊनी शिधोजीला आपल्या सैन्यात सरदारी दिली. या संधीचा शिधोजीनं पुरेपूर फायदा करून घेतला. आपल्या खास पथकात त्यानं एकजात अरब लोकांचा भरणा करून आपल्या शिपाईगिरीचा एक वेगळाच नमुना भाऊना दाखवला. हे अरब सैनिक लढणारे मोठे कडवे आणि धाडसी. दीन दीन च्या आरोळ्या देत शत्रूवर तुटून पडले की मोठमोठ्या पथकांचा त्यांच्या समोर अक्षरशः धुव्वा उडत असे. ते एकनिष्ठ फक्त शिधोजीलाच; आणि शिधोजीचीही त्यांच्यावर येवढी करडी जरब होती की पटवर्धनांच्या तैनातीत असले तरी फक्त शिधोजीचीच आज्ञा त्याना मान्य. भाऊचीसुद्धा ते पर्वा करीत नसत. येवढेच नव्हे तर वेळप्रसंगी भाऊंच्या सैन्यावरही हात टाकण्यास ते मागे पुढे पहात नसत. भाऊंच्या मते,"शिधोजी थोराताचे हे 'अरबट' म्हणजे नसतं लचांड झालं आहे; सोडलं तर पळतं आणि धरलं तर चावतं." सन १८०० नंतर शिधोजीनं आपल्या 'अरबटांच्या' जोरावर मिरजेपासून विजापूरपर्यंत बेगुमान स्वाऱ्या करून खुद्द पटवर्धनांचाच प्रदेश उध्वस्त करून सोडला. पुढं पुढं तर त्यानं काहीच धरबंध ठेवला नाही. लहर लागेल त्याच्याशी लढणं हाच शिधोजीचा खाक्या झाला. धोंडजी वाघाविरुद्ध झालेल्या लढाईत तो इंग्रजांच्या वतीनं लढला––तर शिद्याविरुद्ध झालेल्या झटापटीत पेशव्यातर्फे भांडला. याचवेळी इंग्रजानी बाजीरावाजवळ त्याची खास शिफारस केली आणि बाजीरावानं त्याला पेशवे सरकारचे सरलष्करपद दिले. चार लक्ष तीस हजार रुपयांचा सरंजाम कायम करून सरलष्करीबद्दल आणखी अडीच लाखाचा जादा सरंजाम त्याला दिला; आणि सरलष्कर सरंजामदार शिधोजी आपले वडिलोपार्जित इनामदारीचे गाव गुंदी इथं स्थायिक झाला.

शिधोजीच्या मनात कोल्हापूरकरांची खोड मोडायची वखवख होतीच. बाजीरावाच्या मेहेरबानीचा फायदा घेऊन त्यानं याच वेळी आपल्या खास तैनातीच्या अरबी पथकाच्या खर्चासाठी म्हणून, चिकोडी व मनोळी हे कोल्हापूरकरांचे तालुके मुद्दाम पेशव्यांकडून मागून घेतले. आधीच शिधोजीसारखं भूत, त्यात बाजीरावासारख्या नादानाचं सरलष्कर झालेलं. सत्ता आणि संपत्तीनं उन्मत्त झालेल्या शिधोजीनं उत्पातांची परिसीमा केली. पेशव्यानी लावून दिलेले मनोळी व चिकोडी हे तालुके कोल्हापूरकरांकडून जबरदस्तीनं ताब्यात घेण्यास शिधोजीनं सुरुवात करताच कोल्हापूरकराना युद्धास उभे रहाणे भागच पडले. आपली प्रतिज्ञा पूर्ण करण्यासाठी शिधोजीही याच घटकेची वाट पहात होता. अखेर दोघांची निकराची लढाई झाली व शिधोजी आणि त्याच्या अरबटानी छत्रपतींच्या सैन्याची दाणादाण उडवून दिली. छत्रपतींची अडीच हजार माणसं मारली गेली, तीन हजार जखमी झाली व पांच मोठे सरदार पाडाव झाले. छत्रपती स्वतः जिवानिशी बचावले आणि निरुपाय होऊन त्यानी शिधोजीशी तहाची बोलणी सुरु केली.

शिधोजीनं पहिलीच अट घातली की छत्रपतींची मुलगी आपणास मिळत असेल तरच पुढे इतर बोलणं ! !

शिधोजीच्या ह्या लग्नाचा प्रकार जेवढा राक्षसी तेवढाच विनोदी. मांडव नाही–मुहूर्त नाही, भटाब्राम्हणांची वाफ्कळ लुडबुड नाही, मानपान, रुसणी फुगणी, वरात वाजंत्री यांचा घोळ नाही. अचानक एका संध्याकाळी आपल्या अरबी सेनेसह शिधोजी कोल्हापूरच्या वेशीवर येऊन उभा राहिला. पाच हजार अरब घोडेस्वार, नंग्या तरवारी एका हातात व दुसऱ्या हातात पाच हजार पलिते पेटवलेले. नवरदेव शिधोजी थोरात शिरस्त्राणावरच बाशिंग बांधून, एखाद्या नालपीरासारखा सर्वांच्या समोर घोड्यावर. तो सारा प्रकार पाहून अरबांना करबल्याच्या रात्रीची आठवण झाली असावी.

प्रथम शहराची नाकेबंदी करून छत्रपतींच्या वाड्याभोवती शिधोजीने नागव्या तरवारींचा व तोंडे पेटवून जय्यत केलेल्या बंदुकबारदारांचा सक्त पहारा ठेवला आणि आपल्या खास चारशे अरब गारद्यांच्या समवेत वाड्याच्या मधल्या चौकात प्रवेश केला. चौकाच्या भिंतीवर तरवारीच्या टोकाने चारदोन उभ्या आडव्या रेषा ओढून



## मनात होई कसेचसे——

ओठातच हासुनी मला तू पिसे लाविसी जसे जसे
काय होतसे मला कळेना मनात होई कसेचसे
कुरळकुंतला, चाल चंचला कबूतराचा डौल दिसे
चावट वारा उडवी अंचल सावरशी ग कसेबसे
गुलमोहर गालावर फुलला सांजमोहिनी वरी हसे
चंद्र चोरटा उरात लपवी वावरलेले असे ससे
नदी किनारी उमंग उर्मी करिती लहरी पाठशिवी
मनी बिंबले चित्र कुणाचे प्रतिबिंबातुनि हासतसे
पीत मदालस लोचन लाली धुंद वारुणी पात्रभरे
छलक पलक पापणी खुणावी आमंत्रण दे अबोलसे
काठावरली थरक चुंबने ओलविती ते गाल कसे
छुमछुमती पायात पैंजणे मुके बोलती जसे जसे
तुडवित जाशी हृदये प्रमदे तुला तयाची खंत नसे
पायदळी पाकळ्या विखुरल्या सहज चालता मदालसे
नजर तीर झेलिता जाहली चाळण कंपित देहाची
मोहळ झाले काळिज माझे नजराणा हा प्रेममिषे
फेकितसे सारजा कोपुनी काटेरी ते बाण जसे
स्पर्श थरारे फिरता नाजुक नयनांकित ती मोरपिसे
चिंचेतळिचे चोर चांदणे लपती छपती जसे ससे
भरवसेच ते दिले घेतले—शपथेला या कोण पुसे !
तिरस्कार उपहास साजणी प्रीत आपुली हसे रुसे
चालविता का उगाच नजरा शिकारीच जालात फसे
लपवी न कधी चंद्र लांछने चोराचा उजळा माथा
उजागरीची कोजागिरि ती अमृत बिंदू वर्षतसे
वाटेवरले चोर समजशी आम्ही न बाई असे तसे
ओठ चावता पुसतिल कसे दंशाचे ते गोड ठसे

—राजा वढे

नवऱ्या मुलीला त्या भिंतीसमोर आणून उभी करण्याची आज्ञा दिली. साऱ्या अरब गारद्यांना मूठ मूठ तांदुळाच्या अक्षता वाटल्या, कोणा दोघांनी अंतरपाट धरला. बाकी साऱ्यांनी "दीन, दीन"च्या ललकाऱ्या देत नवरानवरीवर अक्षता उधळल्या. 'लागलं लग्न! !—काही दगा फटका होण्याच्या आत एकाद्या भावलीसारख्या दिसणाऱ्या नवरीला घेऊन शिधोजीराव सहीसलामत गुंदीला परतलेसुद्धा. घरी आल्यावर शिधोजीनं नव्या नवरीचं नाव मुद्दाम "सकवारवाई" ठेवलं; कारण खंडागळ्यांच्या मुलीचं नांव तेच होतं. एका दगडानं दोन पक्षी.

सासरी आल्यानंतर वर्ष सहा महिन्यातच सकवारवाई वारली. खरं म्हणजे शिधोजीनं प्रतिज्ञा केली त्याच वेळी तिचं 'अहेवपणी' मरण नक्की झालं. पुढील तीन वर्षात शिधोजीनं पाच लग्नं केली. पाचही वायकांचं नाव सकवारवाईच ठेवण्यात आलं आणि या पाचही वायका पुढील तीन वर्षातच लागोपाठ निजधामास गेल्या. नंतर नंतर लहर लागेल तेव्हा लग्न असा शिरस्ता पडला. उभ्या हयातीत शिधोजीनं एकंदर बावीस लग्नं केली म्हणतात.

वायकांप्रमाणेच घोड्यांची गत. या दांडग्या माणसाची स्वारी साधारण घोड्यावर निभावत नसे. वर्षातून दोनतीन घोडी याच्या वैठकीखाली मोडायचीच. शिधोजी स्वतः अंगापिंडाने दांडगा होता हे मागे सांगितलंच. त्याचे अंगी विलक्षण शक्ती होती म्हणतात. गुंदीकर तर त्याच्या अफाट शक्तीच्या पराक्रमाची वर्णनं अजूनही करतात. हातानं पहार वाकविणे, घोड्याचे नाल हातात धरून सरळ करणे. दोन्ही हातात धरून सुपारी फोडणे वगैरे वगैरे. चांदीचं फुलपात्र हातात घेऊन कागदाच्या कपट्याप्रमाणं त्याचा चोळामोळा करणं म्हणजे शिधोजीच्या हातचा मळ. त्याची वंदुक किंवा तरवार दुसऱ्यास झेपत नसे. व्यायाम करायची त्याची जोडी व करेला अजूनही गुंदीच्या वाड्यात ठेवलेले आहेत, त्यावरून शिधोजीच्या शक्तीची कल्पना येते.

पहिल्या लग्नाच्या वेळीच शिधोजी थोरात पंधरा लाखाचा मातवर सरंजामदार व फौजवंद सरदार वनला होता आणि ही सारी कमाई त्यानं आपल्या मनगटाच्या जोरावर संपादन केली होती.

वृत्तीनं अफाट असला तरी व्यवहारात मात्र शिधोजी अगदी काटेकोर होता. त्यानं कधी कोणाला एक पैसा सोडला नाही. धोंडजी वाघाशी झालेल्या लढाईत इंग्रजानी त्याला पन्नास हजार रुपये रोख व फौजेला नालवंदी कबूल केली होती. शिधोजीनं रुपये पन्नास हजार रोख इंग्रजांकडून मोजून घेतले आणि नालवंदीपैकी सदतीस रुपये येणे राहिले होते; त्याकरिता पुढं पाच वर्षे पुण्याच्या व मुंबईच्या इंग्रजांशी पत्रव्यवहार चालू ठेवला होता. दानधर्म ही चीजच शिधोजीच्या हिशेबी आढळत नाही. त्यानं कधी देवस्थानाना इनामं दिली नाहीत किंवा कधी कुठं देवळं धर्मशाळा बांधल्या नाहीत.

आयुष्यात शिधोजीनं एकच वास्तू वांधली आणि ती म्हणजे गुंदीचा त्याचा रहाता वाडा. मुळात त्याच्या मनात किल्लाच बांधावयाचा होता, परंतु प्रथम पेशव्यानी आणि नंतर इंग्रजांनी हरकत घेतल्यामुळे शिधोजीला वाड्यावरच समाधान मानावे लागले.

शिधोजी थोरातानं बांधलेली वास्तू नांवाला वाडा, पण खरं म्हणजे ती एक प्रचंड गढीच होती. शिधोजीसारखीच अफाट,

अनुक्रमणिका

मजबूत, कडेकोट बंदोबस्ताची, आपल्या अंतरंगाचा ठाव न लागू देणारी.

पैश्यापैश्याला जपणाऱ्या शिधोजीनं वाड्याच्या बांधकामास मात्र अगदी मुक्त हातानं पैसा खर्च केला होता. किंबहुना इथं खर्चाला मर्यादाच नव्हती. उत्तम कारागीर दूरदूरहून बोलावण्यात आले होते, उत्कृष्ट सामान पडेल ती किंमत देऊन आणलं होतं. या वाड्याचा मूळ आलेख कोणी काढला होता याची नीट माहिती मिळत नाही, पण तो काढणाऱ्यानं शिधोजीच्या व्यक्तिमत्वाचा पूर्ण ठाव घेतला होता यात शंका नाही. गुंदीच्या थोरातांचा वाडा म्हणजे शिधोजी थोराताचे वास्तुशिल्पी स्मारक.

वास्तुशास्त्राच्या कोणत्याही एका घराण्याचं वळण या इमारतीला नव्हतं. तळमजला हिंदु पद्धतीनं बांधलेला दिसला तर त्यावरच्या पहिल्या मजल्याच्या बांधणीत इस्लामी धर्तीचा वापर झालेला आणि त्याही वरचा दुसरा मजला, त्यावेळी नुकत्याच विलायतेतून आलेल्या फिरंगी वास्तूचा नमुना. तीन संस्कृतींच्या तीन तऱ्हा. त्यामुळे प्रथमदर्शनी ह्या वाड्याचे स्वरूप गंगाजमनी दिसे. पण त्यातही एक वेगळ्या प्रकारचे आकर्षण होते असे हा वाडा प्रत्यक्ष पाहिलेल्या तत्कालीन एका इंग्रज गृहस्थानें नमूद करून ठेवले आहे. (बिशप फरेझर–"इस्टर्न मेमॉयर्स"). वाडा बांधला ती जागाही गुंदी गावाच्या थोडी बाहेर, एका टेकडीच्या आडोश्याला. रस्त्यानं सरळ जाणाऱ्या नवख्या माणसाला, पलीकडे थोड्याच अंतरावर एकादी मोठी वास्तू उभी असेल याची शंकासुद्धा येत नसे. परंतु टेकडीच्या पायथ्याचं वळण घेताच, लगतच पलीकडे उभा असलेला वाडा एकदम दृष्टीस पडे – दबा धरून बसलेल्या एकाद्या जनावरासारखा . . . आणि त्याच्या या अनपेक्षित दर्शनानं वाटसरू क्षणभर थबकेच.

या प्रचंड आणि तऱ्हेवाईक वाड्याची रचना नेमकी कशी होती हे स्वतः शिधोजीखेरीज फारच थोड्याना ठाऊक असावे. वाडा बांधणाऱ्या स्थपतीला अर्थातच ही माहिती होती हे खरे, परंतु वाड्याची वास्तू पूर्ण झाल्यानंतर तो स्थपतीही कुठे नाहीसा झाला, याचा कुणालाच पत्ता नाही. इतराना वाड्याबद्दल भीतियुक्त कुतुहल मात्र सदैव होतं–त्यात मोठमोठाली तळघरे होती, अंधारे, बंदिखाने होते, भुयारं, गुप्त वाटा, खजिन्याच्या खोल्या, भुलभुलैयांचे चकवे मार्ग, खलबतखाने, त्यांचे गुप्त दरवाजे, असले आपल्या गाठीचे अनेक वास्तुप्रकार होते. या गुप्त तळघरातूनच शिधोजीनं आपलं अफाट धन लपवून ठेवलं होतं म्हणतात. या साऱ्या तळघरात पोहोचायच्या गुप्त वाटा फक्त त्यालाच माहीत होत्या.

या वाड्यात विलासगृहांचीही तेवढीच रेलचेल होती. पहिल्या मजल्यावरचा मुसलमानी पद्धतीनं बांधलेला सदरेचा प्रशस्त दिवाणखाना विशेष उल्लेखनीय होता. शिधोजीचं सारं ऐश्वर्य या दिवाणखान्यात प्रतिबिंबित झालं होतं. विशेषेकरून या दिवाणखान्याचं जडावाचं छत व छताला टांगलेली झुंबरे–फारच प्रेक्षणीय होती. आजही जीर्ण झालेल्या ह्या वास्तूच्या अवशेषावरून तिच्या मूळ सौंदर्याची कल्पना येते. दिवाणखान्याप्रमाणेच राणीवशातील जाळी-महालाचं कोरीव संगमरवरी कामही विशेष वाखाणण्यासारखं होतं.

वाड्याबाहेर प्रशस्त बाग व बागेत ठिकठिकाणी पुष्करण्या, हौद, कुंड, लहानमोठ्या आकारांची तळी – राणीवशातील स्त्रियांसमवेत जलक्रीडा करण्याकरिता. पण राणीवशातील ह्या स्त्रिया म्हणजे शिधोजीच्या बायका नव्हेत. तर त्यानं पळवून आणून आपल्या बंदिखान्यात ठेवलेल्या सुंदर स्त्रिया.

अनेक सुंदर स्त्रियाना पळवून आणून त्यानं आपल्या वाड्याच्या बंदिखान्यात ठेवल्या होत्या. एकेवेळी असलेल्या स्त्रियांची संख्या शंभरावर होती म्हणतात. ह्या स्त्रियांशी क्रीडा करून स्वतःची करमणूक करणं हा शिधोजीचा आवडीचा छंद. परंतु शिधोजीचा खेळ व्हायचा आणि त्यात काही स्त्रियांच्या जिवावर बेतायचे. तो भयंकर प्रकार असाः

वाड्याच्या सज्जाखाली जलक्रीडा करण्याकरिता म्हणून शिधोजीने एक छोटेसें सरोवर बांधले होते. या सज्जावर सुंदर स्त्रियाना ओळीने उभ्या करून त्यापैकी एकीस मागून अचानक पाण्यात ढकलून देऊन सज्जाखालच्या सरोवरात ती कशी बुडते, बुडत असताना घाबरून कशी किंचाळते व शेवटी नाकातोंडात पाणी जाऊन तिचे कसे हाल होतात हे मोठ्या उत्सुकतेने पहाणे व खदखदून हंसणे हा शिधोजीचा एक विचित्र खेळ होता.










सुंदर स्त्रियांप्रमाणेच श्रीमंत सावकारांवरही शिधोजीचा डोळा असे. मागितलेले द्रव्य सावकारानी दिले नाही की काहीतरी कुभांड त्यांवर रचून जबरदस्तीनें त्याना तळघरातल्या बंदिखान्यात डांबून ठेवण्यात येई, किती तरी कैदी दहा दहा–वीस वीस वर्षे अशा रीतीने अंधाऱ्या तळघरातून खितपत पडल्याचे दाखले आहेत. शिधोजीचा दरारा आसमंतात येवढा होता की त्याचे नांव ऐकून सारे धनिक थरथर कापत. शिधोजीच्या तळघरातल्या बंदिखान्यात गेलेला मनुष्य सहसा जिवंत बाहेर पडत नसे. इंग्रज सेनपती जनरल मेडोज याने अठराशे छत्तीस साली गुंदीवर हल्ला करून जेव्हा ती सर केली त्यावेळी त्याने कित्येक असे बंदी मुक्त केले . . . .

☆ ☆

आमची गाडी मध्येच थांबल्यासारखी वाटली. शेजारी कोणीतरी कानडीमध्ये बोलले, मला त्याचा काहीच बोध झाला नाही. मी विचारले, "काय हो ?– गुंदी येथून कितवे स्टेशन ? "

"अहो हेच गुंदी. लवकर उतरून सोडा. गाडी फार वेळ थांबत नाही इथं !"

बॅग उचलून गाडीखाली मी जवळजवळ उडीच टाकली. . कुठलं स्टेशन अन् काय! फाटक्या अंगाचा एक पोर्टर हिरवी झेंडी घेऊन उभा. त्या शेजारी मला घ्यायला आलेले आबा गुर्तीकर उभे– मी कुठं दिसतो का या शोधात.

"आलात बुवा अखेर, अहो तुम्ही प्रत्यक्ष दिसेपर्यंत मला खात्री नव्हती तुम्ही याल याची."

'म्हणजे काय आबा? – मी तुम्हाला कळवलं नव्हतं?– मी नक्की येतो म्हणून ! – शिवाय आमच्या इतिहासात गाजलेली ही गुंदी प्रत्यक्ष पहायची इच्छा होतीच की आमची . . ."

आम्ही गावाच्या दिशेनं चालू लागलो. स्टेशनपासून गाव फर्लांगभर अंतरावर असावं.

"कंपनीचं बिऱ्हाड कुठं ठेवलं आहे ?"– मी विचारलं.

"काही विचारू नका. आम्हाला उतरायला कुठं जागाच मिळेना. गेले ते दिवस ! ! ! दहा वर्षांपूर्वी स्वतःच्या घरी आम्हाला जागा देण्यात, प्रत्येक मुक्कामाच्या गावकऱ्यात कोण अहमहमिका असायची! आता आमची साधी विचारपूससुद्धा कोणी करीत नाही. नाइलाजानं आम्ही थोरातांच्या जुन्या पडक्या वाड्यात बिऱ्हाड ठेवलं आहे . . . गावाबाहेर."

मी मनात विचार केला– एका परीनं हे बरंच झालं. शिधोजी थोरतांचा गाजलेला वाडा मला पहायचा होताच.

एका मोठ्या दरवाज्याच्या दिंडीतून आम्ही वाड्याच्या चौकात आलो. चौकाभोवतालच्या प्रशस्त लांब ओसरीच्या एका टोकाला कंपनीचं बिऱ्हाड थाटलेलं दिसलं. ओसरीवर एक लांब सतरंजी पसरलेली व भिंतीला लागून कंपनीतल्या लोकांच्या सामानाच्या पेट्या, ट्रंका, पथाऱ्या ओळीनं ठेवलेल्या. भिंतीतल्या खुंट्यांवरून कोट सदरे अडकवलेले, धोतरं, बनियन पंचे वाळत घातलेले.

पथाऱ्यांच्या मोजक्या संख्येवरून आबानी आता कंपनीत नेमकीच माणसं ठेवली होती याची खात्री झाली. मोजकी नटमंडळी – साथीवाले, एक व्यवस्थापक, तोच बाजारमास्तर, चार गडी व एक स्वयंपाकी. स्वयंपाक्याखेरीज सारे नाटकात प्रत्यक्ष अप्रत्यक्ष काहीतरी कामे करीत.

कंपनीतल्या माणसांशी आबानी माझी 'नाटककार' म्हणून ओळख करून दिली व आपल्या पथारीशेजारीच माझी बॅग ठेवून, स्वयंपाक्यास माझ्यासाठी चहा फराळाची आर्डर दिली. मी भोवतालच्या वाड्याचं निरीक्षण करू लागलो. या वाड्याबद्दल मी आजपर्यंत बरंच वाचलं होतं, ऐकलं होतं–आणि कल्पनेनं त्याचं एक चित्रही उभं केलं होतं. पण माझी कल्पना होती त्यापेक्षाही हा वाडा प्रत्यक्षात भयाण वाटला.

"संध्याकाळी तुम्ही अगोदर जेवणार की रात्री नाटक संपल्यावर आमच्याबरोबर पिठलंभात खाणार?– आज रात्री रणभैरवी लावलं आहे –नाटकाला येणार की इथंच थांबता ?–सांगाल त्याप्रमाणं व्यवस्था करतो ! "– आबांनी मला विचारलं.

दिवसभरच्या प्रवासानं–बसून बसून माझं अंग आंबल्यासारखं झालं होतं. गाडीतल्या खाण्यानं पोटही ठीक नव्हतं. शिवाय आता चहाबरोबर फराळ होणारच होता. म्हणून नाटकाला न जाता कंपनीच्या बिऱ्हाडीच थांबून विश्रांती घेण्याचं व रात्री नाटक संपल्यानंतर सर्वांबरोबर पिठलंभात खाण्याचं मी ठरवलं. आबानी त्याप्रमाणं स्वयंपाक्याला सूचना दिल्या–

"–आणि हे बघ देवराम, रात्री याना वाड्यात एकटं सोडून तू थिएटरवर येऊ नकोस बरं का ? बजावून ठेवतो आहे तुला– जा, आणि झटपट पाहुण्यांचं चहा फराळाचं तयार कर, तोपर्यंत मी त्याना वाडा दाखवून आणतो–"

आबा एकाद्या लहान मुलासारखी माझी काळजी घेत असल्याचे पाहून मी मनातल्या मनात चांगलाच हसलो.

शिधोजी थोराताचा सात चौकी वाडा आबा मोठ्या आस्थेने दाखवू लागले. चौकाभोवतालच्या लांब अंधाऱ्या ओसाड ओसऱ्या, त्यासमोर कायम पहारा दिल्यागत उभे असलेले जीर्ण, नक्षीचे लाकडी डेरेदार खांब, ओंगळ, पारोसे बुरसलेले. आज कित्येक वर्षे त्यांच्या अंगाला कधी तेल लागलं नाही की पाणी शिवलं नाही. अगडबंब तुळया, प्रचंड रुंद भिंती, त्यामधले भकास कोनाडे–मध्येच कुठं खिंडारं पडलेली, कुठं वीत वीत रुंदीच्या चिरा गेलेल्या. निरुंद अंधारी जिने–प्रशस्त पडकी दालने, उध्वस्त दिवाणखाने. वाड्याची बरीच पडझड झाली होती. दगडी खोदकामाच्या ढलप्या उडाल्या होत्या, लाकडी नक्षीकाम कुजले अथवा कीड लागून पोखरून निघाले होते व छता–भिंतीवरील गिलाव्याला तडा पडून त्यावरील रंगकामाचे टवके उडाले होते. सगळीकडे अनेक वर्षांची साचलेली धळ, कोपऱ्याकोपऱ्यातून आ वासून बसलेला कुबट कुरूप अंधार. . व पारव्या-पाकोळ्यांच्या घाणीचा दर्प . . . .






शिधोजीनं वांधलेल्या या वाड्याची आवाना बरीच माहिती दिसली. प्रत्येक खोलीची, दालनाची, तळघराची ते तपशीलवार माहिती देत होते. मधूनमधून प्रत्यक्षात घडलेल्या अथवा ऐकीव कथा किश्श्यांचा दाखला सादर करीत होते. मी सारं ऐकत होतो. काहीशा साशंक कुतुहलानं.

"ही शिधोजी थोराताच्या जलक्रीडेची जागा, वरं का?– हे खाली छोटेसे सरोवर, त्यावेळी हे पाण्यानं तुडुंब भरलेलं असे. त्यावरचा हा सज्जा. ह्या सज्ज्यावर ओळीनं स्त्रियांना उभं करण्यात येई व त्यापैकी एकीला नकळत खालच्या सरोवरात ढकलून देण्यात येई. पाण्यात पडलेली स्त्री किंचाळे, पाण्यात गुदमरून ओरडे, नाकातोंडात पाणी जाऊन अखेर सरोवरात वुडे.... आणि ह्या समोरच्या खिडकीत वसून शिधोजीराव ही सारी गंमत वघे व खदखदून हसे.... अजूनसुद्धा रात्री कधीकधी त्या स्त्रियांचं किंचाळणं ऐकू येतं म्हणे इथं–" आवा दवक्या आवाजात सांगू लागले.

"असं?"– मी जरा थट्टेनंच बोललो, "बराच गमत्या होता की हा शिधोजीराव. त्या बिचाऱ्या स्त्रिया बुडत असताना हा खद-खदा हसत बसे काय?"

"शिधोजीचं हसणं फार प्रसिद्ध या भागात!! त्याच्या ह्या तीन मजली वाड्यासारखंच, भक्कम आणि वुलंद–धृपदियानं–एकादी मुष्किल तान सहज घ्यावी तसं. पंचक्रोशीतल्या लोकांच्या छातीत अजून धडकी भरते त्याचं हसणं ऐकून."

"म्हणजे... अजून हसतो तुमचा हा शिधोजी?" मी मुद्दाम चेष्टेनंच विचारलं, 'त्याचं हे घरंदाज हसणं ऐकलंच पाहिजे एकदा...' त्याकडे दुर्लक्ष करून आवा दवक्या आवाजात सांगू लागले– "...शिधोजीचं भूत अजून ह्या वाड्यातच रहातं म्हणतात... कोणी सांगावं? ह्या भिंतीआडून तो आपलं सारं बोलणं ऐकतही असेल. त्याच्याविरुद्ध वोलण्याची सोय नाही. शिधोजीला थट्टा तर मुळीच खपत नाही. कुणी त्याची चुकून थट्टा केली तर त्या रात्री इथं रहाणाऱ्याना तो फार उपद्रव देतो म्हणे..." आणि एकदम आवाज चढवून आवा मोठ्यानं म्हणाले– "आमच्यावर मात्र शिधोजीरावांची फार वहाल मर्जी आहे वरं का! हो उगाच खोटं कशाला वोला! अजूनपर्यंत त्यानी आम्हाला कोणताही त्रास दिला नाही."

आवांच्या आवाजातील हा नाटकी चढउतार पाहून मला फारच गंमत वाटली. मीही जरा मोठ्यानंच म्हणालो–

"वरोवरच आहे आवा!! तुम्हाला शिधोजी कसा त्रास देणार?–तुम्ही त्याला नाटकाचा कायम पास दिलेला असणार." –मी मुद्दामच मोठ्यानं हसलो, शिधोजीसारखंच अघळपघळ आणि तीन मजली. आबाजूचीजू रिकामी दालनं माझ्या हसण्यानं दणाणली. हास्याचे पडसाद पलीकडच्या साऱ्या लहानमोठ्या खोल्यातून वराच वेळ घुमत होते.

एका अंधाऱ्या खोलीत शिधोजीची व्यायाम करायची जोडी व करेला ह्या वस्तू पडलेल्या दिसल्या. त्यांच्या अजस्रपणावरून शिधोजीच्या दांडगेपणाची कल्पना आली.












अनुक्रमणिका

तळघराकडे जाणाऱ्या एका निरुंद अंधाऱ्या जिन्याच्या तोंडाशी आम्ही उभे होतो. आबा सांगत होते – "हा जिना तळघरातल्या धनाच्या खोल्यांकडे जातो म्हणतात. रोज रात्री मशाल हातात घेऊन शिधोजी तळघरात उतरतो व आपल्या साऱ्या धनाचा बंदोबस्त पहातो. चांदीच्या नाला लावलेली कोल्हापुरी वहाण हे शिधोजीचं आवडतं पायतण. त्या समोरच्या कचेरीतून चौकात, चौकातून ओसरीवर व ओसरीवरुन या जिन्याने तळघरात, शिधोजीची स्वारी खाडखाड वहाणा वाजवीत रात्रीच्या फिरतीवर मशाल घेऊन निघाली की सारा वाडा भीतीनं थरारल्यागत हादरतो. मशालीच्या लवलवत्या झोतात ओसरीवरचे सारे खांब आणि त्यांच्या सावल्या भीतीनं जणू सैरावैरा पळताना दिसतात..."

मी पुन्हा छद्मीपणानं हसलो. माझ्या शंकेखोरपणाकडे आबानी आता लक्ष द्यायचं सोडून दिलं आणि त्याना माहीत असलेली सारी माहिती ते एकाद्या वाटाड्याच्या निर्विकारपणानं सांगत होते.

"—शिधोजीचे खास शरीरसंरक्षक जे अरब-गारदी, त्यांच्या चौकीची ही जागा. साऱ्या वाड्यावर या गारद्यांचा कडक बंदोबस्त असे. चिटपाखरू त्यांच्या तावडीतून सुटणं मुष्कील. अजूनही एकाद्या रात्री ह्या गारद्यांची टोळी, 'दीन दीन' च्या आरोळ्या देत चौकातून ओसरीवरच्या जिन्याने वर शिधोजीच्या दालनाकडे जाताना ऐकू येते म्हणतात... आबा माझ्याकडे पहात होते. माझ्या कुत्सित मौनाची त्याना चीड आली असावी.

"आता आजकाल तुम्हा सुशिक्षित लोकांचा कशावरच विश्वास नाही ही गोष्ट निराळी. परंतु लोक काय बोलतात ते मी तुम्हाला सांगितलं. अहो काहीतरी प्रचीती आल्याखेरीज लोक तरी उगाच काही कसं सांगतील?– आणि साऱ्याच ऐतिहासिक स्थळाना नाही नाही त्या विचित्र गोष्टी कशा चिकटवतील?"

"त्याचं असं आहे आबा,–" माझं मत आबाना सुनवण्याच्या इराद्यानं मी बोलू लागलो – "इतिहास म्हणजे बोलून चालून वर्तमानाच्या तळघरातलं भुयार. अडगळीची अंधारी जागा. त्या अंधारात ओळखीचा माणूससुद्धा भुतासारखा वाटायचा. अहो भूत झालं तरी मूळ माणूसच ना? माणसाची ओळख आपल्याला पटली नाही की ती पटवून घेण्याऐवजी त्याचं भूत आपण कल्पनेनं उभं करतो. आणि ते खरं समजून त्याला भितो. सारा कल्पनेचा खेळ. नाही नाही त्या कल्पना करणाऱ्या मनाच्या वाईट खोडीमुळं, आपली आपणच भुतं निर्माण करतो. केवळ अज्ञानामुळे. खरं तत्वज्ञानी भुताला घाबरत नाहीत ते यामुळंच. अथेनिओडोरस या नांवाचा एक ग्रीक तत्ववेत्ता तर मुद्दाम भुताटकीच्या घरात राही. आपल्या विषयाचं चिंतन आणि मनन स्वस्थपणानं करता यावं म्हणून. तिथं त्याला कोणीच त्रास द्यायला येत नसे. माणसं नाही आणि भूत तर नाहीच नाही. त्याचं म्हणणं प्रत्येकानं मनानं निर्धास्त असलं पाहिजे. भूतं म्हणजे भीतीची मुलं. भित्यापाठीच ती लागायची. आपण कोणाची धास्ती घेतली की बसलाच तो ब्रम्हसंमंध होऊन आपल्या मानगुटीवर. हालडेन नावाचा शास्त्रज्ञ गेल्या शतकात होऊन गेला. त्याच्या मते तर माणसाचं पोट साफ नसलं की त्याला भूत दिसतं; प्रत्येकानं आपला कोठा नेहमी साफ ठेवला पाहिजे.

इतिहासातसुद्धा भुतं दिसण्याचे वेगवेगळे कालखंड आहेत. उभ्या शिवशाहीत आम्हाला भुतांची भीती शिवली नाही. उलट आमचे थोरले छत्रपती शिवाजीराजे भुतं गाडण्यात पक्के वस्ताद. भुतांच्या साऱ्या खोड्या त्यांना माहीत. अफझलखानाचं भूत उठलं तेव्हा महाराजांनी वळेच भिण्याचं सोंग केलं आणि खानाचं भूत खुळ्यासारखं थेट प्रतापगडापर्यंत त्यांच्या मागं धावत गेलं, राजांच्या मानगुटीवर बसायला. अखेर त्या भूताचाच कोथळा चिरला गेला. आणि त्याचीच मान लटकली प्रतापगडाच्या दरवाजावर. मुसलमान इतिहासकारानी तर शिवशाहीतल्या साऱ्याच मराठ्यांना भुतांची अवलाद ठरवलं. मोंगलांच्या घोड्यानासुद्धा पाण्यात मराठ्यांची भुतं दिसत होती म्हणे.

पुण्यश्लोक शिवाजीराजांना कधी कोणी भूत समजेल का?– परंतु त्यावेळचा राजापूर–मुंबई–सुरत येथील इंग्रजांच्या वखारींचा पत्रव्यवहार वाचा. घाबरलेल्या इंग्रजानी राजांची भुतातच गणना केली होती. शिवाजी नांवाच्या भुतानं त्याना त्यावेळी येवढं पछाडलं होतं की कुठंही खुट्ट वाजलं की आला शिवाजी असं समजून त्यांची दातखिळी बसे. या उलट प्रकार पेशवाईतला. उत्तरपेशवाई म्हणजे भुताटकीची मोठी बाजारपेठ. प्रत्येकाच्या मागं कुठल्या तरी भुतानं लचांड लागलेलं. कोणाला नारायणराव दिसे, तर कोणाला गंगाधर शास्त्री! कोणाला विठोजी होळकर आडवा येई तर कोणाच्या मानगुटीवर सर्जेराव घाटगे स्वार झालेला. शिवशाहीत आमच्या अंगात देव यायचे, पेशवाईत भुते येऊ लागली. शनिवारवाड्यात नारायणराव पेशव्याचे भूत एका आचाऱ्याचे अंगात येई म्हणतात. एकदा त्यानं एक लक्ष ब्राम्हण भोजन घालावयास सांगितले. बाजीरावानं लक्ष भोजन उत्तम प्रकारे घालून वर अर्धा रुपया दक्षणा दिली. असली खादाड भुतं अंगात आल्यावर पंक्तीना काय तोटा? रावबाजीच्या राजवटीत पंक्तीच्या भोजनांचे लिलाव करून मक्ते ठरवीत. गणपती उत्सवातील ब्राम्हण भोजनाचा मक्ता साडेसव्वीस








हजारास दिला. श्रावणातल्या एका उद्यापनाला पंक्तिखर्च दीड लाख झाला. सव्वीस दिवस रोज भोजन. ब्राम्हणांचे आतिथ्य काय सांगावे? सुंदर रांगोळ्या, पाच सात भाज्या, नित्य एक मिष्टान्न, दही, कोशिंबीर, गंधाच्या उटचा, उदवत्त्या, केळीची पाने आणि शेवटी राजवर्खी विडा. दक्षणा भोजनादिक साहित्य धर्मराज गृही-सारखे...! आता तुम्हीच सांगा असली भोजनं नित्य झाल्यावर कोठा साफ रहायचा कसा? भुतं न दिसली तरच नवल.

भूत व्हायला माणूस मरायलाच पाहिजे असंही नाही. अनेक वेळा तर जिवंत माणसंच भुतासारखी वागतात. हा तुमचा शिधोजी थोरातच घ्या. जिवंतपणी भुतापेक्षा याला काय शिंग कमी होती? हा काय माणूस होता?.. हरामखोर, पाजी, कृतघ्न, रानदांडगा. दूध पाजील त्याला चावणारा, छाया देईल त्यावर घाव घाल-णारा. आईबाप, आप्त, सगेसोयरे यांच्या मूळावर आलेला–मित्र-हितचिंतकांचा गळा कापणारा–स्वार्थ साधण्याकरिता काय वाटेल ते करणारा. इंग्रजांसारख्या शत्रूकडून बेशरमपणे लाच घेऊन प्रत्यक्ष छत्रपती व पेशवे यांना दगाबाजीने त्यांच्या स्वाधीन करणारा!!! हा मनुष्य कसला?–तुम्ही भूत म्हणता ते हे. नियतीनं इतिहासाच्या रानात उभं केलेलं एक बुजगावणं! ते भिल्यानाच भिववायचं. "एकादा ब्रम्हसमंध पुरवला पण हा शिधोजी नको..." अशी छत्रपती व पेशवे यानी धास्ती घेतलेली. इंग्रजांना नाही त्याची कधी भीती वाटली! जनरल माल्कमनं कलकत्तेकर इंग्रजाना लिहिलेल्या पत्रात स्पष्ट म्हटलंच आहे–"छत्रपती आणि पेशवे यांच्या उरावर बसलेलं शिधोजी थोराताचं भूत अखेर इंग्रजानीच गाडलं." बरोबरच आहे. शिवशाहीत शिवाजीला घाबरणारे इंग्रज उत्तर-पेशवाईत 'इंग्रजबहादुर' झाले होते. म्हणूनच महाराष्ट्रात गोंधळ घालणाऱ्या, छत्रपती, पेशवे, शिधोजी, शिंदे आदि साऱ्या भुतावळीचा त्यानी कायम बंदोबस्त केला.

सारांश काय, माणसानं निर्धास्त झालं पाहिजे– बहादुर झालं पाहिजे. बहादुराच्या वाटेला कोणीही जात नाही; भूत तर नाहीच. आणि खरं म्हणजे आजच्या शास्त्रीय युगात तर भुतांच्या या बुज-गावण्याला पोरंसोरंही भीत नाहीत. भुतांचा व्यवहार अंधारातला. आजच्या विजेच्या दिव्यानी त्यांचा धंदाच साफ मारला. युरोपात तर, शेकडो वर्षे गाजलेल्या खवीसभुतांची पाल या शतकात साफ उठली म्हणतात. अंधार नाहीसा करा. अंधार नाहीसा झाला– मग तो तळघरातला असो, नाहीतर मनातला असो–की भुतं पळालीच. आता हा थोरातांचा पडका वाडा आहे ना? ह्यात तळघर–भुयारा-पासून तो थेट तिसऱ्या मजल्यापर्यंत-सगळीकडे विजेचे दिवे लावण्याची व्यवस्था करा, आणि पहा या शिधोजी थोराताच्या भुताची गम्मत. ह्या भुताचं हसणं फार प्रख्यात आहे नाही का?–शिधोजीराव आता हसणं विसरा. शंभर कँडल पॉवरच्या प्रकाशाचा पहिला फटका बसू द्या. गेली शंभर वर्षे इथं कायम ठाण देऊन बसलेला हा शिधोजी अक्षरशः धक्के देऊन बाहेर काढावा तसा इथून धूम ठोकतो की नाही ते पहा. अहो तो पुन्हा थोरात हे नाव जन्मात लावणार नाही. विजेचा धक्काच असा जबरदस्त आहे की त्याची ट ट ट ट अशी बोबडी वळून त्याने स्वतःच आपलं नाव पुन्हा 'थोरात ट ट' असं सांगितलं नाही तर नाव बदलून देईन

खरं म्हणजे एवढा उपद्व्याप करण्याचीही जरुरी नाही. तुमच्या ह्या तथाकथित खवीसाला पळवायला माझ्या बॅगमधली तीन सेलची टॉचभर विजेरी पुरे आहे."

☆ ☆

चहा घ्यायला आम्ही बिऱ्हाडाच्या ओसरीकडे परतलो तो संध्याकाळ झाली होती. बहुतेक मंडळी थिएटरवर गेली होती. उर-लेली जाण्याच्या तयारीत होती. ओसरीच्या कोपऱ्याजवळच्या खोलीत कंपनीचा स्वयंपाकी देवराम, रात्रीच्या जेवणाच्या तयारीला लागलेला दिसला. आबानी माझ्याबरोबर थोडा चहा घेतला व मला विश्रांती घेण्यास सांगून तेही थिएटरवर जाण्यास निघाले.

"पाव्हण्यांकडे नीट लक्ष ठेव हं, देवराम–" जाता जाता स्वयंपाकाच्या खोलीत डोकावून देवरामला त्यानी बजावलं; आणि त्यांच्या या आस्थेवाईकपणाचं मला पुन्हा हसू आलं. सिगारेट संपवून मी आबांच्याच पथारीवर आडवा झालो..... माझा केव्हा डोळा लागला हे मला कळलं सुद्धा नाही.

नक्की किती वेळानं जागा झालो हे सांगता येत नाही. परंतु जागा होऊन पहातो तो सर्वत्र सामसूम झालेली. अरेच्चा!!!–स्वयं-पाकाच्या खोलीतही काही चहाळ ऐकू येईना. ओसरीवर तुळईला टांगलेला दिवा वाऱ्यानं झुलत होता आणि ओसरीवरच्या डेरेदार खांबांच्या भिंतीवर पडणाऱ्या पाचपन्नास लहानमोठ्या सावल्या आपआपसात एकादा खेळ खेळल्यागत मागंपुढं धावत होत्या. कधी जागच्या जागी हिंदकळत होत्या, तर कधी ओसरीभर हुंदडत होत्या. आणि काही धिटुकल्या तर बेधडक माझ्या अंगावरून चौका-मध्ये धावत जात होत्या. या वाड्यात रात्री सावल्यांची एवढी गर्दी जमत असेल याची मला कल्पना नव्हती...




अनुक्रमणिका





# असेन मी नसेन मी

असेन मी नसेन मी तरी असेल गीत हे
फुलाफुलात येथल्या उद्या हसेल गीत हे !
हवेत ऊब भोवती सुवास धुंद दाटले
तसेच काहिसे मनी तुला बघून वाटले
तृणात फूलपाखरू तसे बसेल गीत हे
फुलाफुलात येथल्या उद्या हसेल गीत हे !
स्वये मनात जागते न सूर ताल मागते
अबोल राहुनी स्वतः अबोध सर्व सांगते
उन्हे जळात हालती तिथे वसेल गीत हे
फुलाफुलात येथल्या उद्या हसेल गीत हे !
कुणास काय ठाउके कसे कुठे उद्या असू?
निळ्या नभात रेखिली नकोस भावना पुसू !
तुझ्या मनीच राहिले तुला दिसेल गीत हे
फुलाफुलात येथल्या उद्या हसेल गीत हे !

— शान्ता ज. शेळके

. येवढ्यात एक कबूतर जोरानं पंख फडफडीत एका ओसरीवरून दुसऱ्या ओसरीवर गेलं–व त्याच्या अवचित फडफडाटानं मी चांगलाच दचकलो. . खरं म्हणजे थोडासा भ्यायलोही–– आणि वाटलं देवरामला हाक मारावी– "देवराम. . देवराम. . . ."

काही उत्तर नाही. पुन्हा मोठ्यानं हाक मारली–"देवराऽऽऽम!"

तरीही जबाब नाही. माझ्या हाकेचे पडसाद मात्र चौका-भोवतालच्या खोल्यातून घुमून, माझीच हाक मला पुन्हा उलट ऐकू आली. जरा वेगळ्या सुरात. जणू माझ्या हाकेचीच कोणतरी नक्कल करीत आहे आणि ओरडत आहे– 'देवराऽऽऽऽम."

हाकेच्या या विचित्र पडसादानं मी थोडासा बेचैनच झालो. स्वयंपाकाच्या खोलीकडं नीट निरखून पाहिलं. परंतु देवराम कुठं होता? खोलीचं दार बंद आणि बाहेरून कडी लावलेली. मनातल्या मनात थोड्याशा रागानंच म्हटलं– "आवानी येवढं बजावूनसुद्धा हा गुलाम थिएटरवर निघून गेलेला दिसतो."

. पुन्हा मघाचं कबूतर तसच फडफडत आपल्या जागी परत फिरलं आणि त्याच्या फडफडाटानं मी पुन्हा तेवढाच दचकलो. यावेळी त्या कबूतरानं ओसरीवरच्या लटकत्या दिव्याला आपल्या फडफडाटानं असा झोका दिला की दिव्याच्या हेलकाव्यानं खांबांच्या साऱ्या सावल्या अक्षरशः ओसरीभोवती गरगरा फिरायला लागल्या. –मी मागे वळून पाहिलं तर एक भली मोठी सावली माझ्याच मागं भिंतीवर एकाद्या मोठ्या काळ्या नागाप्रमाणं डोलताना दिसली.

. अरे बापरे! ! !– खरं म्हणजे ती माझीच सावली होती– तिला भिण्याचं काही कारण नव्हतं पण ही साधी गोष्ट ध्यानात येऊ नये अशीच, मनाची काहीतरी गोंधळलेली स्थिती झाली होती.

–येवढं खरं की अंगाला घाम सुटला, हातपाय कापू लागले, घसा कोरडा पडला. बोलण्याचा प्रयत्न करूनसुद्धा शब्द फुटेना. सिगारेट ओढावी म्हटलं तर उठून खुंटीवरच्या कोटातून सिगारेटची पेटी काढण्याचाही धीर होईना. किती वाजले म्हणून हातावरच्या घड्याळात पहाण्याचा प्रयत्न केला तर घड्याळातले आकडे नीट दिसेनात. माझी मान व दृष्टी दोन्हीही थिजल्यासारख्या घट्ट झाल्या होत्या. मी तसाच निश्चेष्ट बसलो, मान खाली वाकवून दृष्टी बैठकीच्या सतरंजीवर खिळलेली असाच एकाद्या पुतळ्यासारखा मी किती वेळ बसलो होतो कोण जाणे– आणि, आणि, एकदम मला कोणाचं तरी किंचाळणं ऐकू आलं! – वाटलं आपल्याला भास झाला असेल; पण पुन्हा तीच किंचाळी.

"आवा मघाशी सांगत होते ते खरं तर! !"–मला आठवण झाली.

" शिधोजीच्या त्या विचित्र खेळातल्या स्त्रियांचं हे किंचाळणं तर नव्हे ? " विचाराला आतां वावच नव्हता. घाबरलेलं मन आतल्या आत कुठं तरी दडायचा प्रयत्न करीत होतं.

–येवढ्यात ओसरीवरच्या मजल्यावरून कोणीतरी दड दड दड दड, धावत गेल्यासारखं वाटलं आणि "दीन दीन" च्या आरोळ्या ऐकू आल्या. . ह्या घुशी असणार "– मी माझं समाधान करू लागलो– "जुन्या पडक्या वाड्यातून घुशी असायच्याच. त्यात भिण्यासारखं काय आहे ? " –पण शंकेखोर मन गप्प बसेना, "–घुशी एकवेळ दड दड धावत असतील, परंतु त्या दीन दीन कसं ओरडतील? या वाड्यात काय बोलणाऱ्या घुशी आहेत आणि त्याही मुसलमान जातीच्या? ?–छे छे ह्या घुशी नव्हत. हे शिधोजीच्या त्या अरब गारद्यांचं पथक बरं का! – आवा सांगत होते, चौकातून ओसरीवर, ओसरीवरून जिन्याने वर शिधोजीच्या खोलीकडे ते दड दड दड दड धावत जातात, दीन दीन च्या आरोळ्या ठोकीत. " गाडदी! !–नारायणराव पेशव्याचा या गारद्यानीच निकाल लावला होता हा विचार मनात आला आणि माझे हातपाय चांगलेच लटलटायला लागले. अंगात हीव भरल्यागत मी कापू लागलो.

–आणि मला भरलेलं हे कापरं पाहून, कोपऱ्यातून आता कोणीतरी खदखदून हसत आहे असाही भास झाला. भास कसला? –प्रत्यक्ष हसणंच मी ऐकत होतो.

"हा हा हा हा हा. . हा हा हा हा हा. . हा हा हा हा हा ! ! !"

बापरे हा शिधोजी थोरात की काय ?–नक्कीच ! तोच तो

अनुक्रमणिका






ढाण्या आवाज, ते खदखदून हसणं— अघळपघळ आणि तीन मजली. त्या हसण्यानं सारा वाडा हादरून सावध झाला. वारा थांबला . . . सावल्यासुद्धा चुप्प उभ्या राहिल्या जागच्या जागी.— आणि पावसाळी आभाळानं गर्जून विचारावं त्याप्रमाणं कोणीतरी बोललं आणि हासलं . .

" . . . .काय पाव्हणे! हा हा हा हा . . .!! "

—नक्कीच शिधोजी थोरात हा. माझी नजर जमिनीवर अधि-कच खिळली. वर मान करून पहाण्याचं धैर्यच आता शिल्लक नव्हतं. शब्दवेध घ्यावा त्याप्रमाणं मी फक्त कानानी पहात होतो बाकी सारी इंद्रियं गार, थिजल्यागत घट्ट झाली होती.

" हा हा हा हा हा . . .हा हा हा! —काय, पुण्याच्या दरबारातनं आला होय तुम्ही?— हा हा हा हा . . . मघा फार लंब्या गप्पा मारीत होता . . त्यावरनं ओळखलं आम्ही . . हा हा हा हा . . .पुणेकरांच्या जिभेला अजून हाड आलेलं दिसत नाही! ! ! . . काय?— काय हालहवाल आहे पुण्याची? हा हा हा हा . . ."

त्या विचित्र हसण्याच्या सरीवर सरी कोसळत होत्या— आणि भीतीनं माझ्या तोंडातून शब्द फुटत नव्हता . . .

" अहो बोला की पाव्हणे! — मघा तर भलती सैल सुटली होती तुमची जीभ . . मग आताच काय दातखिळी बसली?—हा हा हा हा . . काय म्हणतात पुण्याचे आमचे बाजीराव साहेब?"

काहीतरी जबाब देणं भागच होतं. खाली मान ठेवूनच मी कसातरी बोलण्याचा प्रयत्न केला.

" बा . . बा . . बाऽबा शिधोजी . . .न.न.न . . .नव्हे . . . नव्हे . . शिधोजीराव . . . .अहो . . .अहो तुम्ही अजून भूतकाळातच वावरता की? —अहो बाजीरावाची पेशवाई जाऊन आता शंभराच्या—वर वर्षं झाली . . . तुम्ही . . . तुम्हीच नाही का बाजीरावाला इंग्र-जांच्या स्वाधीन केलं?—विसरला वाटतं? . . .नाही म्हणजे एकापरी ते तुम्ही बरंच केलं, अहो स्वराज्य गेलं पण सुराज्य आलं . . .! त्या स्वराजातल्या सुरस कथा आम्ही वाचतोच की पुण्याच्या पेशवे दप्तरात! ! !"

" बरं केलं आँ?—" शिधोजी ओरडला, " आणि तरीही हा शिधोजी म्हणजे हरामखोर, पाजी, कृतघ्न रानदांडगा— नाही का?— ब्रम्हसमंधापेक्षाही भयंकर! — एकादा ब्रम्हसमंध पुरवला पण हा शिधोजी नको काय . . .?"

" नाही, नाही, नाही, शिधोजीराव, हे माझं मत नव्हे! " मी अजीजीनं समजावू लागलो, " मी जे सांगितलं ते त्या परशुरामभाऊ पटवर्धनाचं, छत्रपतींचं आणि पेशव्यांचं मत . . .! अहो खाजगी पत्रातून काय वाटेल ते लिहून ठेवलं आहे त्यांनी तुमच्याबद्दल."

—थोडा वेळ स्तब्धता. माझ्या उत्तरानं शिधोजीचं समाधान झाल्यासारखं दिसलं.

" . . .आणि काय हो पाव्हणे ? हा हा हा हा हा . . . तुम्हाला म्हणे आमचं हे घरंदाज गायकीचं हसणं ऐकायचं आहे नाही का? —हा हा हा हा . . . —आणि काय हो!— आम्हाला नाटकाचा कायम पास दिला आहे काय आबानी?"

" नाही म्हणजे . . . त्याचं असं झालं शिधोजीराव . . . बाजीरावसाहेबाना नाटकशाळेचा षौक होता ना ? — तसाच तुम्हाला नाटकाचा षौक असेल असं आपलं वाटलं आम्हाला आणि आमच्या या जमान्यात पास वगैरे दिलं म्हणजे सरकारी भुतं कंपनीला त्रास देत नाहीत . . .म्हणून थोडं जरा गमतीनं म्हटलं येवढंच. तुमची थट्टा करावी असा बिलकुल हेतू नव्हता. . . . आणि खरं म्हणजे तुम्ही कोणाची थट्टा करीत नाही आणि कोणी तुमची थट्टा केली तर तुम्हाला खपत नाही हे हे हे, आबानी आम्हाला मागाहून सांगितलं . . .!

" अरे कोण म्हणतो आम्ही थट्टा करीत नाही आणि आम्हाला थट्टा समजत नाही?" — शिधोजी जोरानं उसळून गरजला — " अहो त्या पटवर्धनाची, पेशव्याची आणि छत्रपतींची आम्ही जन्मभर थट्टाच केली की . . . हा हा हा हा हा . . . बिनडोक लेकाचे! इंग्रजांचा स्वभाव थट्टेखोर—बरकड साहुकारासारखा मुनकी नव्हे हे ओळखलं फक्त आम्ही आणि थोरल्या छत्रपतींनी . . म्हणूनच आमचा त्यांच्यासमोर निभाव लागला. हा हा हा हा हा हा . . . ! ! ! —आणि काय हो, आम्ही हे जे खदखदून हसतो ते काय थट्टा समजल्या-शिवाय होय? — खुळ्यासारखं? — अलबत् आम्ही थट्टा करतो आणि

समजतो – पण तुमचं बोलणं ही काय थट्टा होती? . . . म्हणे या वाड्यात सगळीकडे विजेचे दिवे लावा आणि पहा ह्या शिधोजी थोराताच्या भुताची गम्मत . . . धक्के देऊन बाहेर काढावा तसा मी धूम ठोकीन काय ? . . . . हा हा हा हा ! – अरे लावा–वाटेल तेवढे दिवे लावा. तुपाचे लावा, तेलाचे लावा, नाहीतर विजेचे लावा! हा शिधोजी इथंच गाडून उभा रहाणार . . . म्हणे धूम ठोकतो! मला पळवायला म्हणे टीचभर विजेरी पुरे आहे . . . कुठं आहे तुमची विजेरी? – पाव्हणे, काढा–काढा आणि चालवा आमच्यावर. हा पहा तुमच्यासमोर मी येऊन उभा रहातो . . . "

आणि खरंच वाड्याच्या मोठ्या दरवाजाची दिंडी उघडल्याचा आवाज आला. मी भीतीनं थिजल्यासारखा खाली मान घालून बसलो. होतो; कानी पडेल ते ऐकत होतो– दिंडीतून कोणीतरी आत आलं. खाडखाड वहाणा वाजवीत चौकाच्या दिशेनं येऊ लागलं . . आणि एकदम थबकलं. पुन्हा एकएक पाऊल टाकीत हळूहळू ओसरीकडे माझ्या रोखानं येऊ लागलं– वर मान करून बघायचं माझ्यात धैर्य नव्हतं आणि शक्तीही नव्हती . . म्हटल्याप्रमाणं हा शिधोजी थोरात माझ्यासमोर येऊन उभा रहाणार व विजेरीचा झोत मी त्याच्यावर टाकला नाही तर माझ्याच मानगुटीवर बसणार . . . . . ! ! !

माझ्या घशाला ठणाणा कोरड पडली. मोठ्यानं ओरडण्याचा प्रयत्न केला पण नीट शब्दच बाहेर येईनात. पावलं जसजशी माझ्या जवळ येऊ लागली तसतशी माझी अधिकच पाचावर धारण बसू लागली . . . . मी जसं जमेल तसं बोलायचा प्रयत्न करू लागलो . . . परंतु जीभच वळेना . . .

"ना ना . . ना . . ना . . नाही शिधोजीराव ठो . . . ठो . . . ठो . . ठो . . ठोराट; – अरे बापरे ! ! . . . नाही नाही नाही . . था . . थो . . थो . . थो थोराट . . . थोराट "

या अक्षम्य अपराधाबद्दल शिधोजी माझी गर्दन उडवणार याबद्दल खात्री झाली . . . अक्षरशः माझी मान अगतिकपणे समोर वाकवून शिधोजीच्या तरवारीच्या वारानं आपलं शीर धडावेगळं केव्हा होतं याची वाट पहात मी जमिनीवर सताड निपचित उपडा पडलो . . . ! !

माझ्या रोखानं येणारी व्यक्ती माझ्याजवळ येऊन थांबली– आणि उलट तिनंसुद्धां माझ्यासमोर लोटांगण घातलं. ती व्यक्ती म्हणत होती–

"नाही साहेब मला असं लाजवू नका. मीच तुमची माफी मागायला पाहिजे. "

–हा कोणाचा आवाज? . . मी आश्चर्यानं मान उचलून वर पाहिलं; – कंपनीचा स्वयंपाकी देवराम–लोटांगण घालून मला नाना परीनं विनवत होता . . . .

" . . . चूक माझी झाली साहेब, मला क्षमा करा. मी इथं तुम्हाला एकटं टाकून जायला नको होतं. तुम्ही मघाशी इथं झोपला होता आणि मला एकट्याला भीती वाटायला लागली– म्हणून स्वयंपाक आटोपताच मी थिएटरवर गुपचुप निघून गेलो. मला थेटरवर आलेलं पहाताच आवा चांगलेच रागावले– त्यानी तसंच मला परत वाड्यात पाठवलं तुमच्या सोबतीला. . . . . मी येवढा ओशाळलो की, परत येऊन मी तुमची क्षमा मागणार होतो; तर तुम्हीच थट्टेनं मला लोटांगण घालून लाजवलंत . . . . नाही साहेब अपराध माझा आहे. तुम्हाला एकटं इथं सोडून मी जायला नको होतं. मला माफ करा– मी तुमच्या पाया पडतो . . . . " आणि देवरामनं माझे पाय धरले.

क्षणभर मी गोंधळलोच. उठून बसलो आणि तावडतोब स्वतःला सावरून माझे पाय धरणाऱ्या देवरामला उठवीत मी म्हणालो

"अरे त्यात अपराध कसला देवराम? – आणि माफी ती काय मागायची ? . . ऊठ उठून बैस "

कोटाच्या खिशातून पाकीट काढून सिगारेट पेटवली व बॅगमधून माझी विजेरी काढली. तिच्या प्रकाशाचे झोत, चौकातून, ओसरीवरून–वाड्याच्या कोपऱ्याकोपऱ्यातून सकळीकडं मोठ्या दिमाखानं टाकीत मी म्हटलं,

"अरे, इथं एकटा राहिलो म्हणून काय झालं? – या वाड्यात कसली आली आहे भीती ? तुम्ही लोक उगाच खुळचासारखे काहीतरी कल्पना करता– आणि भीत बसता . . घाबरट कुठचे ! "

–आणि मी बळेच मोठ्यानं हसलो.

–माझ्या पाठोपाठ कोणीतरी मोठ्यानंच हसलं. माझ्या हसण्याचा तो पडसाद नक्की नव्हता.

—वाड्याच्या कुठल्या तरी कोपऱ्यात उभा राहून शिधोजी थोरात माझ्या ढोंगीपणाला खदखदून हसत होता; अघळपघळ आणि तीन मजली.

●●●











# थोटूक



....माणसांची गर्दी विरळ झाल्यावर एकमेकाना घट्ट मारलेल्या मिठ्या.... लग्न हवंच कशाला ?.... वुई कॅन बी फ्रेण्ड्स—गुड फ्रेण्ड्स....

मध्यरात्रीच्या त्या स्तब्ध प्रहरी भय्या 'मॅटर्निटी होम'च्या लांबलचक व्हरांड्यातील वाकावर शांत वसला होता आणि एकामागून एक सिग्रेटी जाळीत होता. पाकिटातली शेवटची सिग्रेट संपताच तो उठला नि थोटूक टाकण्यासाठी पायरीपाशी आला. त्याला हॉस्पिटलच्या लोकांचा संताप आला. साल्याना एक ॲश-ट्रे ठेवता येईना या वाकड्यापाशी. . रात्री वेरात्री वायकोला डिलिव्हरीसाठी घेऊन येणाऱ्याचे किती हाल होतात, याची काय कल्पना तुम्हाला. वायकोला तुमच्या हवाली करायचं नि वसायचं विड्या फुंकीत रात्रभर.... मिनिटामिनिटाला उठून थोटूक टाकण्यासाठी वाहेर जायचं म्हणजे काय चेष्टा आहे! सालं सारं भयाण वाटतंय् इथं. भय्याने पुन्हा वाकावर येऊन वसताना समोर पाहिले. रस्ता निर्जन होता. क्वचित् एखादी गाडी भिंतीवरच्या पालीसारखी सरसर जायची. पायरीजवळचे थोटूक अद्याप जीव धरून होतं. लाल ठिणगी लुकलुकत होती. बाकी सारं शांत भयाण. भय्याला मीनाचापण संताप आला. तिलासुद्धा रात्रीचीच वेळ सापडली वाळंत व्हायला. दिवसभर काय करत होती कुणास ठाऊक... सकाळपासून काळोख पडेपर्यंत वाहेर हमाली करून घरात पाऊल टाकावं तर ही तळमळत पडलेली...मला हॉस्पिटलात पोचवा... मी मरत्ये.. अरे, पण मग आधी कां नाही हे सांगितलं ? आपण नसतो गेलो कामावर..नाहीतरी त्या गचाळ कचेरीत असतं काय? चार पोरी धड पहाण्यासारख्या नाहीत, की एका मूर्खाला पोएट्री, आर्ट, लिटरेचर यामध्ये इंटरेस्ट नाही. एकजात सारे ठोकळे. काही नाही. येत्या महिन्याला ही पण नोकरी सोडून दिली पाहिजे. आजवर किती झाल्या ? दहावारा की पंधरा?





अनुक्रमणिका

वापजाद्यांनी पाहिली नसतील. सदघाचा कन्सेप्टच निराळा. बाईचे चित्र काढावे ते सदघानेच. चार टळक रंग कॅनव्हासवर खुपसलेला तीक्ष्ण चाकू. . लाल जास्वंद. एखाद्या जखमेसारखी. . आणि दोन मोठे स्तन, वस्स. . एखाद्या अस्सल कवितेसारखे सदघा चित्र काढतो. आपण त्याच्यावर खूप. साले हे ट्रॅडिशनवाले त्याला वेडा म्हणतात. मलाही हे कवडे वेडा म्हणतात. अरे वेडाच खरा प्रतिभावंत असतो. . . . मनमोहनला पूर्वी असंच म्हटलंत. आता संध्येतल्यासारखं त्याचं नांव आधी घेता. . ढोंगी वेटे – आम्ही




सिनिक् असू, आऊटसायडर असू पण ढोंगी नाही. .

मीना कण्हते का ? कुणाचा हा क्षीण आवाज ? सालं कुठल्याही हॉस्पिटलात पाऊल टाकल्यावर पहिल्यांदा वाटतं सगळी माणसं मरताहेत. . . कण्हणं, आक्रोश, हुंदके. . हंवरडे. . सगळं सारखंच वाटतं पण हे हॉस्पिटल मरणाऱ्याचं नाही आहे. हे जन्माला येणाऱ्यांचे हॉस्पिटल– मीना मरणार नाही. . . ती जगणार आहे. . कुणाला तरी जगवणार आहे. . जगण्यासाठी जगात आणणार आहे. . साली एवढीशी मीना. . पण देवानं काय ताकद दिली आहे तिला. एका संपूर्ण लाईफ्‌ला जन्म. अस्तित्व निर्माण करणं. . . अस्तित्ववाद. . शेवटी कामू. . काफ्का. . सार्त्र हे आपापल्यापरीनी खरेच. काफ्काचं मॅटॅमारफासीस. . . साली एका जीवाची केवढी धडपड. तो जीव स्वतःला विसरून दुसऱ्याच जीवात रममाण होतो. अस्तित्ववादाचा हा कुठला प्रकार ? पण कुठे तरी कुणीतरी अस्तित्वात असणं आणि त्या अस्तित्वाची प्रबळ जाणीव असणं, हेच महत्त्वाचं. . म्हणून मीना मोठी. एकोणीस वर्षांची लहानखुरी, चिमणीसारखी मीना आज आभाळाला पोचणार. शी वुईल गिव्ह वर्थ टु ए न्यू एक्झीस्टन्स. . . एक्झीस्टन्स ऑफ ॲन एक्झीस्टन्स. . ग्रेट. . . मीना, यू आर इंडीड ग्रेट–

कोण कण्हतं हे? मीना तर नव्हे. . . मीना तिन्हीसांजेला आपण घरात पाऊल टाकलं तेव्हा काय विव्हळत होती. चेहरा पांढरा फटक. केस विस्कटलेले. वस्त्राची शुद्ध नसलेली. मीनाचे ते रूपही आकर्षक वाटलं. वाळंतपणाला टेकलेली वायको एवढी सुंदर दिसते असे वाटले नव्हते. मर्ढेकर उगाच म्हणून नाही गेला–थांव उद्याचे माऊली, तीर्थ पायाचे घेई तो. . . मातृत्व म्हणजे सौंदर्य. मीनाच्या फिक्या ओठांवर त्या कातरवेळेला आपण ओठ टेकले तेव्हा वाटलं, आय ॲम किसींग अ चाइल्ड. . मीना म्हणत होती. . 'देवासमोरील हळदीकुंकवाचा करंडा आणा नि मला कुंकू लावा. टॅक्सीत बसेपर्यंत ती देवाच्या तसविरीना हात जोडीत होती. कुंकू चाचपीत होती. हीच मीना नऊ महिन्यापूर्वी रानात जगणाऱ्या आदिमानवाच्या मादीसारखी वागायची. कुंकू? हॅट. . . देवाची तसवीर? हुडूत्. . सिंपली फ्लश ॲंड ब्लड. मी श्वापद मारून आणावे, हिने गुहेच्या तोंडाशी जिभल्या चाटीत माझी वाट पहावी. शेकोटीच्या केशरी प्रकाशात एक नर आणि एक मादी यांचा एकान्त. वस्स. . एवढंच जाणणारी मीना हां हां म्हणता केवढी वदलली. . .आपण तिच्या पोटात वाढू लागताच तिने सारी विटनीकगिरी सोडून दिली. शनिवारी चक्क मारुतीच्या देवळात रांगेत उभी. . . हातात रुईच्या माळा. . पोटात वाढणाऱ्या एका जीवासाठी मीनाचे सगळे लाईफच वदलले. वदलू दे. आपला त्याला विरोध नाही. आपण काही वदलणार नाही. आपण फक्त मानवाचा जन्म या दृष्टीने तिकडे पाहू. . . भावनाप्रधान होणे नाही. . नो सेंटिमेंटल थिंकिंग. . मी पुरुष आहे. जन्म देऊ शकणारा पुरुष. नव्या पिढीतला पुरुष. कवितेत नवा आशय, चित्रात नवी नजर. जीवनावद्दलचा एकूण दृष्टिकोनच नवा. . सर्वांना धक्का देणारा. . स्त्रीला प्रथम मादी मानणारा. . . सर्वत्र कशाचे तरी अस्तित्व जाणवणारा–अस्सल अस्तित्वाची दखल घेणारा अभिजात मानव. पूर्ण मानव. ढोंगापासून संपूर्ण अलिप्त––

मीना तिकडे प्राणांतिक वेदनानी तडफडतेय. आणि आपल्या मनात त्या परवा पाहिलेल्या बॅंकेतल्या रिसेप्शनीस्टचे विचार कां येताहेत? सालीची फिगर फर्स्ट-क्लास आहे. पण डोळ्यातले कारुण्य लपत नाही. आणि सारखी हसत राहते. आय् वेट. . . ज्या वायका उठसूठ भरमसाट हसत राहतात, त्यांच्या जीवनात कुठेतरी भयानक पोकळी असते. फरस्ट्रेशनदेखील असते. . त्या वायका हसत असल्या म्हणजे पाहणाऱ्याला जर जाणण्याची ताकद

असेल तर त्या हसण्यातील भयाण पोकळी लख्ख दिसेल. त्या रिसेप्शनीस्टचे हसणे तसेच वाटायचे. पण तरीही आपण वाव-चळलो होतो. तिला चक्क म्हणालो—केवळ तू इथं आहेस म्हणून मी माझी पूर्वीची नोकरी सोडून इथं खर्डेघाशी करायला तयार आहे.. आणि आपण राजीनामा देऊन तिथं गेलो होतोसुद्धा अर्ज घेऊन! त्यादिवशी ती काऊंटरवरून गायब. तिची शेजारीण म्हणाली: "शी हॅज लेफ्ट धिस जॉब.. फरॉम टुडे.. दुसरीकडे मोठ्या पगारावर गेली ती.. साला आपण मामा ठरत होतो. खोखोचा खेळ झाला. झक्कत परत आलो नि राजीनामा मागे घेतला.. पण त्या पोरीची फिगर अद्याप आठवतेय.. ती ज्या कोणाशी लग्न करील त्याने तिला आपण मीनाला उपभोगली तशी उपभोगली पाहिजे.. डूइंग फुल जस्टिस.. नाहीतर असायचा एकादा तुपातला पावटा बुळबुळीत... जाऊ दे. पण तिच्या डोळ्यातलं ते कारुण्य.. सदयानं पाहिलं असतं तर चार रेषात नि चार ब्रशच्या फटकाऱ्यात जिवंत पकडलीन असती.. आपल्याला काही कविता नाही सुचली. न सुचता कविता लिहायची म्हणजे नथिंग बट् मास्टरबेशन.. अलिकडे बहुतेक जण तेच करतात म्हणा.. तरीही ते युग-प्रवर्तक ! साले चक्क भावगीते नि लावण्या लिहितात. रेडिओवर म्हणे एकदा वांगडी वाजली म्हणजे आठ आणे मिळतात.. रॉयल्टी... सगळे पैशाचे दास.. आणि वर गोष्टी.. प्रामाणिक काव्याची भूमिका! कविता कशी भोगावी ? लेको; तुमच्यात ती ताकद आहे कुठे? तुम्ही सगळे नवलाईने पछाडलेले...

किती वाजले ? आयला, काय अपरात्र आहे. सिग्रेटचं पाकीटसुद्धा कुठं मिळायचं नाही. कोण ? नर्स वाटतं...

"एक्स्क्यूज मी ! मिसेस् घाणेकरांची डिलीव्हरी झाली का? " भय्याने विचारले.

चट्चट् पाय वाजवीत जाणारी ती नर्स भय्याकडे पाहून किंचित् हसली.. खाऊ-साठी थांबलेल्या मुलाकडे एखाद्या मावशीने पाहून हसावे तशी.. नि जाता जाता पुटपुटली.

"थांबा हं थोडं... आता कळेलच रिझल्ट तुमचा थोड्या वेळात—"

"आयला वैताग ! म्हणे थांबा थोडा वेळ. अहो, इथं मी रात्री आठ वाजल्यापासून ताटकळत बसलोय. आहे ठाऊक...भय्या उठला नि थेट हॉस्पिटलच्या मुख्य गेट-पाशी गेला. तिथे गुरखा स्टुलावर बसला होता.

"गुरखा! तुम्हारे पास सिग्रेट है ?"

"नही जी—"

"कहा मिलेगा ? "

"इस्टेशनपे जायेगा तो शायद मिल सकेगा. वहांपे दुकान रातभर खुल्ला रहता है ?

भय्या त्या फाटकात किंचित् रेंगाळला. काय करावे? जावं कडमडत स्टेशनपर्यंत! सिग्रेट तर हवीच.... जबरदस्त तलफ आलीय.. पण तेवढ्यातच इकडे मीनाची सुटका झाली म्हणज ? मीनाची आठवण येताच भय्या सिग्रेट विसरला. ओढ लागल्या-सारखा पुन्हा व्हरांड्यात आला. पिवळ्या पांढऱ्या भिंतीचा तो मेलेल्या सापा-सारखा पसरलेला लांब व्हरांडा आणि त्यात भय्याची लांबलचक सावली. बाकी सारी शांतता. पहाट होत आली होती. भय्या पुन्हा बाकड्यावर निजून राहिला. आता मीनाची सुटका झालीच पाहिजे. किती हाल काढावेत माणसानं ? तरी बरं, गेल्याच आठवड्यात आपण ते पुस्तक आणून दिलं होतं मीनाला. बर्थ ऑफ अे बेबी. बाळाचा जन्म कसा होतो त्याची सारी तपशीलवार माहिती त्या पुस्तकात दिली होती. मीनापेक्षा आपणच अधिक इंटरेस्ट घेऊन वाचलं ते पुस्तक. पण त्यामुळे मीनाची भीती खूपच कमी झाली. पूर्वीसुद्धा ती अशीच भ्याली होती. मढ्या त्या झोपडीत. जाम घाबरली होती. साधं शरीरशास्त्र माहीत नसतं या एवढ्या वाढलेल्या पोरींना.. तीच नेमकी भीती याही खेपेला तिला वाटत होती. म्हणे एवढं मोठं मूल..सात आठ पौंडाचं.

एवढं मोठं त्याचं डोकं. ते हात. . ते पाय. . मरूनच जाऊ आपण! मग मीनाची समजूत घालता घालता झालेली आपली पुरेवाट.

भय्याला त्याच पुस्तकातला मजकूर आठवला. मीनाची डिलीव्हरी नीट होईल ना? ती अडणार तर नाही? मुलाची पोझीशन तर ठीक असेल ना? नाहीतर ऑपरेशन. भय्याचे काळीज धडधडू लागले. त्याने पुन्हा घड्याळात पाहिले. म्हणजे सहा सात तास झाले की आता. . नॉर्मल स्थितीनं एवढ्यात डिलीव्हरी व्हायला पाहिजे. . मीनाला भूल दिली असेल का? काय काय हाल केले असतील साल्यानी कुणास ठाऊक. . भय्याला चीड आली. त्या हॉस्पिटलमधील डॉक्टरांची, नर्सेसची साऱ्यांचीच एक विलक्षण चीड त्याला आली. एकजण धड उत्तर देत नाही. . खरंच हाल केले असतील माझ्या चिमुकल्या बायकोचे. भय्या मनाने ते सारे हाल अनुभवू लागला. मीनाचे बाळंतपण स्वतःच सोसू लागला. . काय काय केलं असेल त्यांनी तिचं. . . . आत नेल्या नेल्या ऑपरेशन थिएटर? छेः छेः ते नंतर. . प्रथम वेणा येतील. त्या मीना घरी होती तेव्हाच येत होत्या. मीना जवळजवळ बेशुद्धच पडायला आली होती. त्यांनी तिला विवस्त्र केलं असेल. . दे वुड् हॅव टच्ड एव्हरी पार्ट ऑफ हर बॉडी. जिथे फक्त तिच्या नवऱ्याचाच स्पर्श झालेला त्या जागीही डॉक्टरांचे हात लागले असतील. . काय वाटत असेल अशा वेळी डॉक्टरांना! समजा आपण डॉक्टर असतो तर नर म्हणूनच पाहिले असते सारे. छेः छेः ड्यूटी फर्स्ट. . . ती वेळ पवित्र असते. जन्म देणारी वेळ. त्या वेळी सारे काही पुण्यमय असते. डॉक्टरचा स्पर्श साऱ्याच्या पलीकडे जात असतो. तो देवाचा स्पर्श. नर. . . पुरुष. . सारे विरघळलेले. जागे असते देवपण. . माणूसपण. . त्यात पापाचा अंशही येत नाही. आपण डॉक्टर असतो नि तसा गढूळ रंग आपल्या नजरेत येता तर पॉयझन घेतले असते आपण. जन्म पवित्र. जन्म देणारी पवित्र. देवासारखी. . .

पण मग ती अमेरिकन कादंबरी? त्या कादंबरीत लेखकाने लिहिलेला तो प्रसंग. एक अत्यंत सुंदर तरुणी बाळंत होण्यासाठी त्या डॉक्टरच्या इस्पितळात येते नि तिच्या लावण्याने वेडा होऊन तो डॉक्टर सरळ तिच्यावर बलात्कार करतो. . .अमानुष ब्रूटल. . साल्याना गोळ्या घातल्या पाहिजेत. भय्याला एकाएकी मीनाला वेड लागलेल्या डॉक्टरने पकडल्याचा भास झाला. नि तो विलक्षण अस्वस्थ झाला. भूल दिलेली असल्यावर तिला काय कळणार? दीज बास्टर्डस् कुड डू एनीथिंग. दे कुड रेप माय वाईफ्. भय्याला वाटले, धावत धावत आत शिरावे. . रक्ताच्या थारोळ्यात पडलेल्या मीनाला हातावर उचलून घेऊन पळत सुटावे. . थेट घर गाठावे. पूर्वीच्या काळी आदिमानव आपल्या मादीचे बाळंतपण पण आपण स्वतःच करायचा. शेकोटीच्या लाल केशरी प्रकाशात तो आपण अनेकदा स्पर्शिलेले तिचे अवयव थंड चित्ताने निर्विकारपणे हाताळायचा. स्वतः निर्माण केलेला मानवी अंश जन्मताना केवळ स्वतःच पहायचा. परका कुणी तेथे नाही. परक्याचा स्पर्श नाही. . परक्याची चाहूल नाही. स्वतःच माणसातून देव बनायचे आणि देवाला जन्म द्यायचा. . वास्तविक आताही तसेच असायला हवे. प्रत्येक नवऱ्याने आपल्या बायकोचे बाळंतपण स्वतः करावयाचे. जन्माची ही प्रक्रिया त्या दोघांपुरतीच खासगी आणि व्यक्तिगत असायला हवी. त्यासाठी मोठाले बोर्ड लावलेली इस्पितळे कशाला हवीत? मग टॅक्सी थांबवा. डॉक्टरना बोलवा. . . . नर्सला विचारा. आणि त्या साऱ्यानी मिळून सार्वजनिकरीत्या तो अत्यंत पवित्र, अत्यंत मंगल क्षण पहावयाचा. जन्माचे प्रदर्शन करायचे आणि दूर ठेवायचा तो जन्मदात्याला. कटाक्षाने दूर ठेवायचा. बाकड्यावर व्हरांड्यात कैद्यासारखे त्याने सक्त बसून रहायचे. मीनाचेही हेच होत असेल. आता, या क्षणीसुद्धा तिच्या आत्म्याचा तो हुंकार उमटत असेल आणि तो ऐकण्यासाठी सभोवार गोळा झाले असतील ते सारे भाडोत्री गणंग. . हरामखोर. . डांबीस. . भय्याला चीड अनावर झाली. मग तो स्वतःवरच संतापला. सालं आपणच अडाणीपणा केला नि मीनाला इथं आणलं. आपणच सारं निस्तरायला हवं होतं. साऱ्याचे साक्षीदार आपणच. जो या साऱ्याला कारणीभूत त्यानेच ते सारे निस्तरायचे. . आपण अक्कलशून्य आहो. . मूख आहो. .

तोच समोरच्या दालनातून पांढरा गाऊन घातलेले डॉक्टर लगबगीने बाहेर आले पाठोपाठ पावले चटचट वाजवणारी ती मघाची लुब्री नर्स. त्या दोघानाही पाहून भय्याच्या तोंडात काही जहाल शब्द गोळा होऊ लागले. तेवढ्यात डॉक्टर जवळ आले नि त्यानी भय्याच्या खांद्यावर हात ठेवला, "हे पहा मित्रा! मन घट्ट करून ऐक! तुझी बायको मरणाच्या दारात पडलेली आहे. एकतर ती जगेल नाहीतर तिचे मूल जगेल! तुला काय हवंय, बोल– तुला बायको हवी की मूल!"

उत्तररात्रीच्या त्या निःशब्द वेळी भय्याच्या कानात डॉक्टरांचे शब्द दाभणासारखे घुसले. मीना की मीनाचं मूल?– भय्या भानावर आला. भानावर आला आणि गडबडून गेला. एक अकल्पित प्रश्न त्याच्यासमोर उभा होता नि त्या प्रश्नाचे स्वरुप पाहून भय्या गडबडला होता.

"तुला लवकर निर्णय घ्यायला हवा. माझ्या तरुण मित्रा! आता वेळ नाही–" म्हातारे डॉक्टर वडीलकीच्या स्वरात बोलले. भय्याने अगतिकपणे त्यांच्याकडे पाहिले. विजेच्या प्रकाशात त्यांचे भलेमोठे मस्तक नि तुळतुळीत टक्कल भेसूर दिसत होते. भय्याची नजर शून्य बनली. मीना. . मीना. . मला तू हवीस ग ऽ ऽ आय् लव्ह यू. . तुझ्याशिवाय जगणं अशक्य आहे मला. .गेल्या सबंध वर्षात किती अपार सुख दिलंस तू मला. शारीरिक सुख. . मानसिक सुख. . कुठं कुठं भरकटणार

होतो मी.. आयुष्याची उधळपट्टी करीत चाललो होतो कलंदरांच्या दिशाहीन तांड्यातून..राजकारण..तुरुंग..हातभट्टी.. फार काय फोरास रोडवरही गेलो होतो सदचा नि मी.. धोबीतलावला दररोज जाऊन काजूची फेणी प्यायचो. एकजात साऱ्यांना शिवीगाळ करायचो. फाटके कपडे..नोकरी नसणे, यात भूषण वाटायचं. तुकारामाचे अभंग इंग्रजीमध्ये आणायचे होते. जॉर्ज हॅरीसनला रागदारी शिकवायची होती. आरा नि हेब्बर याना सदचा आपले चित्रकलेचे धडे देणार होता.. अस्तित्ववादाची मूळाक्षरे.. रंग अस्सल कोणते.. शब्द अस्सल कोणते आणि खऱ्या रेषा कोणत्या हे शिकवायचे होते साऱ्या जगाला. तेवढ्यात मीना तू भेटलीस नि नोकरीचा राजीनामा फाडला. सदचाच्या चित्रातून जास्वंदी जखमा कमी झाल्या. समलिंगीयांचे आकर्षण संपले. त्या मढच्या प्रकारानंतर.. आणि मिनीटले, तू हां हां म्हणता साऱ्या प्रकारात प्रवीण झालीस हां..पॅनवर आम्लेट बनवायला शिकवावं, तेवढ्या सहजतेनं तू रतिक्रीडेचे नवे प्रकार मला शिकवू लागलीस.. ते सारं या जन्मी विसरता येणार नाही. तुला विसरता येणे.. तुझं अस्तित्व विसरणं शक्य नाही. तू हवीस.. तूच हवीस —

"डॉक्टर, आय् वॉंट मीना.. आय वॉंट माय वाईफ्.."

'ओक्के... लिटल बॉय.. डोंच्यू वरी.." डॉक्टर मुंडकं हलवीत निघून गेले. पाठोपाठ ती नर्स.. आणि भय्या रिकामा झाल्यासारखा बाकड्यावर बसून राहिला.. सालं आपण बरोबर केलं की चूक? काय सांगितलं आपण डॉक्टरना? मीना हवी म्हणून? नक्की? मग त्या जन्माला येणाऱ्याचं काय? ज्यानं आपण एवढे संपूर्णपणे व्यापून गेलो होतो, तो एक परमपावन जन्म.. त्याला नाकारण्याचा काय अधिकार आहे आपल्याला? जशी कविता अंतःकरणातून कुठून तरी उमटते.. जसे चित्र हाताच्या बोटांना सुचते.. तसाच हा उत्स्फूर्त जन्म. त्याला बांध घालणे पाप होईल. आपण ढोंगी आहो का? त्या पायघोळ कवीसारखे.. पैशासाठी गाणी रचणारे? नाही ना.. आपण तर अस्सलपणाचा पुरस्कार करणारे.. मग हा कुठून तरी धावत येणारा जन्म अस्सल नव्हे? हे तर जिवंत अस्तित्व..एक्झीस्टन्स. तुम्ही अस्तित्व नाकारू शकत नाही. जन्माला बंदी घालू शकत नाही.. जन्म म्हणजे परमेश्वर.. नो, नो..आय् मस्ट हॅव माय् सन.. डॉक्टर, डॉक्टर...

भय्या आवेगाने त्या दालनातील पार्टीशनपलीकडे धावत गेला. ...डॉक्टर मला माझं मूल हवंय्.. माझा अंश.. माझं अस्तित्व..मीना गेली तरी चालेल. मूल मारू नका. प्लीज सेव्ह द चाईल्ड..

"तुम्ही मूर्ख आहा ! ॲब्सर्डसारखं वडवडू नका..आता कशाला वेत वदलता? हे सारं किती सीरीयस आहे, कळत नाही? एखाद्या पोरासारखं बोलताहेत..आता तरी नक्की? मूलच हवंय् ना? वायको मरू दे?–

"नाही– नाही डॉक्टर! मीनापण हवीय्. मीनापण नि मूलपण–"

"ॲब्सर्ड–"

"नाहीतर डॉक्टर! दोन्ही नकोत. दोघानाही मारून टाका–"

"तुझं डोकं फिरलंय ! आता मुकाटयानं बाहेर जाऊन बैस! आत आलास तर खबरदार–गेटआऊट–"

मेलेल्या उंदरासारखा डॉक्टरानी भय्याला वाहेर फेकून दिला. भय्या पाय ओढीत बाहेर आला. कल्लोळून बाकड्यावर बसला. पहाटेच्या थंड वाऱ्याच्या झुळुका पसरू लागल्या आणि भय्याचे डोळे मिटू लागले. हां हां म्हणता भय्या भिंतीला डोकं टेकून झोपी गेला–

नर्सने त्याला हलवून जाग केले तेव्हा उजाडले होते. जगाला जाग आली होती. रस्त्यावर हालचाल सुरू झाली होती. हॉस्पिटलच्या व्हरांड्यातून माणसे हिंडू फिरू लागली होती. भय्या डोळे चोळीत भानावर आला. त्याला सर्वात आधी मीना आठवली.. मीना की तिचं मूल? नर्स– नर्स लवकर सांग काय झालं ते–

"कॉंग्रॅटस्! तुम्ही बाप झाला. बाळबाळंतीण दोघंही सुखरूप आहेत. पेढे काढा."

भय्या धडपडत उठला–

"मला पाहू दे. कुठं आहेत ती–"

'चला माझ्याबरोबर–"

मीना खाटेवर शांतपणे पहुडली होती. ओहोटीच्या किनाऱ्यासारखी आणि दुपट्यात गुंडाळलेला त्याचा मुलगा तिच्या कुशीत होता. मीनानं पापण्या उंचावल्या आणि भय्याकडे पाहिले. सकाळच्या कोवळ्या किरणांसारखे ती हसली आणि भय्याला राहवले नाही. आजुबाजूच्या खाटांचे भान न ठेवता तो खाली वाकला. आणि त्याने तिच्या फिक्या जास्वंदीसारख्या ओठांवर आपले ओठ टेकले. मीना आपण नि आपले बाळ म्हणजे सदचाने काढलेले एक अस्सल चित्र आहे, असे त्याला वाटले. जिथे जखम जास्वंदीसारखी भासू लागते आणि सारे अस्तित्व कॅन्व्हास आणि चौकट यांबाहेर धावू लागते... एकाद्या मुक्त कमिटमेंटसारखं...

• • •

( पान १७ वरून सूर्यमुखी )

आहे. त्याला या गर्तेतून वर काढला पाहिजे. मागच्या खेपेला मी त्याला लिहिलं होतं –– आता तुम्ही न लिहिता त्याला भेटलं पाहिजे. समजावलं पाहिजे. त्याला पटलं नाही तरी तुम्ही पाय रोवून राहिलं पाहिजे. तुम्हीच जर . . ."

" नाही हो––नाही––"

त्याने तिच्याकडे टक लावून पाहिलं. तिची एकाच वेळी हीन-दीन झालेली अन् दिव्य करायला सिद्ध झालेली मुद्रा पाहून तो प्रसन्न झाला आणि त्याची उजळलेली चर्या पाहून तिला परत अवसान आलं. आपले पाय, आपलं मन खंबीर आहे ह्याचा प्रत्यय आला. ह्या देव-माणसाने प्रलयाच्या काळी केवढा आधार दिला आहे आपल्याला ! तिला त्याचे पाय धरावे असं वाटलं. त्याला वचन द्यावंसं वाटलं.

तेवढयात तो म्हणाला, " तुमची तुमच्यावर श्रद्धा असली तर सारं सोपं आहे. शंतनू सुचवतो त्यापेक्षा फार मोठं समाधान, फार वरच्या दर्जाचं सुख तुम्हाला लाभेल. . .त्याला कसं समजावयाचं, शांत करायचं ते बघा. पण मला वाटतं, तो इकडे येत नसला तर रजा घेऊन त्याला तुम्ही तावडतोब भेटून या. तुमच्या नुसत्या स्पर्शाने तो भानावर येईल. त्याच्या दर्शनाने तुम्हाला धीर येईल . . ."

तिला वाटलं, आताच उठावं व नवऱ्याकडे धाव घ्यावी. त्याच आवेशात ती उठली. आपल्याला श्रद्धेचा, त्यागाचा मंत्र देणाऱ्या त्या महामानवाकडे एकवार पाहून घाईने घरी परतली. ☆ ☆

त्या प्रसंगानंतर आठच दिवसानी तो तिला भेटला. कचेरी सुटल्या-वर ती समोर पहात घरी परतत होती तेव्हा बाजूच्या व्हरांड्यातून पुढे होत तो म्हणाला,

" घरी चाललात ? तिकडे गेला होतात ?"

नाही म्हटलं तरी ती जरा चमकलीच. तो आपण होऊन, इतक्या लवकर भेटायला येईल असं तिला वाटलं नव्हतं. तिला एकदम संकोचल्यासारखं झालं. एका प्रसिद्ध नि थोर पुरुषाने आपल्या-सारखीला कारकुनी कळपात गाठावं आणि . . .




" घरी चालले. . .गेले होते तिकडे. त्याच दिवशी. . ."

तो तिच्याबरोबर चालू लागला. मोकळ्या पटांगणाकडे न जाता, हमरस्त्याने दोघं चालू लागले. मग त्याने प्रश्न विचारण्या आधीच तिने सांगितलं,

" त्यांची समजूत पटायला खूप त्रास पडला. वाटलं होतं, भेट झाल्यावर सारं ठीक होईल. पण फार हट्टी स्वभाव बनलाय त्यांचा . . .मी रजा काढून इतकी लांब आले म्हणून आधी ते रागावले. . अन् मग कोर्टात अर्ज कर हे एकच पालुपद लावलं. . . अखेर कशी-बशी समजावून परतले –– आता शांत, मजेत आहे स्वारी. . ."

तिने हसल्यासारखं केलं. तोही जरा हसला व फुलून गेला.

" शाबास ! परमेश्वर तुम्हाला सुखी करेल. कधी नाही इतकं शांति-समाधान लाभेल तुम्हाला. . ."

तो गेला तरी ती वळून पाहात राहिली. त्याच्या शब्दानी परत तिला धीर आला. हा माणूस आपल्या पाठीशी असल्यावर कसली भीती ! . . . खरं म्हणजे, शंतनूला भेटून व त्याची समजूत पाडून परतल्यावर ती स्वतःच अस्वस्थ झाली होती. त्याची अपंगावस्था, चिरचिरा स्वभाव, कुजत चाललेला संसाराचा डाव, वाढता खर्च, एकाकी आयुष्य–सासरी परतल्यावर हे सारं तिला अधिकच सतावू लागलं. यातून कसं सावरायचं, उभं राहायचं, तिला कळेना ! पण आता हा भेटला. ह्याने धीर दिला, आशीर्वाद दिला. . . तिला जरा तरतरी आली. आदल्या रात्रीचं जागरण, कचेरीतलं काम–– सारं विसरून ती घरी परतली.

तिला वाटलं, आयुष्यात आलेलं आणखी एक मोठं वादळ आता नाहीसं झालं. आपल्या मनात विकल्पाचं कुसळ आलं, पण त्याच्या अमोल उपदेशाने आपण ते उपटून टाकलं. नवऱ्याने नसतं साकडं घातलं, पण त्याच्या पाठबळावर आपण तेही निवारलं. आता संकटं संपली. अंधारात कां होईना, पण आपलं आयुष्य आता सुरळीत चालू राहील. घरचं करायचं, नौकरी करायची, नवऱ्याला पत्रं लिहायची, विरंगुळा म्हणून त्याने लिहिलेली आत्मकथा वाचायची. अन् अस्वस्थ झालं तर त्या देव माणसाची आठवण करायची ! आपलं आयुष्य ह्या चाकोरीतून जाणार अखेरपर्यंत ! ह्यात काही, कोणीही बदल करू शकणार नाही. . .

असं आयुष्य तिने खरोखरच आखलं. अन् खरंच तिला शांती लाभू लागली. वळ येत चाललं. कित्येक दिवसानी कचेरीतून बाहेर पडताना तिने मागील मोकळ्या पटांगणाकडे सहज पाहिलं तेव्हा तो पलीकडून घाईने जाताना तिला दिसला. त्याने हात हालवला, ती थबकली. मग दोघं मैदानातल्या एका झाडाखाली भेटले.

" कितीतरी दिवसानी दिसलात . . ." ती मंद हास्य करीत म्हणाली.

" हो––हल्ली बराच वेळ दौऱ्यावर असतो. कामाचा व्याप वाढतोच आहे . . . भेटायला हवं होतं खरं तुम्हाला . . पण . . ." तो घाम पुशीत, घाईने म्हणाला.




" तशा अर्थानें नाही मी म्हणाले . . . तसं कामही नव्हतं काही."

" आता काही त्रास नाही ना ?"

त्याच्या तेजस्वी नजरेने, धीरगंभीर मुद्रेने ती एकदम टव-टवीत झाली. तो आता अधिक प्रगल्भ वाटत होता. जवळचा वाटत होता. गेल्या काही महिन्यात तिने त्याचे लेख मिळवून पुन्हा पुन्हा वाचून काढले होते. त्याचे साप्ताहिक तर ती न चुकता घेई. त्याची मतं तिला पाठ होती, मान्य होती. त्याच्या शब्दांवर व विचारांवर तर तिने आयुष्यात उभारी धरली होती. तिला वाटलं, त्याला सांगावं, तुम्ही असल्यावर कसला त्रास ? काही नाही . . .

पण ती थबकली. मन मोकळं करायला दुसरं कोण होतं ? तिच्या थकलेल्या, तहानलेल्या मनाला संजीवनी देणारं दुसरं कोण होतं ? त्याला नव्या अडचणी सांगाव्यात; अन् सांगावं की मी त्यातून तुमच्यामुळे तरले आहे.

" त्रास ? म्हटला तर आहे, म्हटला तर नाही . . ."

" म्हणजे ?"

त्याचा जरा गंभीर—जरा भावडा स्वर ऐकून तिला वाटलं, आपण नाटकीपणा करतो आहो. त्याच्यासमोर नाटकीपणा, दंभ अगदी नको. तिला खाली बैठक घालावी व संयपणे सांगावं असं वाटलं. पण तो गर्दीत असल्याने कदाचित् नाही म्हणेल म्हणून ती चटकन् म्हणाली,

" हे आता काही बोलत नाहीत. आला दिवस साजरा करतात. उपचार करीत नाहीत नि इकडेही येत नाहीत . . .पण आमच्या सासू सासऱ्यांच्या मध्ये अंगात आलं. त्याना वाटलं, की एका अश्राप मुलीचं आयुष्य आपण बरबाद करतो आहोत. त्यानी मोठेपणा दाखवून मला त्यांच्या लेकापासून वेगळं व्हायला सुचवलं . . . पुनर्विवाह करायची परवानगी दिली . . ."

" काय—म्हणता काय ?"

" भावडी ; देव माणसं . . . .त्याना मी बधेना, तेव्हा प्रत्यक्ष माझी आई आली ! माहेरी घेऊन जायला आली. गळ्यात पडून रडली. तीही उपदेश करू लागली की . . ."

तिच्या डोळ्यात नकळत चटकन् पाणी आलं. ती गप्प झाली व त्याने ही 'समजलं' —— असा आविर्भाव केला.

" आता आईही थंड आहे. सगळं शांत आहे . . . मध्ये एका माण-साचं लग्नाची मागणी घालणारं पत्र आलं होतं . . .कधी कुणी घाणेरडं कुजबुजतं . . .पण एकूण आलबेल . . ."

समारोप करायला म्हणून ती हसली, अन् त्याची मुद्रा पाहून गंभीर झाली. तो गंभीर स्वरात म्हणाला,

" तुमचं हे वर्तन म्हणजे माझ्या विचारांचं प्रात्यक्षिकच आहे. तुमचं उदाहरण हल्लीच्या कित्येक स्त्रियाना आदर्श आहे. तुमचं मला कौतुक वाटतं. असंच धैर्य दाखवा. श्रद्धा ठेवा . . ."

"तुमच्यामुळेच—" तिला म्हणावंसं वाटलं. पण ती बोलू शकली नाही. त्याचंच ऐकत राहिली. अन् तो गेला तरी त्या दिशेकडे पाहात राहिली.

त्या क्षणी तिला वाटलं, आपलं आयुष्य पूर्णत्वास पोचलं आहे. खरं बहरलं आहे. ह्या पुरुषामुळे ! ह्याच्यामुळे आपण सरळ मार्गावर, मान वर करून जात आहोत. हिरव्या तृणपात्याने सरळ केलेल्या किडा-मुंगीसारख्या तळपत्या सूर्यामुळे डोलणाऱ्या पुष्प-तवकासारख्या.

☆ ☆

कितीतरी काळानंतर ती त्याच्याकडे निघाली होती.

पांढरी साडी नेसली. हातातली कंकणं काढून टाकली व ठसठशीत कुंकू लावलं. शक्य तो सोज्वळ भाव आणून आरशात पाहिलं. थोडं खिन्न होऊनही त्याच्याकडे जायचं म्हणजे अगदी जोगीण व्हायला हवं असं नाही. पण अगदी साधं, अन् जरासं खिन्न दिसायला मात्र पाहिजे. तशी ती त्याला प्रथम भेटली होती. कितीतरी वर्षं लोटली. युगं गेल्यासारखं आता भासतं. तो काळ गेला. ते आयुष्यही आटोपलं. त्यावेळची खिन्नता गेली अन् साधेपणाही गेला. न संपणारे कष्ट आटोपले आणि आदर्शही कोसळले. आता आपली माणसं दुसरी, मूल्यं निराळी. . . .पण तेव्हा मात्र त्याच्या धीराच्या शब्दावरच ती जगात ठामपणे उभी राहू शकली. त्याच्या आदर्शांच्या कल्पनेवर आयुष्याला आकार आणू लागली.

सूर्यकिरणांच्या तिरीपीत सूर्यफुलाने फिरावं तशी.

आरशात बघताना तिला खरोखरीच खिन्न झालं. ती आता वेगळ्या वाटेवर, जगात ठामपणे उभी होती. खरोखरीच अंगपिंडाने सुधारली होती. सुटली होती. अंगावर नवे अलंकार घालीत होती.



आता अंगावर एक मूलही पीत होतं ! नवरा चांगला प्राध्यापक. खेळाडू नसला तरी 'स्पोर्ट' होता. आता ती सुखात होती. . . जुनं सगळं विसरली होती. देवाघरी गेलेली सासूसासरा आणि अजून इस्पितळात उपचार करीत पडलेला घटस्फोटित शंतनू !

शंतनूची अगर नवऱ्याची आठवण येण्याऐवजी तिला तो पुरुषच सारखा स्मरत होता अन् त्याचेबद्दल अनुकंपा दाटत होती. ज्याने एकेकाळी आपल्याला आधार दिला, अश्रू आवरायला व प्राक्तन पत्करायला शिकवलं, सरपटणाऱ्या काळजाला आकाशातली नक्षत्र पुष्पं दाखविली —— त्याला आपण विसरायचं, टाळायचं, याचं दुःख वाटलं. परत एकवार वाटलं, यापेक्षा त्याला न भेटणं बरं ! नाही तरी आता कुठे संबंध उरला आहे ? परवा नाही का आपण त्याला टाळलं ? आपण टाळलं, आपण ढळलो, हे त्याला कळालं तर काय मोठं बिघडलं ? ——

— ती ह्या गावी मैत्रिणीच्या लग्नासाठी म्हणून सासरहून आली व मुलाला कडेवर घेऊन बाजारातून गेली तेव्हा तो तिला समोरून येताना दिसला. कित्येक वर्षांनी त्याला असा अकस्मात् बघून ती विलक्षण दचकली. तिच्या आयुष्यातून तो गेला होता अन् स्मृतीतूनही. त्याचं साप्ताहिकही बंद पडलं होतं व तो दुसऱ्या गावी, दुसऱ्या प्रांतात गेला होता. तो कधी काळी भेटेल, समोर टाकेल असा विचार तिच्या मनात मग आला नव्हता. त्यामुळे त्याची आकृती दिसताच ती दचकली. छातीशी बिलगलेलं मूल हिंदकळलं, रडू लागलं, तिला घाम फुटला, पायात गोळे आले. काही ठरविण्याआधीच तिची नजर खाली गेली. त्याला टाळीत ती गर्दीत मिसळली.

लग्नघरी ती परतली, पण तिला माणसात आल्यासारखं वाटेना. बावचळल्यासारखी ती बराच वेळ बाजुबाजूला होती. जुनं आयुष्य तिला नको तरी बिलगत होतं . . . शंतनूच्या आत्मकथेचे कागद, इस्पितळातील व्हील-चेअरवरची अपंग आकृती. . . सासू सासऱ्याचं दुःख नि आईचा उपदेश — आणि कचेरीत उभा असलेला तो ! त्याचे लेख, त्याचा आवाज, त्याचं विशाल भाल व तेजाळ डोळे. . . 'एक व्रत तुमच्या वाटचाला आलं आहे. फार मोठं बळ नि काळीज हवं अशा वेळी. ज्याना साधतं तेच माणुसकी तारतात. ही माणुसकी, अशी मूल्यं सोडू नका. फार मोठं समाधान, सुखशांती लाभेल तुम्हाला ' . . . त्याच्या खुणेवर चाललेलं त्यावेळचं जीवन . . .

कितीतरी वेळ ती भोवंडत होती. काय केलं नि काय झालं—काहीच कळेना तिला! त्या पुरुषाच्या दर्शनाने बळ येण्याऐवजी घेरी आल्यासारखं झालं. पूर्वी त्याच्या लेखांच्या, संभाषणाच्या, नुसत्या अस्तित्वाच्या उजेडात ती उमलत होती. एकटी वाटचाल करीत होती. . . पण मग त्याचं साप्ताहिक बंद पडलं, संघटना कोसळली. विशिष्ट तत्वांसाठी झगडणारा तो पुढारी परागंदा झाला. तिला पाकळ्या गळाल्यागत झालं. शंतनूला उत्तेजनाची पत्रं लिहिणं दिवसेंदिवस अवघड होत गेलं. कष्ट वाढले, खर्च वाढला, दगदगीचे दिवस भरू लागले व रात्री अधिकच भकास झाल्या, कसं, किती




हे सर्व म्हणजे






# ऐक्याचे दीप घरोघरी उजळू देत

प्रसिद्धी संचालक, महाराष्ट्र शासन, मुंबई



अनुक्रमणिका

काळ अवसान आणायचं ?— कुठल्या तरी काल्पनिक श्रद्धेवर, शिकविलेल्या मूल्यावर ! अखेर सगळ्याचा काय अर्थ होता ? कोण सांगेल, समजूत घालील ?

तिच्या वळवळणाऱ्या विचाराना हिरव्या पात्यासारख्या श्रद्धेने सरळ करणारा नि सुकत जाणाऱ्या मनाला मानावर ठेवणाऱ्या तेजोगोलासारखा तो पुरुष कुठेच दिसत नव्हता. ती कंटाळली, दमली, वाकली–अन् अखेर मोडून पडली! कुणी तिऱ्हाईताने एका प्रौढ प्राध्यापकाचं स्थळ सहज सुचवताच पुढचे सारे सोपस्कार करावयास सिद्ध झाली . . .

–लग्नघरातल्या गर्दीत ती मिसळली. सनईचे सूर, दागिन्यांचा झगझगाट, नवी नवरा-नवरी. . . . मंगलाष्टकं म्हणताना तिला वाटलं, उगाच टाळलं त्याला. त्याला गाठावं व सांगावं– सगळं फोल आहे. मनाचे खेळ आहेत. बघा, मी पूर्ण सुखासमाधानात आहे. . . वरात गेली नि तिला विचित्र झालं. कुणीतरी वधूच्या पूर्वायुष्याबद्दल कुजबुजलं अन् तिच्या काळजात चर्रर झालं. उमलती स्वप्नं पाहाणाऱ्या त्या उमद्या वराची काळजी वाटली. . .तशीच ती जागरण करीत राहिली अन् उत्तररात्री उल्का पडल्याचं पाहून अस्वस्थ झाली. तिला सारखा बाजारच्या मागील चर्चवरील खिळे ठोकून ठेवलेला ख्रिस्त दिसत राहिला. वळवळणाऱ्या किड्यासारखं तिचं काळीज तडफडू लागलं.

संसारात परतण्याचा दिवस येऊन ठेपला व ती दचकून उठली. नवऱ्याकडे जाणं जरूर होतं. सुरळीत व सुखासमाधानात चाललेल्या आयुष्यात आता वादळ अगदी नकोत. तरीपण त्याची गाठ घेणं अपरिहार्य होतं! . . . त्याच्या समोर मान वर करून उभं राहाणं शरमेचं होतं, पण त्याची मान ताठ ठेवणं जरूर होतं. आपण उणे ठरलो, व्रत मोडून वळवळत राहिलो – ते उमगून तो उरी भंगला तर ? त्याची श्रद्धा डळमळली तर ?– तर जगच बुडेल ! माणुसकीचा आधार उरणार नाही . . .

पदर घट्ट लपेटून ती निघाली. अट्टाहासाने, अधीरतेने. पूर्वीच्या त्या ठराविक रस्त्याला लागली आणि तिचा उरलासुरला संभ्रम सरला. ती विलक्षण हळवी झाली. नवऱ्याचं नाव उच्चारीत त्याचं बिऱ्हाड गाठू लागली.

तीच जुनी संपादकाची खोली. आता अवकळा आलेली. पुन्हा भगीरथ यत्न करून तो नवा मांड मांडीत होता. झेप घेऊ पहात होता. तीच धीर गंभीर तेजस्वी मुद्रा– आता जरा मलूल भासणारी.

"तुम्ही?– तुम्ही– !"

तिने मान हलवली, खाली वळवली. आपल्याला अखेर मान खाली घालावी लागली याची खंत वाटली. नव्या संसारावर, स्वतः-वर अन्याय करतो आहोत असं वाटलं. वर बघावं, त्याच्या नजरेला नजर द्यावी, सरळ सांगावं . . .

तेवढ्यात तो घोगऱ्या स्वरात म्हणाला,

'ठीक आहे ना ? . . इतके दिवस मी इथे नव्हतो. पुन्हा धडपड सुरू केली आहे. सतीचं वाण आहे हे. . . तुम्हाला परवा पाहिलं ओझरतं. त्या आधीचं तुमच्याबद्दल सगळं कळलं होतं . . ."

तिला बोलायला वळ येईना. वर बघवेना. वर बघितलं तर तो उल्केसारखा कोसळून पडेल. येशूसारखा दिसेल. आपलं फुललेलं जीवन पाहून तो सूर्यनारायण काजळून जाईल.

"काही काम होतं ? काही हवंय ?–" त्याने आपलेपणाने विचारलं. त्याचा स्वर तिचं काळीज कापून गेला. ह्या माणसाने खूप दिलं. ह्यानेच खूप सहन केलं. . क्षणकाल ती सारं विसरली व मंतरल्यासारखं बोलू लागली,

"काम नाही. . . काही ठीक नाही हे सांगायला आल्येय. . . .तुमचं न मानता मी सुख शोधलं.सासर विसरले, शंतनूना सोडलं, अन् लग्न केलं! आता सारी सुखं आहेत. माताही झालेय. . पण सारं फोल आहे. ह्या सुखाला अर्थ नाही. हे तकलादू आहे, उष्टं आहे. आता सुख नाही– उलट अपराधाची टोचणी आहे— तुमची शिकवण, तुमची मतंच खरी होती. वाटचाला आलेलं व्रत स्वीकारलं पाहिजे. कुणासाठी तरी सर्वस्व दान करायला हवं. त्यातच उच्च दर्जाचं सुख नि शांती ! . . . मी फसल्ये. दुःखी, पापी ठरले . . ."

ती हळूहळू थबकली. आपण सुखी की दुःखी–कोण जाणे! पण ह्या पुरुषाची त्याच्या मतावरची, मूल्यावरची श्रद्धा डळमळायला नको. त्याच्या तत्वाना तडा जायला नको. आपलं उदाहरण बघून त्याची तपश्चर्या वाया जायला नको.

सगळे भाव एकवटून तिनं वर पाहिलं. त्या क्षणापुरती ती पश्चातापाने पोळत राहिली, आणि त्याच्या मुद्रेवर पसरत जाणारा परिचित प्रकाश पाहून अन्तर्यामी शांत होऊ लागली.

• • •

# प्रतिक्षा

—प्रभाकर पेंढारकर

कादंबरी स्पर्धेत
पाहिले पारितोषिक
पटकावणारी
भारत-पाक युद्धाच्या
पार्श्वभूमीवरील
चित्तथरारक
कादंबरी

अनुक्रमणिका

# कादंबरी स्पर्धेसंबंधी

'दीपावली'ने आयोजित केलेल्या कादंबरी–स्पर्धेत चाळीसवर लेखक–लेखिकानी भाग घेऊन हा उपक्रम यशस्वी करण्यात सहकार्य दिले हे नमूद करण्यास आम्हाला अत्यंत आनंद वाटतो.

कादंबऱ्यांच्या परीक्षणासाठी सौ. मालतीबाई बेडेकर, श्री. अरविंद गोखले आणि श्री. जयवन्त दळवी या मान्यवर साहित्यिकाना आम्ही विनंती केली होती, ती त्यानी मान्य केली आणि आपला अमूल्य वेळ खर्च करून कादंबऱ्यांचे परीक्षण केले याबद्दल आम्ही तिघाही परीक्षकांचे मनःपूर्वक आभार मानतो.

तिघाही परीक्षकानी एकमताने दिलेला निर्णय 'दीपावली'च्या ऑक्टोबर १९६८ च्या अंकात प्रसिद्ध केलेला आहेच. स्पर्धेत पहिली ठरलेली श्री. **प्रभाकर पेंढारकर** यांची 'प्रतीक्षा' ही कादंबरी या दिवाळी अंकात प्रसिद्ध करीत आहो. स्पर्धेतील दुसऱ्या क्रमांकाची श्री. **रवींद्र पिंगे** यांची 'परशुरामाची सावली' ही कादंबरी 'दीपावली'मधून लौकरच प्रसिद्ध होईल.

स्पर्धेसाठी आलेल्या कादंबऱ्या वाचून परीक्षकानी आपल्या काही प्रतिक्रिया व्यक्त केल्या आहेत. कादंबऱ्यांबाबत त्यानी खालील आशयाचा सर्वसाधारण अभिप्राय व्यक्त केला आहे :

"स्पर्धेसाठी आलेल्या कादंबऱ्यात विषयांची विविधता, तंत्राची जाण, परिणाम साधायची हातोटी, इत्यादि गुण ठळकपणे दिसले. त्याचबरोबर गैर निसर्गवर्णने, जादा शृंगारिक प्रसंग, माहिती देण्याचा सोस, संदेश देण्याची प्रवृत्ती––वगैरे दोषही आढळले.

"परीक्षणार्थ वाचलेल्या कादंबऱ्यात पेंडसे व दळवी यांच्या कादंबऱ्यांची––परीसर व पद्धती––छाप आढळून आली. एक माडखोलकरी कादंबरीही भेटली. खांडेकर व विशेषतः फडके यांचा प्रभाव दिसला नाही. अगदी वेगळे तंत्र अगर विषय कुणी हाताळला नाही. युद्धविषयक निवडलेली कादंबरी ही अपवाद ––

"महाराष्ट्रात व मराठी मनात सांप्रत जी प्रचंड उलथापालथ होत आहे, ग्रामीण–व नागरीही—जीवन ढवळून निघत आहे––त्याचा प्रत्यय कुठेही आढळला नाही.

"कथासूत्राचा सुसंगत परिपोष, उठावदार व्यक्तिचित्रण आणि तर्कशुद्ध परिणती या गोष्टींचा बराचसा अभावच जाणवला.

"पाल्हाळ, अयोग्य शब्दयोजना, थोड्याशा वर्णनात व्यक्ती वा स्थलांचे चित्रण, नेटकं व्यक्तीदर्शन, प्रसंग व व्यक्तीनुसार संवाद लेखन— याबाबतीत स्पर्धकाना बरेच शिकावयाचे आहे.

"वेगवेगळ्या वयाच्या व वृत्तीच्या, हेतूच्या व प्रतिभेच्या नवोदित व नामवंत लेखकांचे स्पर्धेसाठी आलेले लेखन वाचून मराठी कादंबरीची झेप जाणवली नाही तरी ताकद अंदाजता आली."

—**संपादक**





अनुक्रमणिका



ब्लॅक-आऊटमुळं बाहेर अंधार दाटला होता. डोळे झोपेनं मिटू लागले होते. झोप घालविण्यासाठी मी उठून बाहेर येऊन उभा राहिलो. दूर बागेच्या पलिकडे, सफेद रंगवलेले फाटक, अंधारातून अस्पष्ट दिसत होतं.

तिथं पहारेकरी उभा असणार !

तो आणि मी दोघंच पॅरा ब्रिगेडच्या हेड क्वॉर्टर्समध्ये रात्रीचे जागत उभे होतो. पण पहारेकऱ्यापेक्षा मी सुखी होतो. 'ऑफिसर ऑफ दी डे'ला तशी झोपण्याची परवानगी असते. पण अशा पोषाखात झोप काढणं हेही एक दिव्यच होतं !

बागेत फिरण्यात अर्थ नव्हता. रस्ता दिसतच नव्हता. शत्रूच्या विमानांचं लक्ष देशातल्या विमानतळाकडे होतं – आणि येथून काही मैलांवर असलेल्या एअरफोर्स स्टेशनवर कधीही बाँब पडण्याची शक्यता होती. पाक वैमानिकांचा काही भरवसा नाही– मी स्वतःशीच म्हणालो. एअरफोर्स स्टेशनवर टाकलेला बाँब पाच मैल दूर असलेल्या ह्या ब्रिगेड हेड क्वॉर्टर्सवर नेमका पडायचा !

आणि खरं सांगायचं म्हणजे असं मरायची माझी बिलकुल इच्छा नाही. वर्तमानपत्रात माझे फोटो येतील. वडिलांच्यावर त्यांच्या दुःखात सहभागी असलेल्यांच्या ठरावांचा वर्षाव होईल –आणि गावच्या एका रस्त्याला माझं नाव दिलं जाईल. बस्स् संपलं !

प्रत्येक रस्त्याला जर मरणाऱ्या सैनिकाचं नाव द्यायचं झालं तर मला वाटतं काही वर्षात भारतात नाव द्यायला रस्तेच शिल्लक रहाणार नाहीत– आणि त्याही पुढे युद्धं झाली, (आणि ती होत रहाणारच ) तर सैनिकांची नावे देण्यासाठीच नवे रस्ते बांधावे लागतील.

रस्त्याना नावे देण्याला माझा विरोध नाही. पण खरं सांगायचं म्हणजे जे काम माणूस आपल्या चरितार्थाकरिता पत्करतो त्याबद्दल त्याचा गौरव काय करायचा !

हां, त्या पलिकडे कोणी काही करील तर त्याचं कौतुक जरूर केलं पाहिजे.

## पार्श्वभूमी–

पॅराशूट ट्रेनिंगवर एक शैक्षणिक चित्र तयार करण्याकरिता पॅराट्रुपर्सबरोबर मी दोन महिने राहिलो. ह्या काळात पॅराशूट-इतकाच ते वापरणाऱ्या सैनिकांचा अगदी जवळून परिचय झाला.

ह्यामुळे एक जाणीव झाली की कडक युनिफॉर्म, चकाकणारे खांद्यावरचे तारे आणि रंगीबेरंगी फिता ह्यामागे दडलेले सैनिकाचे मन बाहेरील माणसाच्या मनाइतकेच संवेदनाक्षम असते. समाजापासून एका अर्थी, अलग असताही सामाजिक अथवा राजकीय बदलांचे आघात त्यांच्यावर होत असतात. आणि ह्यातूनच समाजाच्या ढळलेल्या श्रद्धा आणि तडा गेलेली मानवी मूल्ये त्याना अस्वस्थ करू लागतात.

युद्धाच्या कथा रम्य हे खरे पण प्रत्येक युद्ध ही अखेरीस एक शोकांतिकाच असते. जितकी पराजित राष्ट्रांच्या बाबतीत; तितकीच विजेत्यांच्या बाबतही ! आणि जेव्हा निर्णायक जय अथवा पराजय न मिळताच युद्धे थांबवली जातात तेव्हा निश्चितच दोघांच्याही बाबतीत !

प्रस्तुत कादंबरीच्या नायकाला शेवटी झालेली जाणीव– "A war brings out the best in man, but, most of the times, also worst in man." प्रत्येक विचारी, समंजस सैनिकाला कधी ना कधी होतेच ! युद्धाची रम्यता तेथे संपते आणि उरते ती केवळ शोकांतिका !

ही कादंबरी लिहिण्याकरिता पॅरा ब्रिगेड आणि भारतीय हवाई दलाच्या अधिकाऱ्यांची मोठी मदत झाली. त्यांचे मनःपूर्वक आभार !

परवाचीच गोष्ट ! रिफ्रेशर कोर्ससाठी मी दुसऱ्या जंपसाठी विमानाच्या दारात उभा होतो. प्रत्येक पॅराट्रुपरच्या जीवनात भीतीचा एक क्षण असतो. आणि कितीही जंप्स् झाल्या तरी त्यापासून सुटका होऊ शकत नाही. ही भीती कुणाला विमानात चढताना वाटते, कुणाला पॅराशूट बांधताना वाटते, कुणाला 'ग्रीन ऑन'ची घंटा ऐकली की ! – मला ती विमानाच्या दारात येऊन उभं राहिलं की कोठून तरी येऊन क्षणार्धात ग्रासून टाकते. बाराशे फूट खाली, इतका वेळ चित्रासारखी रमणीय दिसणारी जमीन एकदम मृत्यूचा भयानक जबडा बनते. आणि 'गो' हा डिस्पॅचरचा शब्द ऐकला की हृदयाचा एक ठोका चुकतो. अंग घामानं भिजून जातं.

दरवाजात उभं रहाण्याचा एकच सेकंद. पण तो संपता संपतच नाही. स्वप्नात धावताना जसे पाय जड होतात तसं सारं शरीर जड होऊन समोरच्या पोकळीत फेकून देणं अशक्यप्राय होतं.

दरवाजातून बाहेर पडल्यापासून छत्री उघडेपर्यंत फार तर तीन ते चार सेकंद ! पण तेवढ्या वेळात जीवनाचा सारा चित्रपट नजरेसमोरून तरळून जातो. वडील आठवतात, आई

आठवते, एअर फोर्सचा सार्जंट आठवतो, फार काय द्यायचा राहिलेला विम्याचा हप्ताही नेमका ह्याच वेळी लक्षात येतो.

केवळ सवयीमुळं तोंडातल्या तोंडात आपण पुटपुटत असतो– 'एक हजार, दोन हजार, तीन हजार, चार हजार!' तोवर सर्वांगाला एक जबरदस्त धक्का बसतो. आणि वर न पहाताच पॅराट्रूपरला समजतं की छत्री उघडली आहे.

–फिरून खालची जमीन जादूनगरीसारखी रम्य दिसू लागते. वाटू लागतं – ह्या विश्वाचे स्वामी आपणच !

हो, मी काय सांगत होतो. विमानाच्या दाराजवळ मी उभा होतो. पुढच्या पॅराट्रूपरनं उडी घेतलेली मी पाहिली. आता मी उडी घेणार इतक्यात डिस्पॅचरनं मला मागं खेचलं!

माझ्या अगोदर उडी मारलेला लेफ्टनंट दास विमानाखालीच लोंबकळत राहिला होता. विमानाला अडकवलेली त्याच्या पॅराशूटची स्टॅटिक लाईन त्याच्या हाताभोवती गुंडाळली गेली होती.

ह्या स्टॅटिक लाईनचे दुसरे टोक पॅराशूट पॅकला पक्के केलेले असते. उडी घेतल्यावर पॅराट्रूपरच्या वजनाने स्टॅटिक लाईनला हिसका बसतो आणि पॅराशूट पॅकबाहेर येते. लेफ्टनंट दासच्या हाताभोवती तिचे वेढे पडल्याने त्याची विमानापासून सुटका नव्हती. विमानाबरोबरच तो तसाच लोंबकळत चालला होता. विमान अशा स्थितीत खाली उतरवलं तर विमानाची चाकं जमिनीवर टेकण्यापूर्वी तो आदळेल, विमानाबरोबर रन्वेवरून फरफटत खेचला जाईल.

डिस्पॅचर होता फ्लाईट सार्जंट पटेल. त्यानं सर्वांना मागं जायला सांगितलं. इंटरकॉमवरून मोजक्या शब्दात पायलटला काय घडलं आहे ह्याची कल्पना दिली आणि विमान फिरून ड्रॉपिंग झोनकडे वळविण्याबद्दल सूचना दिली.

त्याची शांतता पाहून मी थक्क झालो. विमानात आम्ही चाळीसजण होतो. सारेच अस्वस्थ झालेले ! आमच्यापैकी एका ट्रूपरचं मरण उघड्या डोळ्यानी आम्ही मुकाट पहात होतो. मला राग आला. स्वतःचीच शरम वाटली.

पटेल दाराशी शांत उभा होता– आणि मग माझ्या लक्षात आलं काय घडतं आहे ते ! स्टॅटिक लाईन लेफ्टनंट दासच्या मनगटाभोवती गुंडाळली गेली होती. त्याच्या वजनानं ती दोरी हळूहळू त्याचा हात कापत होती. कणाकणानं दासचा हात तुटत होता.

विमान फिरून ड्रॉपिंग झोनकडे चाललं होतं. आम्ही तरी सात आठ मैल ड्रॉपिंग झोनपासून अद्याप दूरच होतो – आणि त्याच वेळी स्टॅटिक लाईन मोकळी झाली. दासचा हात तुटून पडला असावा. आम्ही खाली पाहिलं. दासचं पॅराशूट उघडलं होतं.

फ्लाईट सार्जंट पटेलनं पायलटची परवानगी विचारली आणि उत्तर येण्यापूर्वीच विमानातून उडी घेतली.

वास्तविक डिस्पॅचरने विमानातून उडी घ्यायची नसते. त्याच्याकडे एकच पॅराशूट असतं, केवळ प्रसंग पडलाच तर स्वतःचा जीव वाचविण्याकरिता ! आम्ही उडी मारतो तेव्हा आम्हाजवळ दोन पॅराशूट असतात, एक आपोआप उघडलं नाही तर दुसरं राखीव आपल्याला उघडावं लागतं.

पण पटेलनं स्वतःचा जीव धोक्यात घालून उडी घेतली. लेफ्टनंट दास हात तुटल्याने कदाचित बेशुद्ध झाला असेल. तो ड्रॉपिंग झोनबाहेर पडल्याने कदाचित् विजेच्या तारांवर अथवा झाडाच्या शेंड्यावर उतरेल. शुद्ध हरपली असेल तर विमानातून टाकलेल्या धान्याच्या पोत्यासारखा तो जमिनीवर आदळेल. हा सर्व धोका स्वतःच्या बाबतीत पत्करून फ्लाईट सार्जंट पटेलनं उडी घेतली. भावनेच्या आवेगात नाही. अगदी उघड्या डोळ्यानी, शांत चित्तानं !

अशांचं कौतुक व्हायला हवं !

मग तो आघाडीवर लढणारा सैनिक असो, विमानदळाचा पायलट असो अथवा शाळेत शिक्षक असो !

तो काय काम करतो ह्यापेक्षा तो कसे करतो ह्याला मी जास्त महत्त्व देईन! प्रामाणिकपणे व्यापार करणारा व्यापारी अथवा जास्तीत जास्त धान्य शेतात पिकवून त्याचा काळाबाजार न करणारा शेतकरी मला आदरणीय वाटतो.

पॅरामध्ये अशा अधिकाऱ्यांची, सैनिकांची कमतरता आहे असे नव्हे !

आज दुपारी मी हेड क्वॉर्टरमध्ये माझी बदली होण्यापूर्वीच्या माझ्या फील्ड कंपनीत गेलो होतो. आघाडीवर जाण्याची अचानक आज्ञा आल्याने सगळीकडे एकच गडबड उडाली होती.

माझ्याबरोबरचे कॅप्टन माथूर, कॅप्टन कौल, लेफ्टनंट रल्हन, सामान किटबॅगमध्ये भरण्याच्या कामात गुंतले होते. तरुण अधिकाऱ्यांचा उत्साह ओसंडून चालला होता. काही अबोल

झाले होते. कॅप्टन शर्मा आपल्या आईला घाईघाईने पत्र लिहीत होता.

मी त्याच्या खोलीत पोहोचलो तसा तो एकदम म्हणाला, "ओ हो दोस्त, येतो आहेस ना आमच्याबरोबर!"

मी बोललो नाही. माझी बदली हेड क्वार्टर्सला झाल्याने माझी आजची भूमिका केवळ प्रेक्षकाची होती. आज मी ह्या साऱ्या उत्साहापासून अलिप्त होतो. कां कुणास ठाऊक, मला वाटले, मी जात नाही हे बरे आहे!

गेल्या खेपी कच्छच्या आघाडीवर जायचा हुकूम आला तेव्हा माझी मनःस्थिती अगदी वेगळी होती. इतरांपेक्षा मलाच सीमेवर जाण्याची अधिक उत्सुकता होती.

कच्छच्या लढाईत कॅप्टन शर्मा माझ्याबरोबरच होता. आमचं आर्टिलरीचं युनिट! पहिल्याच दिवशी मला आठवतं, रात्री दहा वाजता शत्रूपक्षाकडून भडिमारास सुरुवात झाली. आवाजानं कानठळ्या बसल्या. कान आणि त्यामागून डोकं सुन्न झालं. पाक तोफांचे गोळे आमच्यासमोर आदळू लागले. वाळू उंच उडे आणि काहीही दिसेनासं होई. आणि त्या स्थितीतही माझ्या लक्षात आलं की गोलंदाजी काही विलक्षण आहे. प्रत्येक गोळा पहिल्या गोळ्यापासून एका ठराविक अंतरावर, अत्यंत शिस्तबद्ध आणि सुसूत्र पडतो आहे. ही काही सहज साधणारी गोष्ट नाही.

मला कौतुक वाटलं!

तेवढ्यात आम्हाला फायरिंगची ऑर्डर मिळाली. इतका वेळ शिवशिवणाऱ्या तोफा आणि आमचे हात कामास लागले. मनात राग कोंदटला होता. आमच्या तोफांचे आवाज सुरू झाले तशी लढाई डोक्यांत चढली. तोफांच्या नळ्या तापून विस्तवासारख्या गरम झाल्या. पण 'फायर' 'फायर' ह्या व्यतिरिक्त आमच्या तोंडी शब्द नव्हता.

आता विचार करतो तसं आठवतं. त्यावेळी 'आत्मबलिदान', 'देशासाठी त्याग' असले काही शब्द स्मरत नव्हते. नेत्यांच्या भाषणात ह्याचे उल्लेख असतात. सैनिकाला एवढीच जाणीव उरलेली असते की शत्रूला आपण मारले नाही तर आपल्याला तो मारणार आहे. स्वतः जगण्याकरिता शत्रूला मारणे हा एवढा एकच मार्ग तेथे उरतो.

नेमकी तारीख लक्षात आहे – ३० जून! शस्त्रसंधी झाला. आणि मग प्रश्न पडला, एवढा सगळा खटाटोप केलाच कशाला? नाटकात लोक काम करतात, नाटकातल्या शत्रूशी लढतात, पत्नीवर प्रेम करतात, कुणावर सूड घेतात, कुणी जिंकतो, कुणी हरतो. नाटक संपते आणि प्रेम संपते, भांडण संपते. शत्रूबरोबरचे शत्रुत्व संपते. सारी माणसे गुण्यागोविंदाने परततात.

युद्धात मात्र ते घडत नाही. आघाडीवर जाताना तुमच्याच शेजारी बसलेला अधिकारी, लढाईत भावाचं नातं निर्माण झालेला तुमचा सहकारी, तुम्ही परतत असताना तुमच्याबरोबर नसतो. कच्छच्या वाळवंटात त्याचा छिन्नविच्छिन्न देह कुठं गाडला गेलेला असतो हेही तुम्हाला समजत नाही.

Yes! It's a part of tho game!

साऱ्या आठवणींनी मन विषण्ण झालं. आज आघाडीवर गेलेल्या माझ्या सहकाऱ्यांपैकी किती परततील ह्या विचाराने मी काहीसा अस्वस्थ झालो.

हाजीपीर पास सर करणाऱ्या मेजर दयाळांचे शब्द आठवले, "हाजीपीर पास घेणे एक वेळ सोपे; पण जिंकलेला पास राजकीय कारणाकरिता, फुकाफुकी खाली करून शत्रूच्या हवाली करण्याकरिता आपल्या जवानांची समजूत काढणे फार कठीण."

कसेही असो, मी मागे राहिलो आहे हेच ठीक असे मला वाटले. सुखासुखी हा जीव कशाला धोक्यात घाला. युद्धे ही होतच रहाणार आहेत.

–घड्याळात तीनचे ठोके पडले. त्यानंतर अंधारातून घंटेचे तीन टोले ऐकू आले. मी खोलीत येऊन बिछान्यावर लवंडलो. डोळे आता जड झाले होते. झोपेने ग्लानी आली होती.

इतक्यात सेंट्रीच्या बुटांचा खाड्खाड् आवाज माझ्या दिशेने येऊ लागला. कुणाचा तरी सिग्नल असणार. तो सकाळ-पर्यंत थांबू शकतो का रात्रीच डिस्पॅचर पाठवून पोहोचता करावा लागणार हे पहायचं होतं.

सिग्नल कमांडरच्या नावे आला होता. ती दिल्लीहून आलेली ऑर्डर होती–

सकाळी नऊ वाजता मला दिल्लीला आर्मी हेडक्वॉर्टर्समध्ये रिपोर्ट करायला पाठवून देण्याबद्दलची !

☆ ☆





अनुक्रमणिका




राजकीय कुस्त्यांची विराट दंगल!






शी परदेशी मल्लांचे निकाली सामने!






# फ्री स्टाईल विरुध्द इंडियन स्टाइ



## 'एकीबेकी' कुस्ती




## पैचदार कुस्त्यांची प्रचंड लढत!!

शेवटी कुस्ती न खेळताच विजयी!!!

रुस्तुमे-हिंद झिंदाबाद!!





# [ २ ]

भले मोठे पॅकेट विमान दिल्लीच्या दिशेने उडत होते. ज्यात दोन जीप्स् मावतात, त्या विमानात मी एकटाच बसलो होतो. कापडाच्या सीटवर झोपता येणे अशक्य होते, म्हणून अवघडून बसण्यावांचून गत्यंतर नव्हते.

स्वार्डन लीडर डिमूझा कोरियर सर्व्हिसकरिता दिल्लीला निघाले होते. केवळ सुदैव म्हणन मला 'लिफ्ट' मिळाली.

आज काही विमानातून उडी मारायची नव्हती. त्यामुळे पॅराशूटचे पाठीवर ओझे नव्हते. डोक्यावर जड हेल्मेट नव्हते. खिडकीतून खाली दिसणारे दृश्य मी पहात बसलो होतो.

विमानातून हिमालय मोठा सुरेख दिसतो. कल्पनेला घेऊन मी बागडोगरास विमानाने आणि तेथून पुढे स्पेशल टॅक्सीने दार्जीलिंगला जायचे ठरवले होते. हनीमूनसाठी दार्जीलिंगसारखी 'रोमँटीक' जागा नाही. पहाटे उठावे आणि बर्च हिलवर शेर्पा पॉईंटला जाऊन कांचनगंगाची सोनेरी शिखरे उगवत्या सूर्याबरोबर पहावीत. आजूबाजूला रम्य निसर्ग आणि सोबत कल्पना! कल्पना खरोखरच सुंदर होती. विलक्षण सुंदर होती.

"अहो, दिल्ली आली. उठा आता!" नेव्हिगेटर वर्मानं मला हालवून जागं केलं आणि बेल्ट बांधायला सांगितला. विमान दिल्लीच्या विमानतळावर उतरत होतं.

ठीक नऊ वाजता मी कर्नल नायर ह्यांच्या खोलीत प्रवेश केला. आर्मी हेड क्वॉर्टर्समधली ही खोली सैन्यातल्या अधिकाऱ्याच्या ऑफिससारखीच होती. टेबलवर हिरवा उलनचा टेबलक्लॉथ, भिंतीवर चार्टस्, नकाशे!

कर्नल नायर माझीच वाट पहात असावेत. त्यांची उंची जेमतेम पाच फूट चार इंच होती. वर्ण — दूध कमी पडलेल्या मद्रासी कॉफीसारखा. डोळे काहीसे प्रमाणापेक्षा मोठे. ओठ जाडे. चेहऱ्यावर स्मित! मला वाटले, हा माणूस सैन्यात अधिकारी व्हायच्या ऐवजी लाईफ इन्शुअरन्समध्ये जनता संपर्क अधिकारी व्हायला हवा होता.

त्यांनी मला सिगरेट दिली. स्वतःची शिलगावली, आणि ते म्हणाले, "आज सकाळचे पेपर्स पाहिलेस? रेडिओवर न्यूज ऐकलीस?"

— मी विमानातून उतरून तडक इकडे आलो होतो. रेडिओ ऐकायला किंवा पेपर्स पहायला फुरसतच मिळालेली नव्हती.

कर्नल नायर म्हणाले, "फिरून त्यांनी पॅराट्रुपर्स उतरवले!"

पाकिस्ताननं पठाणकोटच्या आसपास ६२ पॅराट्रुपर्स काही दिवसांपूर्वी उतरवले होते हे मी ऐकले होते. त्यांपैकी ६१ पॅराट्रुपर्स तेथेच तावडतोब पकडण्यात आले. एक झटापटीत जखमी झाला आणि मरण पावला.

ह्या पॅराट्रुपर्सना पठाणकोटचा विमानतळ ताब्यात घेणे, तेथल्या विमानांचा नाश करणे आणि रडार यंत्रणा उध्वस्त करणे ही कामगिरी देण्यात आली होती ती पूर्ण केली असती तर पाक विमान येऊन त्यांना घेऊन गेले असते. पण त्यांचा बेत फसला. ६२ पैकी ६१ ट्रुपर्स कैदी झाले. आजूबाजूच्या जाट आणि शीख लोकांनी त्यांना हार्नेसबाहेरही येऊ दिले नाही. तेवढ्यात त्यांच्या मदतीला भारतीय सैन्यही आले!

ह्या मोहिमेच्या एवढ्या कटु अनुभवानंतर फिरून पॅराट्रुपर्स उतरविण्याचे धाडस ते करतील असे वाटत नव्हते.

काहीसे आश्चर्याने मी कर्नल नायरांना विचारले,

"कुठं उतरवले त्यांनी पॅराट्रुपर्स—?"

नायर म्हणाले, "सांगतो, पण आपण थोडं थांबू. मी इन्स्पेक्टर मेहरांची वाट पहातो आहे!"

जवळजवळ दोन मिनिटे आम्ही न बोलता स्तब्ध बसून होतो. नऊ वाजून चार मिनिटे झाली आणि इन्स्पेक्टर मेहरा आले. गृहस्थ उंच, गोरा, नाकेला होता. आत आल्यावर त्यांनी कर्नल नायरना सॅल्यूट केला आणि नायरनी दाखवलेल्या खुर्चीवर बसत ते म्हणाले, "सॉरी, जरा उशीर झाला मला!"

कर्नल नायर म्हणाले, "कामाला सुरुवात करू. थोडक्यात मी तुम्हाला ह्याची पार्श्वभूमी सांगतो.

कच्छमध्ये काही महिन्यापूर्वी झालेली लढाई पाकला वाळवंटाचा काही भाग भारतापासून मिळवायचा होता म्हणूनच केवळ झाली नव्हती. ती एक सुरुवात होती.

जामनगरला पाकचं एक कॅनबेरा विमान पाडण्यात आलं. त्याच्या डायरीतल्या एका महत्त्वाच्या पानाची ही फोटोस्टाट प्रत!"

इन्स्पेक्टर मेहरानी ती प्रत एकदा नीट पाहिली आणि माझ्या हातात दिली. वरच्या कोपऱ्यात, एप्रिल १९६५—मंगळवार दि. २० तारीख होती. त्याखाली अदमपूर, हालवारा, अंबाला, पालम, जामनगर ह्या भारतीय विमानतळावर उड्डाणे केल्याच्या खुणा होत्या. पुढचा विमानतळ आग्र्याचा होता. ही चाचणी उड्डाणे ७५० पौंडी चार बाँब आणि सात रॉकेटस् घेऊन केल्याचीही नोंद होती.












## लावणी गझल झगडा

**( हिंदी मराठी लोकगीत)**

**तो :— अब कि मान ले फाग सखीरी**
**दिल चाहे मांगना**
**ती :— जळो रे मेल्या दुष्ट तुझी वासना !**
**तो :— गले मोतियन माला, सरपर**
**ले बिंदिया अलबेली**
**ती :— नको रे तुझी पाप्याची सावली**
**तो :— चोलि बसंती पेहेनो सखीरी**
**ले साडी भर्जरी**
**ती :— अशि रे मेल्या घेणारी दूसरी**
**तो :— आवो सखीरी तुम्हे सुनावू**
**गझल-कवाली जरा**
**ती :— ऐकला का आमचा कलगीतुरा !**
**.....................**
**ती :— फक्कड बालेघाटि मराठी**
**ऐक छक्कड लावणी**
**बसला काय गझल कवालि घेऊनी**

**—सोपानदेव चौधरी**

---

"पुढे हाजीपीर पासला पकडलेल्या एका पाक सैनिका-कडून प्रश्नोत्तरात माहिती पुढे आली ती विलक्षण होती." कर्नल नायर पुढे सांगू लागले.

"मेजर जनरल अख्तर हुसेन मलिक – पाकच्या १२ व्या डिव्हिजनचे कमांडर – ह्यांच्या देखरेखीखाली मुजाहिदांचे ट्रेनिंग सुरू झाले. अवघ्या सात ते आठ आठवड्यात सैन्याचे ट्रेनिंग करून घेण्यात आले आणि तिचे नाव 'जिब्राल्टर फ़ोर्स' असे ठेवले! वरवर मुलकी लोकांच्या वाटणाऱ्या या सैन्यात व पाक सैन्यात शिक्षण, हत्यारे फार काय अधिकारी ह्यापैकी कोणत्याही दृष्टीने फरक नव्हता.

ह्या मुजाहिदानी पीर दस्तगीर साहेबाच्या उरूसाच्या निमित्ताने जमलेल्या गर्दीत मिसळून सरळ श्रीनगरमध्ये घुसायचे आणि तेथील सार्वमत आघाडीच्या साहाय्याने रेडिओ स्टेशन, विमानतळ व इतर महत्त्वाची ठाणी काबीज करायची. सीमेवर वाट पहात असलेली १२ वी पाकची डिव्हिजन काश्मीरमुक्तीची घोषणा ऐकताच, मदतीसाठी श्रीनगरमध्ये घुसेल.

पण 'ऑपरेशन इन्फील्ट्रेशन' फसले! पाकला काश्मीर प्रश्न सोडविण्यासाठी उघड उघड युद्ध पुकारण्यावांचून गत्यंतर उरले नाही.

भारत–पाक युद्ध सुरू झाले. पाकिस्तानने कित्येक दिवसां-पासून ह्या लढाईची तयारी केलेली होती. एवढे करूनही जेव्हा यश येण्याची आशा मावळत चालली तसे ते राष्ट्र वेडा धोका पत्करू लागले.

मागचे ६२ पॅराट्रुपर अशाच धोका पत्करण्याच्या दृष्टीतून उतरवले गेले.

पाक असा माथेफिरूपणा पुन्हा करील असं वाटलं नव्हतं. पण काल रात्री पुन्हा पाकचे पॅराट्रुपर दिल्ली–मीरठच्या दरम्यान उतरवण्यात आले. त्यांचा अद्याप शोध लागलेला नाही !"

कर्नल नायर बोलायचे थांबले. त्यानी दुसरी सिगारेट पेटवली आणि इन्स्पेक्टर मेहराना विचारले,

"काही नवीन वातमी ? "

"अद्याप तरी नाही. जेलमधल्या दोन पॅराट्रुपर्सचा मी जवाब घेण्यासाठी येथून परस्पर तिकडे जाईन. तेथून हरिपूरला जायचा माझा विचार आहे."

माझ्यापेक्षा त्या दोघाना ह्या प्रकरणाची अधिक माहिती होती. आणि ते बोलत होते त्या संभाषणामधले काही दुवे मला समजलेले नव्हते. कर्नल नायरांच्या ते लक्षात आले.

"एकूण किती पॅराट्रुपर उतरले हे अद्याप समजलेले नाही. पण तिघे उतरले ते नेमके हरिपूरच्या पोलिसचौकीवरच! एकाचा पाय जबर दुखावला; त्यामुळे त्याला उठता येईना. दुसरे दोघे हार्नेसबाहेर येण्यापूर्वीच पकडले गेले. त्यांच्या बरोबर पॅराड्रॉप केलेलं काही सामानही पोलिसानी हस्तगत केलं.

ठाण्यावर एक सब-इन्स्पेक्टर मुक्कामाला एका रात्री-पुरता उतरला होता. त्यानं त्या तिघाना जीपमध्ये घातलं आणि सरळ दिल्लीला आणलं. दरम्यान् आपल्या सहकाऱ्याना सोडवण्या-साठी त्या पाक सैनिकानी पोलिस ठाण्यावर हल्ला केला. ते तेथे सापडले नाहीत तसे तेथल्या दोन शिपायाना त्यानी गोळ्या घालून मारलं. चौकी पेटवून दिली."

कर्नल नायरनी इन्स्पेक्टरना विचारले

"पुढे ?"

"ह्या दोन पाक पॅराट्रुपर्सना भेटल्यावर मी आपल्याला फोन करीन, जर महत्त्वाचं काही समजलं तर–!"

"ठीक. तुम्ही हरिपूरातून मीरठला जाऊन या. तिथं कदाचित काही धागेदोरे सापडतील!" नायर म्हणाले.

इन्स्पेक्टर मेहरा उठले. कर्नल नायरांचा निरोप घेऊन निघून गेले.

मी विचार करत होतो. हे पॅरा-कमांडो कुठंही लपलेले असोत, दिल्लीसारख्या राजधानीपासून काही मैलांवरच त्यानी रहाणं धोक्याचं होतं. अतिशय धोक्याचं होतं! हे जीवावर उदार











अनुक्रमणिका

झालेले लोक काहीही करण्याची शक्यता होती. दिल्ली रेडिओ स्टेशन, पॉवर हाऊस, विमानतळ, आजूबाजूचे दारुगोळ्याचे कारखाने, महत्त्वाची नाकी ह्या साऱ्यावरचा बंदोबस्त वाढवलेला असणार. राष्ट्रपती, पंतप्रधान, संरक्षणमंत्री ह्यांच्या शरीररक्षकात वाढ केलेली असणार आणि केवळ ह्या पॅरा–कमांडोंच्या भीती-पोटी एवढं मोठं मनुष्यबळ बेमुदत गुंतवून ठेवणं अशक्य आहे हे माझ्या लक्षात आलं. पण ह्याबाबतीत मी काय करू शकत होतो ?

माझा प्रश्न ओळखल्यासारखे कर्नल नायर मला म्हणाले,

"तू स्वतः कमांडो कोर्स पूर्ण केला आहेस. तू ह्या पाक कमांडोना शोधून काढू शकशील !"

"मी–?" आश्चर्यचकित होऊन मी विचारले.

"होय! " नायरनी तितक्याच शांतपणे मला सांगितले.

मला हे सारंच असंभाव्य वाटू लागलं. आर्मी हेड-क्वॉर्टर्सला माणूस गेला की त्याच्या डोक्यात अनेक अफलातून कल्पना निघतात हे मी ऐकलं होतं. पण आजचा हा प्रकार विलक्षणच होता.

मी म्हणालो, "पण हे काम सिक्यूरीटी पोलिस करू शक-तील. सी. आय्. डी ब्रँच त्याकरिताच आहे. फार काय आर्मी इंटेलिजन्सदेखील तुम्हाला मदत करू शकेल."

"ते सर्वच ह्या प्रयत्नात आहेत. आणि अद्यापपर्यंत काहीच पत्ता लागलेला नाही. मला वाटतं तूही ह्या प्रयत्नात सहभागी व्हावंस !"

मी काहीच बोललो नाही. ह्या पॅराट्रूपर्सचा शोध करायचा म्हणजे गवतात पडलेल्या सुया शोधण्याचाच प्रकार ! हे काही पॅरा–अधिकाऱ्याचे काम नाही. संध्याकाळी चार वाजता निघ-णाऱ्या कोरियर सर्व्हिसने हेड-क्वॉर्टर्सला परतण्याचा मी विचार करू लागलो.

कर्नल नायर म्हणाले, "मागील खेपी पॅराट्रूपर्स सापडले ते तेथील नागरिकांच्या सहकार्यामुळे ! येथे परिस्थिती वेगळी आहे. खुद्द दिल्लीत असे काही लोक आहेत की पाकची विमाने आली की रात्री ब्लॅकआऊट असताही घरावर दिवाळीसारखे दिवे पेटवतात. दिल्लीचा ठिकाणा वैमानिकांच्या सहज लक्षात यावा म्हणून ही आरास करतात.

अद्याप ज्या अर्थी पॅराट्रूपर्स सापडलेले नाहीत, त्याअर्थी पुढेही ते सापडणे कठीण आहे. केवळ पोलिसांच्या हातून हे काम होईल असं मला वाटत नाही.

तू प्रथम किती पॅराट्रूपर्स उतरले आहेत हे शोधून काढावंस. त्याना कोणती कामगिरी दिली आहे, ती ते कसे पार पाडणार आहेत, हेही शोधावं लागेल. आणि काही घोटाळा होण्यापूर्वी त्याना पकडावं लागेल !"

मला आता ह्या सर्वांचाच कंटाळा आला होता. मी म्हणालो, "माफ करा. मला वाटतं ह्याबाबतीत मी काही करू शकणार नाही. हे काम पोलिसांचं आहे!"

" Damn it ! कर्नल नायर म्हणाले, " तू काय सेवा-दलाचा स्वयंसेवक म्हणून इथं आला आहेस? इच्छाअनिच्छेचा इथं प्रश्न नाही. आज्ञा आहे ही ! समजलं ! "

मला आवडलं. नायर आता सैन्यातल्या अधिकाऱ्यासारखं बोलत होते. त्यांच्या जागी मी असतो तर मीही हेच केलं असतं. युद्धात आवडनिवड विचारायला वेळ असतोच कुणाला? ही गोष्ट करायची आहे आणि ती झालीच पाहिजे– ही सैन्यातली शिस्त !

" हे पहा, पाक पॅराट्रुपर्स उतरल्यापासून येथील रेडिओ स्टेशन, विमानतळ, वीजेचे केंद्र आणि महत्त्वाच्या ठिकाणांचा बंदोवस्त मी तिपटीने वाढवला आहे. पण जीवावर उदार होऊन शत्रूच्या प्रदेशात उतरलेले पाक सैनिक काहीही करण्याची शक्यता आहे. आणि उद्या जर काही भलते घडेल तर, दिल्लीत, भारताच्या राजधानीत पाक सैनिक हे करू शकतात ह्या जाणीवेने साऱ्या देशातल्या लोकांचे मनोधैर्य खचेल. खुद्द दिल्लीत पळापळ सुरू होईल. आणि सैन्याच्या हालचाली होणं मुश्कील होईल, आघाडीवरचे कार्यक्रम फसतील ! "

कर्नल नायर ह्यांच्यासमोरचा प्रश्न त्यातल्या गुंतागुंतीसह प्रथमच माझ्यासमोर स्पष्ट झाला.

कर्नल नायर उठले, तसा मीही उठलो. म्हणालो, " एकच प्रश्न विचारायचा होता. "

" बोल ! "

" तुम्ही नेमके मलाच कां ह्या कामासाठी वेचून काढले आहे ? "

नायर हसले आणि म्हणाले, " तीन कारणांमुळे – एक तर तू पॅरा-कमांडो आहेस. त्यांच्या मनात काय चालले आहे, हे तू इतरांपेक्षा जास्त सहजतेने शोधून काढशील. कमांडोंची काम करण्याची पद्धती तुझ्या माहितीची आहे. त्याचाही तुला फायदा होईल. दुसरे – कच्छमधील तुझे वॉर रेकॉर्ड मी पाहिले त्यावर Excellent ' असा शेरा आहे. तसाच तुझ्या कमांडो कोर्सचा निकालही उत्तम आहे !

" आणि तिसरं कारण–? "

" ते माझं रहस्य अहे. पण सांगू ? – तुझं नाव 'एन' ह्या अक्षराने सुरू होतं. त्या अक्षराने सुरू होणाऱ्या नावाची माणसे त्यांच्यावर टाकलेली कामगिरी पूर्ण करतील असा मला विश्वास वाटतो ! "

" थँक यू ! " मी डोक्यावर कॅप नसल्याने सॅल्यूटऐवजी अटेन्शनमध्ये आलो.

" आता हे कपडे काढून टाक. त्याना शोधण्यास गणवेशाऐवजी सिव्हिल कपडे अधिक उपयोगी पडतील. Now you are on your own. Best Luck ! मी खोलीबाहेर पडलो.

☆ ☆



## [ ३ ]

" ओ हो, तू इकडं कसा काय ? "

मला पहाताच वत्रा आश्चर्यानं उद्गारला. वत्रा आमचा सीनियर मेडिकल ऑफिसर. आम्ही त्याला सरप्लस मेडिकल ऑफिसर म्हणत असू. औषधाच्या ऐवजी वत्राच्या बोलण्यानंच पेशंट बरा व्हायचा. ह्या गोलगरगरीत शरीराच्या डॉक्टरचे ध्येय, " अच्छा खाओ और अच्छा पहनो " हे होते. स्वारी सैन्यात दाखल झाली आणि खाणे आणि पहनने ह्यावरोबरच 'पिणे'ही आले ! मोठा दिलवाला माणूस ! आग्र्याहून दिल्लीला ह्याची बदली झाली तेव्हा मेडिकल कंपनीत त्याला दिलेल्या पार्टीला मी हजर होतो. आम्ही त्याला एक बाटली व्हिस्की पाजली त्या रात्री. पण एक शब्द हा अडखळला नाही की पाऊल वाकडे पडले नाही.

" आणि हे काय, मुफ्तीमध्ये कसा काय तू ? . . . का रजेवर ?

" रजा विसरा आता. सध्या लढाई चालू आहे ! "

" Damn it. अरे माझ्याकडं सोपवा काश्मीरचा प्रश्न ! पहा एक वर्षभरात सोडवून टाकतो. आपल्या सैन्यातल्या सगळ्या रिटायर्ड जवानाना घुसवलं असतं काश्मीरमध्ये ! निर्वासित आणि सीमेवरचे पंजाबीही ! वर्षभरात सार्वमत घेऊन काश्मीर भारताचेच आहे हे सिद्ध करून दिलं असतं मिस्टर आयूबखानना !

" छोड दो यार ! आज संध्याकाळी मेसवर ये. माझ्याबरोबर जरा व्हिस्की चढव. फार दिवसात मजा आला नाही – इथं ! "

" वत्रा, एक काम होतं ! "

" बोला सरकार ! "– वत्रा पंजाबचा, पण एकूण थाट खास लखनवी. मिजास उत्तर प्रदेशचा !

" आज पहाटे एका पाक पॅरा ऑफिसरला इथं ॲडमिट् केल्याचं ऐकलं. त्याना भेटायचं होतं. "

इतका वेळ मजेत गप्पा मारणारा वत्रा एकदम गंभीर झाला. रुक्ष आवाजात म्हणाला, " सॉरी, तेवढं सांगू नकोस ! "

अनुक्रमणिका

"बत्रा, मी ड्यूटीवर आहे !"

"असशील, पण मला परवानगी नाही."

"पण कां ?"

"त्याला इथं आणायच्या अगोदरच 'टाईम,' 'न्यूजवीक'चे अमेरिकन वार्ताहर पोहोचले होते त्यांच्या कॅमेऱ्यासह ! झाला तेवढा गोंधळ पुरे. आता कुणालाही भेटायची परवानगी नाही."

"डॉक्टरानाही ?"

"तू काय डॉक्टर दिसणार आहेस ? तुला कम्पाऊंडर म्हणूनही कोणी मान्य करणार नाही !"

"बत्रा, काहीही कर मला भेटलंच पाहिजे !"

"सॉरी !"

"आर्मी हेड-क्वॉर्टर्सची परवानगी आहे !"

"लेखी आहे ?"

"नाही, पण तू फोन करून विचारू शकतोस कर्नल नायरना !"

बत्रानं टेलिफोन उचलला आणि मी दिलेला नंबर फिरवला.

"नायर !" पलिकडून स्पष्ट आलेले शब्द मलाही ऐकू आले. बत्रानं मी तेथे आलो असून भेटीबद्दल परवानगी मागतो आहे म्हणून सांगितलं.

क्षणभर तिकडून काहीच उत्तर आलं नाही – मग एकदम नायरांचा आवाज ऐकू आला. "ठीक आहे ! तुम्ही त्याला भेटू द्या ह्या खेपी ! पण त्याला हेही सांगा की ही आपली टेलिफोन-वरची शेवटची भेट! ह्यापुढे फोन आला तर मी त्याला ओळखत नाही असं उत्तर मिळेल !"

मी बत्राच्या हातून फोन घेतला. "सर--" म्हणून बोलायला सुरुवात करणार इतक्यात तिकडून फोन बंद झाल्याचा आवाज आला.

बत्रा नेहमीच्याच मिस्कील डोळ्यानी मला पहात होता. थंडपणे तो म्हणाला, "बस रे ! चहा घे !"

सकाळपासून मी भटकत होतो. क्षणाची उसंत मिळालेली नव्हती. बत्रानं चहाचं नाव घेतलं तशी मला भूक लागल्याची जाणीव झाली.

"झटपट मिळेल तर घेईन."

"विसरा मिस्टर, दिल्ली आहे ही ! कोणतीही गोष्ट झटपट झाली तर राजधानीचं महत्त्व काय राहिलं ? पण थांब मी पहातो !" बत्रानं एकाला चहा आणि सँडविचेस आणायला पिटाळलं !

"एकूण तिघे होते ना ?"

"हो !"

"दुसऱ्या दोघाना पाहिलंस तू ?"

"अगदी ओझरतं. पण मला वाटतं ते नॉन्-कमिशण्ड् ऑफिसर असावेत !"

"काही बोलले ?"

"बिलकुल नाही. आणि त्याना कितपत माहिती असेल ह्याचीच मला शंका वाटते !"

"इथं असलेला पाक-पॅराट्रुपर ?"

"मला वाटतं, हा ह्या टीमचा मुख्य अधिकारी असावा! बहुतेक मेजर! सगळेच मुक्तीमध्ये. आणि कोणी बोलायला तयार नाही!"

"हा बोलण्याची शक्यता–?"

"छोडो यार, ते जमायचं नाही !"

"ह्याच्या पायाला काय झालं आहे ?"

"प्रथम वाटलं फ्रॅक्चर असावं. पण एक्स-रे काढल्यावर समजलं की नुसता लचकला आहे. बॅड लॅंडिंगचा परिणाम!"

"किती दिवस हॉस्पिटलमध्ये रहावं लागेल ?"

"निदान तीन ते चार दिवस!"

"दुसरे दोघे ?"

"ते सिव्हिल जेलमध्ये आहेत. त्याना भेटायची परवानगी मिळवता मिळवता दोन दिवस खर्ची पडतील."

"ह्या मेजरसाहेबांचं नाव–?"

"खरं माहीत नाही. पण तूर्त म्हणतात मेजर हुसेन!"

"चल ऊठ. त्याना भेटू या !"

"आणि तुझी चहा–सँडविचेस?"








"ती आल्यावर पाहू !"

"पण तू कोण म्हणून सांगायचं मेजर हुसेनना ?"

"डॉक्टर मी दिसत नाही. दुसरं कोण त्याना भेटायला येण्याची शक्यता आहे ?"

"नर्स, सिस्टर, मेट्रन !"

"हे पहा तुझे विनोद ऐकत बसायला मला वेळ नाही."

"विनोद – ? हिंदी चित्रपट पहा, कितीतरी वेळा हिरो स्त्रीच्या, आणि हिरॉईन पुरुषाच्या वेषात माहिती गोळा करताना दिसेल तुला !"

"हा काही सिनेमा नाही, तू उठतोस का आता ?"

बवा नाखुषीनं आरामात उठला. आळस देत तो सहजच म्हणाला,

"तू वृत्तपत्र वातमीदार कां होत नाहीस ?"

"तसा दिसतो मी ?"

"अगदी हुबेहूब नाही. पण चालेल!"

आम्ही दोघेही उठलो. चहा सँडविचेसचा पत्ता नव्हता. वेळेला दिल्लीत फारशी किंमत नव्हती. इथं, कुठंही गेलात तर "हां हो जाएगा!" हे आशावादी भविष्यकाळवाचक किंवा "कि फर्क पेंदा ?" हे स्थितप्रज्ञ छापाचे प्रश्नार्थक वाक्य तुम्हाला कोणत्याही कामाचे संबंधात ऐकू येईल!

मेजर हुसेन ह्याना दिलेली स्वतंत्र खोली हॉस्पिटलच्या अगदी एका बाजूस होती. तेथून कंपाऊंडची भिंत अगदी जवळ होती. बाहेरील बाजूस पहारेकरी होता. पण ही व्यवस्था मला फारशी आवडली नाही. भिंतीवरुन उडी मारुन आत येता येणं फारसं कठीण नव्हतं.

मेजर हुसेन बिछान्यात बसून नुकतेच सूप संपवत होते. त्यांच्याकडे पहाताच लक्षात आले, गृहस्थ सैन्यात बरीच वर्षे अधिकाराच्या जागेवर असावा. निश्चित कारण सांगता येणार नाही. पण वाटले ह्याने लढाई पाहिली आहे, आणि चांगला तावून सुलाखून निघालेला आहे. त्यांच्या दृष्टीत आत्मविश्वास होता.



"हे आग्र्याच्या 'इन्किलाब' वृत्तपत्राचे वार्ताहर–श्रीयुत माथूर!"

बवानं माझी ओळख करून दिली, आणि बवा बाहेर निघून गेला.

मेजर म्हणाले, 'बसा, सकाळी प्रेसचे लोक आले होते. तुम्ही नाही आलात तेव्हा?"

"त्यावेळी ट्रेनमध्ये होतो मी. दिल्लीत काही काम होतं. इथं येईपर्यंत ही खबर नव्हती मला. जशी समजली तसा तावडतोब इकडे आलो!"

"बरं झालं! नाही तरी मला काही गोष्टी सांगायच्या होत्याच !"

"बोला!" मी पेन्सिल सरसावली, पॅड उघडले.

"हे सूप एकदम बेचव होतं."

"बरं !"

"आणि हे मटणही नीट शिजलेलं नाही. भारतात ह्यापेक्षा चांगलं जेवण मिळेल अशी अपेक्षा होती !"

"मेजर साहेब आपण जे जेवताहात ते जेवणही भारतात सगळ्यांच्याच वाट्यास येत नाही!" राग न आवरून मी म्हणालो.

"अस्स्, मग मिस्टर माथूर, मग ह्या लोकांच्या पोषणाची भारत सरकारनं प्रथम व्यवस्था करावी, मग पाकिस्तानचा प्रदेश व्यापण्याचा विचार करावा असं नाही वाटत तुम्हाला ?"

युद्धकैद्याकडून माहिती काढण्याचं एक शास्त्र असतं. त्याना प्रश्न कसे विचारावेत ह्याचं शिक्षण देणारा एक कोर्स भारतीय सैनिकांसाठी चालवला जातो. दुर्दैवानं ह्या कोर्सला मी काही गेलो नव्हतो. पण गेलोही असतो तरी ह्या गृहस्थाकडून मला कितपत माहिती मिळवता आली असती ह्याची शंकाच होती.

जिनेव्हा नियमानुसार युद्धकैद्यास आपले नाव, हुद्दा, जन्मतारीख आणि सर्व्हिस नंबर द्यावा लागतो. त्यापलिकडे काहीही सांगण्याची त्यांच्यावर जबाबदारी नसते. पण हे झाले गणवेशात पकडलेल्या युद्ध कैद्याविषयी! मुजाहिदांच्या वेषात भारतात प्रवेश करणाऱ्या पाक अधिकाऱ्याकरिता वेगळे नियम करावे लागतील.

ह्याना अधिक प्रश्न विचारून माहिती मिळण्याची शक्यता नव्हती. मी उठलो. मेजरसाहेब म्हणाले, "कां काय झालं ?"

"काही नाही. मला वाटलं तुम्ही दुसरं काही सांगाल–"

"उदाहरणार्थ ?"

"तुम्ही इथे कसे आलात !"

"विचारा ना असं !" त्यांच्या स्मितामागे मला खिजवण्याची छटा होती.

"निव्वळ फसवणूक! वैमानिकानं सांगितलं आम्हाला की विमान पडणार. आम्ही उड्या मारल्या. विमान पडलंच नाही!"

मी वही बंद केली आणि निघालो.

दाराजवळ पोहोचलो तसे मेजरसाहेब एकदम म्हणाले,






"थांबा, प्रेस रिपोर्टर म्हणून तुम्ही आलात तर निदान तसे दिसण्याची तरी काळजी घ्यायची! एवढ्या घाईत आलेल्या वार्ताहराचे बूट एवढे चकाकत असण्याची शक्यता कमी ! आणि तुमचे चालणे बोलणे थेट सैन्यातल्या अधिकाऱ्यासारखे दिसते!

पण जर प्रेस रिपोर्टर असलातच, तर हे लिहून घ्या, आणि हिम्मत असेल तर तुमच्या पेपरमध्ये छापून आणा.

सहिष्णुता, सौजन्य आणि पंचशीलाच्या गप्पा मारणाऱ्या भारतानं पंधरा वर्षांपूर्वी दिलेलं, काश्मीरात सार्वमत घेण्याचं वचन अद्यापही पाळावं.

जर येथे न्यायाची काही चाड होती तर काश्मीरच्या हिंदू राजाला भारतात सामील होण्याचा दिलेला अधिकार, जुनागडच्या नबाबाना आणि हैदराबादच्या निझामालाही द्यायचा होता.

–लिहाल का हे ?"

मेजर हुसेन एकदम बोलायचे थांबले. मी खोलीबाहेर पडलो. बाहेर डॉक्टर बत्रा उभा होता. तो म्हणाला, "तरी मी तुला सांगितलं होतं की काही उपयोग व्हायचा नाही!"

मी बोललो नाही. आम्ही दोघे बत्राच्या खोलीत पोहोचलो. मी बत्राला विचारले, "माझं एक काम करशील ?"

"बोल–!"

"मला ह्या पॅराट्रुपरबरोबर काय सामान पकडण्यात आलं हे पहायचंय्!"

"कठीण आहे. कर्नल नायरना फोन केलास तर !"

"तू काय करतोस ते सांग–!"

"काम मुश्कील आहे. पण मी एक करू शकेन. ह्या सामानाची यादी मी मिळवू शकेन. चालेल?"

"चालेल!"

बत्रानं टेलिफोन उचलला. मी सँडविचेसवर तुटून पडलो. बत्रा फोनवर बोलत होता. एका अधिकाऱ्याकडून दुसऱ्याकडे, दुसऱ्याकडून तिसऱ्याशी ! त्याला हवी असलेली माहिती मिळणे कठीण दिसले. मी सँडविचेस संपवली. बत्रा टेलिफोनवर सांगितलेली माहिती उतरवून घेत होता.

थंड झालेला चहा मी घशाखाली ढकलला, तशी बत्रानं माझ्यासमोर यादी टाकली. आणि माझे डोळे विस्फारले.

इतर अनेक गोष्टीत फक्त दोन गोष्टींनी माझे लक्ष वेधून घेतले–

१) दहा आणि शंभराच्या भारतीय चलनातील वीस हजार रुपये रोख.

२) हाय एक्सप्लोसिव्ह दारुगोळा.

ह्या दारुगोळ्यापुढे लिहिलेला साठा भारताचे अर्धेअधिक पार्लमेंट हाऊस उडवून द्यायलाही पुरेसा होता.

☆☆



## [ ४ ]

बस डांबरी रस्त्यावरून वेगाने धावत होती. हा वेग आणि खिडकीतून येणारा गार वारा मला गुंगी आणत होता. डोळे मिटू लागले होते. मला झोपायचे नव्हते. मी झोप जावी म्हणून दिल्लीच्या बस स्टॅंडवर घेतलेला 'टाईम'चा ताजा अंक मी उघडला.

भारत पाक युद्धावर टाईमचे तीन कॉलम खर्ची पडले होते. खुसखुशीत पण बोचकारणाऱ्या शब्दात लढाईचा वृत्तांत देता देता भारताला कोपरखळ्या दिल्या होत्या.

लाहोरजवळ, भारतीय विमाने बॉंब-वर्षाव करण्याकरिता आली तेव्हा नुकतीच ज्याची आई बॉंब वर्षावात मेली आहे, असा दहा–बारा वर्षांचा मुलगा धावत रस्त्यावर आला. भारतीय विमानांकडे पाहून ओरडला, "Bastards, they came again to kill us !"

'टाईम'सारख्या विख्यात आंतरराष्ट्रीय वृत्तसाप्ताहिकाने दहा–बारा वर्षांच्या मुलाचे हे वाक्य आणि असा प्रसंग द्यावा हे विचित्र आहे.

कारण अमेरिकन विमानाना पाहून उत्तर व्हिएतनाममधील मुले ह्यापेक्षा वेगळे काय म्हणत असतील ?

पण असे एकांगी, काहीसे पूर्वग्रहदूषित 'टाईम' वाचावेसे वाटते ते त्यांच्या बातमीदारांच्या विलक्षण धडाडीमुळे ! हे बातमीदार भारत-पाक दोन्ही बाजूने अगदी सीमा रेषेपर्यंत जाऊन तेथील परिस्थिती स्वतः पाहून, अनुभवून, लिहितात आणि अत्यंत दुर्मिळ असे फोटो टिपतात. आपले पत्रकार धडाडीचे नाहीत असे नाही. पण त्यांच्या जीवाची काळजी वाहणारे आपले सरकार त्याना पुढे जाऊ देत नाही, आणि सरकारची आज्ञा मोडून हे भारतीय आज्ञाधारक नागरिक पुढे जाणार तरी कसे? तेव्हा भारतातील वृत्तपत्रातील बातम्या, प्रत्यक्ष परिस्थितीऐवजी सरकारने पुरवलेल्या पत्रकातील माहितीनुसार छापलेल्या असतात !

मुरादाबाद आले. स्टॅंडवर उतरून मी कुल्हडमधून गरम गरम चहा घेतला. संध्याकाळ झाली होती. हवेतील थंडी वाढू लागली होती. त्या वाफाळणाऱ्या चहाने मला काहीशी तरतरी आणली.









फिरून प्रवास सुरू झाला. ताजातवाना होऊन मी परत त्या पॅराट्रुपर्सचा विचार करू लागलो. मुख्य प्रश्न होता– त्यांचे संभाव्य लक्ष्य कोणते असेल हा!

मागे त्यानी ६२ पॅराट्रुपर उतरवले होते आणि तेवढ्यावर पठाणकोटचा विमानतळ काबीज करावा, तेथली विमाने उध्वस्त करावीत, रडार यंत्रणा उखडून टाकावी हे लक्ष्य त्याना सांगितले होते. भोवतालच्या जनतेने पाठिंबा दिला असता तर ते काम अवघड असले तरी अशक्य खासच नव्हते. पण एकंदर योजना धाडसाचीच होती.

आता माझ्या अंदाजाप्रमाणे ते इतक्या मोठ्या संख्येने पॅराट्रुपर्स उतरविण्याची शक्यता कमी होती. आम्ही वापरत असलेल्या पॅकेट विमानातून साधारण ४० सैनिक उतरवता येतात. पॅकेटपेक्षा पाकचे सी–११३ विमान मोठे! साठापर्यंत पॅराट्रुपर्स एका वेळी ते उतरवू शकते.

पण ही साठ माणसे भारतीय हद्दीत लपवणे कठीण! कधी कधी स्टँडिंग पेट्रोल म्हणून प्रथम एखादे प्लॅटून उतरवले जाते आणि त्यामागून पॅराट्रुपर्सचा मोठा फोर्स उतरवला जातो. अशा एअरबोर्न ऑपरेशनसाठी आवश्यक असलेली सामुग्री आणि सैनिक पाककडे असले तरी तशा ऑपरेशनची शक्यता मला जवळ जवळ असंभाव्यच वाटली. एक तर अशा पॅराट्रुपर्सना कमीत कमी वेळात मुख्य सैन्याशी संपर्क साधावा लागतो. पाक सीमा तशी येथून बरीच दूर होती. त्यामुळे एअरबोर्न ऑपरेशनसाठी सैनिक उतरण्याकरिता दिल्ली मीरठ ही जागा निवडली जाणार नाही.

जेवढा मी अधिक विचार करू लागलो तसे वाटू लागले की मंडळी दहापेक्षा जास्त नसावीत–आणि त्यांना सांगितलेली कामगिरी हेरगिरी अथवा घातपाताची कृत्ये अशा स्वरूपाचीच असावी.

हेरगिरीची शक्यता फारशी नाही. तेव्हा राहिली शक्यता ती घातपाती कृत्यांची! त्यांच्याकडे सापडलेला दारूगोळा हा त्याचकरिता होता ह्याची मला शंका नव्हती. फक्त त्यांचे लक्ष्य निश्चित कोणते असावे ह्याचा अंदाज बांधता येईना.

त्यांच्या जागी मी असतो तर काय केले असते, असा उलटा विचार मी करू लागलो. नको असलेली व्यक्ती झटपट निकालात काढायचे शिक्षण कमांडोना दिलेले असते. राजकीय पुढारी, राष्ट्राचे नेते, सैन्यातील वरिष्ठ अधिकारी?——

पण ह्यामुळे भारतीय सैनिकांचा त्वेष वाढेल. देशभर पाकविरोधी भावनेची एक प्रचंड लाट उठेल. अशी काही घटना राष्ट्र अधिकच एकसंध बनेल आणि सैन्याच्या पाठीशी उभे राहील. सैन्याच्या वरिष्ठाना नाहीसे करण्याने थोडीशी खीळ बसेल हे खरे, पण अनुभवी, तत्पर वरिष्ठांची भारतीय सैन्यात वाण नाही.

दिल्लीचे रेडिओ स्टेशन उध्वस्त झाले तर जवळचे कोणतेही रेडिओ स्टेशन पर्यायी स्टेशन म्हणून वापरता येईल.

दिल्लीचा विमानतळ काबीज केला तरी ती राखता येणे कठीण आणि शत्रू प्रदेशावर हल्ला करणारी विमाने काही दिल्ली विमानतळावरून निघत नाहीत. तेव्हा तीही शक्यता निकालात निघाली.

गाडीचा वेग मंदावला. पिवळ्या धमक फुलानी डंवरलेली सरसांची शेते आता अंधारात अस्पष्ट होऊ लागली. दूरवर हरिपूरचे दिवे दिसू लागले.

हरिपुरात कुठं उतरायचं, कसा शोध घ्यायचा हे मी अद्याप काहीच ठरवू शकलो नव्हतो. फिरून कर्नल नायरांची आठवण झाली. अजूनी मला वाटते, त्यानी हे काम माझ्याकडे सोपवण्यात चूक केली. हव्या असलेल्या व्यक्तींचा शोध घेणे हे काम पोलिसांचे, गुप्त हेर खात्याचे! उद्या त्यांच्यातला कोणी पोलीस पॅराट्रुपर म्हणून शत्रूच्या प्रदेशात उतरला तर त्याच्याकडून काम पुरे होण्याची जितकी शक्यता कमी, तितकीच माझ्याही बाबतीत! पण कधी कधी अशा असंभाव्य, काहीशा तर्कदृष्ट्या विसंगत गोष्टीच अशा विचित्र स्थितीत उपयोगात ठरतात. काहीही असो. आता मला ह्या पॅराट्रुपरचा शोध करण्यावांचून गत्यंतर नव्हते.

हरिपूर स्टँडवर गाडी थांबली. बहुतेक उतारू मीरठचे होते. एक दोघेच उतरले, त्यांच्या मागोमाग मी उतरलो. स्टँडवर फारशी गर्दी नव्हती. मला आजूबाजूला नीट पहाता यावे म्हणून वेळ काढण्याकरिता मी समोरच्या दिसणाऱ्या पानपट्टीच्या दुकानाकडे वळलो.

त्याच्याकडे गोल्डफ्लेक्स नव्हती. मी विल्स घेतली. पैसे देत होतो तोवर पाठीवर थाप बसली.

"काय माथूर, कुठं पत्ता आहे ?" कुणी मला विचारत होतं.

मी मागं वळून पाहिलं. हसऱ्या चेहऱ्याचा, तिशीच्या आतबाहेरचा एक तरुण माझ्या मागे उभा होता. मला आश्चर्य वाटलं. माथूर असं माझं खोटं नाव. बन्नानं मेजर हुसेनशी ओळख करून देताना सांगितलं होतं. तेच नेमकं इथं ऐकू यावं हा केवळ योगायोग की त्यामागे काही योजना होती. मी मागं वळलो आणि माझा चेहरा पहाताच त्या तरुणाचा चेहरा ओशाळला. दिलगिरीनं तो म्हणाला.

"माफ करा हं, तुम्ही मागून हुबेहूब माथूरसारखे दिसता!"

त्याचा आवाज भावुक होता. डोक्याचे केस थोडे विरळ होऊ लागले होते. त्यामुळे तो थोडा मोठा वाटत होता. एरवी तो भावुक आवाज, बोलके डोळे आणि सडपातळ पण भरलेली अंगलट ह्यामुळे तो नुकताच कॉलेजबाहेर पडलेला तरुण वाटला असता. कां कुणास ठावूक मला हा माणूस आवडला. नुकतेच घेतलेले पाकीट त्याच्यापुढे धरत मी म्हणालो, "सिगरेट !"

"थँक्स" म्हणत त्यानं एक सिगरेट घेतली. आम्ही सिगरेटी पेटवल्या.

"थंडी आहे हवेत !" हा तरुण म्हणाला.

"चला चहा घेऊ या!" मी हो नाही म्हणायची वाटही न पहाता त्यानं मला शेजारच्या हॉटेलकडं नेलं. हॉटेल म्हणजे एक तट्ट्याचं खोपट होतं. बाहेरील बाजूस चार बाकं टाकली होती. त्यातल्या साधारण एका बाजूच्या बाकावर आम्ही बसलो.

"मी इथं महिन्यातून एक वेळ येतो. ब्रूक बाँड चहाचा मी इन्स्पेक्टर आहे. येथल्या दुकानाना मालाचा वेळेवर पुरवठा होतो










camel
deluxe ink
ROYAL BLUE

की नाही त्यांच्या काही अडचणी आहेत काय हे पहाण्याचं काम माझ्याकडे आहे."

आणि त्यानं सहजच प्रश्न केला, "आपण इकडं कसे काय?"

एवढयात चहा आला, मला विचार करायला काही सेकंद मिळाले. चहाचा कप उचलत मी म्हणालो, "येथल्या सहकारी सोसायटीनं ट्रॅक्टर घेण्यासाठी कर्जाकरिता अर्ज केला आहे. त्या संबंधात मी आलो होतो!"

बोलून गेलो खरा, पण लगेच लक्षात आलं की थाप काही चपखल बसली नाही. पण उगाच वेळ काढला असता तर तेही संशयास्पद दिसलं असतं. खोटं बोलणं ही एक मोठी अवघड कला आहे. आणि ज्या इतर अनेक विचित्र गोष्टी पॅराट्रुपरला शिकवल्या जातात त्यात ही कलाही शिकवली पाहिजे, असं मला वाटलं.

तो तरुण हसत म्हणाला, "अहो कमाल आहे तुमची. सहकारी सोसायटीला नाही का पत्र पाठवायचं? ते आनंदानं आले असते तुम्हाला उतरवून घ्यायला!"

मी काही बोललो नाही. चहाचा कप तोंडाला लावला आणि प्रश्नाचं उत्तर टाळलं.

आमच्या चहाचे पैसे तत्परतेनं ह्या तरुणानं दिले. दहाच्या नोटेची मोड नसल्यानं दुकानदार मोड आणायला गेला. दुकानात आम्ही दोघेच उरलो.



आजुबाजूला पहात तो तरुण सावधगिरीच्या शब्दात म्हणाला, "पाखरं उडाली!"

"कोणती पाखरं?"

"ज्यांच्या शोधासाठी तुम्ही आलात ती मीरठला गेली."

"कुणी सांगितलं तुम्हाला?"

"तुम्हाला ज्यानी इथं पाठवलं त्यानीच!"

मी बोललो नाही. ह्याच्यावर विश्वास ठेवावा की न ठेवावा ह्याचा विचार करत गप्पच राहिलो.

"सात पॅराशूटस् पोलिसाना सापडली. पकडली गेलेली तीन माणसे धरून एकूण दहाजण होते ते!"

"तुम्ही . . . तुम्ही कोण?"

"मी यश चौधरी! दिल्ली गुप्त हेर खात्यात काम करतो मी! बाकीचे पोलीस मीरठला रवाना झाले. तुमची खेप उगाचच झाली!"

दुकानदार मोड घेऊन आला. आम्ही दोघे दुकानातून उठलो.

सिगरेट शिलगावत मी म्हणालो,

"चालत रहा. रस्त्यात बोलू आपण!"

हरिपूर गाव तसं लहान नव्हतं. बहुतेक वस्ती इथे मुसलमान असावी हे गावच्या तोंडावळ्यावरून ओळखता येत होतं. मोटार-स्टॅण्ड गावाबाहेर होता. जी काही दहा पंधरा घरे स्टॅण्डच्या आसपास होती ती ओलांडून आता आमचे बोलणे कोणी ऐकणार नाही अशा खुल्या रस्त्यावर आलो.

"हं बोला—!"

"मी आज सकाळी दिल्लीहून इथं आलो. ह्या बाजूस मी अधूनमधून येत असतो. त्यामुळे इथली मला थोडीबहुत माहिती होती, म्हणून मला पाठवण्यात आलं!"

"येथे सापडलेल्या पॅराट्रुपरना घेऊन इन्स्पेक्टर गुप्ता दिल्लीला पहाटे पाच वाजता पोहोचले. त्यानंतर आम्ही आणि सशस्त्र पोलिस दलाची एक तुकडी तावडतोब दिल्लीहून निघालो.

इथं येऊन पोहोचेपर्यंत पॅराट्रुपरनी पोलीस चौकीवर हल्ला चढवून चौकी जाळून टाकली होती!"

"चौकीत कोणी नव्हतं?"

"दोन पोलिस होते. पॅराट्रुपरची कल्पना असावी की त्याचे तिघे सहकारी तेथेच असावेत. त्यानी बाहेरील बाजूस बसलेल्या पोलिसाच्या पाठीस टॉमीगन लावली. दुसरा पोलीस आत झोपला होता. त्याला त्यानी उठवले नाही. चौकी गुपचूप शोधली आणि दुसरे तिघे सापडले नाहीत तशी रागाने ह्या दोन्ही पोलिसाना गोळ्या घातल्या, चौकी पेटवून दिली आणि ते फरारी झाले!"

त्यानी रागाने गोळ्या घातल्या हे काही मला पटले नाही. पॅराट्रुपरचे बरेचसे यश अवघड परिस्थितीतही तो डोके किती शांत ठेवून काम करतो ह्यावर अवलंबून असते. सारेच काम अप्रतिम कौशल्याने आणि हुषारीने उरकण्यात आले असावे. ते दोन शिपाई ह्याना पाहिलेले साक्षीदार होते आणि त्याना मागे जिवंत

ठेवणे धोक्याचे झाले असते. त्यांच्या जागी मी असतो तर बहुतेक मीही हेच केले असते.

"बरं, त्यानी पॅराट्रुपर्स कोठे उतरवले ?"

"आपण चाललो आहोत, तसेच एक मैल पुढे गेल्यावर रस्त्याच्या उजव्या हातास सरसांची शेते आहेत. त्याचा त्यानी ड्रॉपिंग झोन म्हणून उपयोग केला."

"ठीक आहे. आपण डी. झेड्. पाहून घेऊ!"

आम्ही चालत राहिलो. दहा एक पावलं गेलो असू तेवढ्यात काहीसं अस्वस्थ होत यश म्हणाला, "पण तिथं आता काही असणार नाही."

"कां, सरसांचे वेल असतील की !"

"सर तुम्ही माझी थट्टा करताय् !"

ह्याने मला 'सर' करून टाकले. सैन्यात वरिष्ठ अधिकाऱ्यास 'सर' म्हणून हाक मारली जाते. वरिष्ठ अधिकारी आपल्या खालच्या अधिकाऱ्याना त्यांच्या पहिल्या नावाने बोलावतो. नकळत मी त्याला 'यश' म्हणून एकेरी नावाने बोलायला सुरुवात केली.

"यश, हे पॅराट्रुपर मीरठला गेले, कशावरून समजलं?"

"गावात एक मोठे व्यापारी आहेत—तिमिरजी त्यांचं नाव! त्यांची गाडी चोरीस गेल्याची तक्रार त्यानी आज सकाळी ९ वाजता नोंदवली."

"सकाळी नऊ वाजेपर्यंत हे सद्गृहस्थ काय करत होते ? "

"ते म्हणाले की गाडी चोरीस गेल्याचं त्यांच्या लक्षात सकाळी ७ वाजता आलं. त्यानी ठाण्यावर माणूस पाठवला. पण ठाण्यावर कोणीच नव्हतं."

"इथले सगळेच लोक हुषार आहेत ! "

"गाडीचा शोध सुरू झाला. आज सकाळी ११ च्या सुमारास गाडी मीरठला सापडल्याची खबर आली."

"काही धागादोरा ? "

"काहीसुद्धा नाही. गाडी रिकामी होती. ट्रुपर मीरठला गेले हे समजल्यावर इथं पोलीस फोर्स ठेवण्यात अर्थ नव्हता. आज दुपारी, पॅराशूट सापडल्यावर पोलिस दुपारी तीनच्या सुमारास येथून निघून गेले ! "

सगळं कसं आखल्यासारखं चाललं होतं. चौकीवर हल्ला, गाडीची चोरी, चोरीची खबर पॅराट्रुपर मीरठ पोहचल्यानंतर, त्यानंतर रिकामी गाडी सापडणं ! अर्थात त्यांचा मूळ बेत वेगळा असणार. पण त्यांच्यातले तिघे सहकारी पकडले गेल्याने योजना बदलावी लागली तरी सारे कसे पद्धतशीर चालले होते.पॅराट्रुपरपैकी काही पकडले जाण्याची शक्यता त्यानीही अगोदर विचारात घेतली असणार. पण मेजर हुसेन, त्यांचे प्रमुखच पकडले गेल्याने त्याना त्यास सोडविण्याचा प्रयत्न करणे भाग पडले. एरवी त्यानी ह्यावेळेपर्यंत आपले लक्ष्य गाठले असते.

मी काही न बोलता, आपल्याच विचारात चाललो होतो. पण यशाची अस्वस्थता वाढत होती. त्याला काही बोलायचे असावे. हेही पॅराट्रुपरना शिकावे लागते की कारणावाचून बोलणे बऱ्याचदा








अनुक्रमणिका

माणसास अडचणीत आणते. स्वाभाविक प्रवृत्तीना आवर घालणे हेच सगळ्यात मोठे कठीण शिक्षण असते. उंचीवरून पडण्याची भीती ही माणसाची एक अगदी स्वाभाविक भीती ! ती मनातून संपूर्ण काढून टाकणे अशक्यच. पण पॅराट्रुपरला प्रयत्नानं ती काबूत ठेवणे शिकावे लागते. तसेच अवघड प्रसंगी शांत रहाणे हेही !

"ही ती जागा ! " यश शेवटी म्हणाला.

आतापर्यंत बहुतेक ८ वाजले असावेत. चांगलाच अंधार पडलं होता. यशने माहिती द्यायला सुरुवात केली.

"थोडं पुढं गेल्यावर रस्त्याच्या उजव्या बाजूस कच्चा रस्ता लागतो. पुढे तो एका खेडेगावास जातो. रस्त्याच्या कडेस झाडे आहेत. ह्या रस्त्याच्या उजव्या बाजूस सरसांची शेते आहेत. ही जवळजवळ ५०० स्क्वेअर यार्डची जागा त्यानी डी. झेड्. म्हणून वापरली."

"आपण कच्च्या रस्त्याने आणखी पुढे जाऊन पाहू !" मी म्हणालो.

यशला ती कल्पना फारशी आवडली नसावी. तो गप्प झाला. आम्ही चालत राहिलो.

आम्ही दहा एक मिनिटे चाललो असू. कच्चा रस्ता सुरू होतो तेथे एक पाटी होती. पण ती वाचता येणे शक्य नव्हते. माझ्याकडे वा यशकडे टॉर्च नव्हता.

आम्ही कच्च्या रस्त्याने चालू लागलो. रस्ता अगदीच निर्मनुष्य होता. बूट धुळीने भरून गेले. झाडांच्या सावलीमुळे खाली अंधार दाटला होता. केवळ अंदाजानेच आम्ही चालत होतो.

साधारण चारशे यार्ड पुढे गेल्यावर रस्ता सोडून आम्ही उजव्या बाजूस शेतात गेलो, आणि तसेच पुढे चालत राहिलो. शेताच्या बांधावरून ठेचकळत साधारण १० एक मिनिटे आम्ही चालत होतो. मला साधारण हवी होती तशी जागा अंदाजाने शोधून काढून मी यशला म्हणालो, "आपण इथं थांबू या! "

"इथं ?"

"होय ! "

शेताच्या सीमेलगतच्या बांधाच्या उलटचा बाजूस एक खड्डा होता. बांधामुळे त्या खड्ड्यात लपायला चांगली जागा अनायासे झाली होती. आम्ही दोघे त्यात आरामात पसरलो. जमिनीला पाठ लागली तसे बरे वाटले. काल रात्रीत झोप मिळाली नव्हती, ह्या रात्रीही मिळण्याची शक्यता नव्हती.

यशनं मला दबल्या आवाजात विचारले, "परत आणखीन ट्रुपर उतरतील असं वाटतं तुम्हाला ? "

"खरं सांगू, मलाच कल्पना नाही. "

"मग—? "

"मग काय ? एवीतेवी ही खेप फुकटच गेली आहे ना ! ही रात्र गावात काढायच्या ऐवजी इथं काढू या ! "

यशने सिगरेट पाकिट माझ्याकडे केले. मी म्हणालो,

"नको, आता सिगरेट ओढणे बंद ! "

"पण पॅराट्रूपर्स उतरणार असले तर पहिल्यांदा आपल्याला विमानाचा आवाज ऐकू येईल की ! "

"खरं आहे. पण आता सिगरेट ओढायची नाही!"

यशने नाइलाजाने पाकिट खिशात ठेवले. आकाशातल्या ताऱ्याकडे पहात आम्ही पडून राहिलो.

भुकेने माझ्या पोटात कावळे कोकलू लागले होते. मघाच्या हॉटेलमधून काही खाद्यपदार्थ घेतले असते तर ते इथं उपयोगी पडले असते. पण हे शहाणपण फार उशीरा सुचले.

काही वेळ तसाच स्तब्धतेत गेला. मग यश हलकेच माझ्या बाजूस सरकला आणि मला म्हणाला,

"आपण पकडू शकू काय ह्या पॅराट्रुपरना?"

"पाहू. ते अधिक हुशार असले तर कदाचित ते आपणावर मात करतील."

"सर, मला काय वाटतं सांगू?"

"हं—!"

"ही आपली भारतभूमी! पवित्र भूमी आहे ही! राणाप्रताप, रणजितसिंग, शिवाजी ह्या वीरांची, सीता, सावित्री, मंदोदरी, दमयंती ह्या पतिव्रतांची! ऋषीमुनी, महात्म्यांची आणि पुण्यात्म्यांची जननी आहे ही! ह्या भूमीला शत्रूचा पायदेखील लागू नये!"

—सारं ऐकून चकितच झालो मी! पोलिस फोर्समधला माणूस बोलतो हे?"

मी गप्प बसलेला पाहून तो म्हणाला,

"तुम्हाला नाही असं वाटत, सर?"

"बाबारे, भारताचा इतिहास, आणि तू आता घेतलीस ती सगळी नावं काही मला पाठ नाहीत. हां, हे पॅराट्रुपर्स येऊ नयेत असं वाटतं. युद्धच असू नयेत असंही अलिकडे वाटू लागलंय्! आत्ताच पहाना, ह्यावेळी मी आपला मेसमध्ये सुखात झोपलो असतो."

"सर, मला तुमचा चेहरा दिसत नाही. तुम्ही माझी थट्टा तर नाही ना करत?"

'नाही! ही काही थट्टा करण्याजोगी बाब थोडीच आहे?"

"सर, आपल्याला परंपरा आहे, संस्कृती आहे, उज्ज्वल इतिहास आहे!"

"हो तर! पण निवडच करायची झाली तर उज्ज्वल इतिहासापेक्षा, जगण्याजोगा वर्तमानकाळ आणि आशादायक भविष्य मी पसंत करीन!"

"सर, इतिहास असणारी राष्ट्रेच भविष्य निर्माण करू शकतात. जपानसारखे राष्ट्र ॲटमबाँबचा आघात सहन करून फिनिक्स पक्ष्यासारखे राखेतून फिरून उभे राहू शकते."

"जपान उभा राहिला खरा. पण तो त्याच्या इतिहासामुळे की तेथल्या लोकांच्या आत्ताच्या परिश्रमामुळे हे सांगता येणं मला तरी कठीण आहे!"

"परिश्रम आहेतच. ते करायला हवेतच. पण ते कां करायचे, कां लढायचे हे इतिहास आपल्याला सांगतो. आस्थापूर्वक जपाव्यात अशी मूल्ये आणि श्रद्धा इतिहास आपणास देतो. अंतिम विजय होतो तो सैनिकाच्या ह्या श्रद्धेचा, कणखर निष्ठेचा!"

तो मनापासून बोलत होता. त्याची श्रद्धा भावूक शब्दातून प्रतीत होत होती. मला त्याच्याशी सहमत होता यावं असं फार वाटत होतं. पण त्याला बरं वाटेल असं बोलायला मला शब्द सुचत नव्हते. पण त्यात माझा दोष नव्हता. भावूक आणि स्वप्नाळू वृत्तीमुळे सोसावे लागणारे चटके मी पूर्वी अनुभवले होते. एकवेळ वाटले की हे यशचे शब्द नाहीत. दहा वर्षांपूर्वीचा मी आज तिशीतल्या 'मी'शी बोलत होतो. मी गेल्या दहा वर्षांत काय गमावलं आहे ह्याची जाणीव झाली तसा विलक्षण खेद वाटला.

"सर, तुम्ही बोलत नाही!"

"ऐकतोय तुझं!"

"सर, ह्यापूर्वीही भारतावर आक्रमणं झाली. ती आपण पचवली. स्वतंत्र राष्ट्र म्हणून आपण उभे राहिलो. सर, मला वाटतं हा भारतवर्ष हर्ष आणि चंद्रगुप्ताच्या वेळेसारखा फिरून समृद्ध, समर्थ बनेल!"

मी फिरून गप्प राहिलो.

"सर, मी हे बोलतो. पोलिस खात्यातला एक माणूस हे बोलतो —विचित्र वाटतं ना ऐकायला?"

सर मी मूळचा मोगलपुऱ्याचा रहाणारा.

लाहोरपासून आठ मैलावर आहे हे गाव! तेव्हाचं लाहोरचं उपनगर होऊ घातलं होतं. आता ते जोडलंही गेलं असेल लाहोरला!

१९४७ मध्ये जातीय दंगल सुरू झाली. मी त्यावेळी ८–९ वर्षांचा असेन. आमचं दुकान होतं गावात! किराणामालाचं! एक दिवस बरेचसे मुसलमान आले. नेहमीचीच गिऱ्हाईकं. भरपूर माल घेतला आणि पैसे न देता निघून चालले. वडिलांनी हटकलं तर म्हणाले "हिंदू व्यापाऱ्याला कसला पैसा द्यायचा!" मग हे वारंवार घडू लागलं. शेवटी वडिलांनी दुकान बंद केलं!—

गावात अधूनमधून गोळीबार होई. केवळ गंमत म्हणून एकवेळ बघायला गेलो होतो. माझ्या कानाजवळून सणसणत गोळ्या गेल्या तसा घाबरलो. घरी धावलो. पुढे दंगल सुरू झाली. गोपाळचाचा नावाचे आमच्या गावी एक वृद्ध समाजसेवक होते. त्यांना आमच्या घरासमोरच्या चौकात कुणी तरी भोसकलं. ते खाली पडले, रक्तानं माखून निघाले. धडपडत एका घराजवळ गेले. दारावर थाप मारून कसेबसे, "पाणी पाणी" म्हणून ओरडले.

दार काही उघडलं गेलं नाही! फिरून चौकात आले. चालवत नव्हतं. 'पाणी... पाणी' म्हणत खाली कोसळले.

मी गच्चीवरून उतरलो. पाण्याचा तांब्या घेऊन घराबाहेर तीरासारखा धावलो. त्यांच्याजवळ पोहोचण्यापूर्वीच अब्दुलमियाँनं मला पकडलं. त्याच्या हातून सुटण्याची मी धडपड करीत होतो. त्याच्या आडदांड हाताची सणसणीत चपराक गालावर बसली. डोक्यात सुन्न झालं. तो आवाज कानात घुमत राहिला. तांब्या हातून पडला. डोळ्यासमोर अंधेरी आली. मी खाली कोसळलो.

शुद्धीवर आलो तेव्हा रात्र झाली होती. नंतर समजलं की आईनं हातापाया पडून मला घरात ओढून आणलं. मोहल्यातले लोक घर जाळायला आले होते. मी डोळे उघडले तेव्हा पहिला प्रश्न विचारला, "गोपाळचाचा?"

—ते आमच्या घरासमोरच मेले. पाण्याचा तांब्या त्यांच्यापर्यंत पोहोचू शकला नाही. पाण्यावाचून ते तसेच तडफडून मेले.

अनुक्रमणिका

त्या रात्री फक्त अंगावरच्या कपड्यानिशी आम्ही घर सोडले. अंधारात, लपतछपत, जीव मुठीत घेऊन लाहोरला पोहोचलो. रस्त्यात ठिकठिकाणी गोळीबार चालूच होता.

माझ्या लहान भावास वडिलांनी पाठीशी बांधला होता. आम्ही आपले संधी सापडेल तसे गोळीबार कमी झाला की धावत असू. लाहोर स्टेशनजवळ आलो तशी वडिलांना शंका आली. मूल बोलत नाही, रडत नाही. पाठीवरून उतरवून त्यांनी त्याला पाहिलं. रक्तानं माखला होता. मध्ये कोठेतरी गोळी लागून तो मेला होता.

आम्हाला लाहोर ते अंबाला ह्या काही तासांच्या प्रवासाला आठ दिवस लागले. सहा ठिकाणी गाडी बदलावी लागली. ह्या प्रवासात आम्ही बरोबर आणलं होतं ते सारं लुटलं गेलं! पण त्याचं दुःख नाही. दुःख ह्याचं की परत कधीही मिळवता येणार नाही असं आमचं सर्वस्व ह्या प्रवासात हरवलं!

"माझी आई गर्दीत गाडीत चढू शकली नाही. आम्ही गाडीतून उतरू शकलो नाही. माझी आई हरवली ती कायमचीच!

चंद्र वर आला होता. तृतीया असावी. अस्पष्टसा चंद्रप्रकाश पसरला. झाडांच्या आकृती, शेतातली पिवळी धमक फुले दिसू लागली. मान वळवून मी यशचा चेहरा पाहिला. त्याच्या डोळ्यात अश्रू नव्हते.

मी म्हणालो, "ह्या वयात हे सर्व अनुभवूनही तुझ्या श्रद्धा कायम आहेत? देशाच्या उज्ज्वल भूतकाळाबद्दल तू बोलू शकतोस? भविष्याबद्दल आशावादी राहू शकतोस?"

"खरं सांगू सर, ह्या सर्वातून मी जपून आणू शकलो त्या केवळ श्रद्धाच! माझा भविष्यावरचा विश्वास, तेवढाच कुणाला माझ्यापासून हिरावता आला नाही. आणि हे जेव्हा मला समजलं तेव्हा तो अधिकच प्रखर झाला. देशाबद्दलची आत्मीयता अशीच तीव्र झाली.

सर, आपला देश म्हणजे काय हे समजायला परक्या देशात काही काळ काढावा लागतो. आपली आई काय होती हे ती हरवल्यावर समजते. आणि आपला धर्म कां प्यारा, हे परधर्मीयांचे अत्याचार सहन केल्यावर लक्षात येते.

सर, देशाची फाळणी करायचा ह्या पुढाऱ्यांना अधिकार कुणी दिला? ती काय त्यांची खाजगी मालमत्ता होती? भीक मागून असले स्वातंत्र्य मिळविण्याऐवजी आणखी दहा वर्षे आपण पारतंत्र्यात राहिलो असतो. ही कसली तडजोड, सर? भिकारी देखील काय भीक घ्यायची हे ठरवू शकतो. असली भीक मिळाली तर नाकारील तो!

म्हणून वाटतं, सर, ह्यांचे पाय आपल्या भूमीला लागायला नकोत! आज ब्रिटिश माणूस नाही सांगत अभिमानानं की "दुसऱ्या महायुद्धात एकही जर्मन सैनिक आम्ही ह्या इंग्लंडच्या भूमीवर उतरू दिला नाही."

एवढ्यात रस्त्यावरून जाणाऱ्या गाडीचा आवाज ऐकू आला. मी यशला गप्प केले. भली मोठी आलिशान गाडी डिमलाईटमध्ये रस्त्यावरून भर वेगात येत होती. ती अचानक वळली. कच्च्या रस्त्याने चांगली पुढे आली. पहाता पहाता अंधारात आणि झाडात अशी दडली गेली की बिलकुल दिसेनाशी झाली.

गाडीतून सहा माणसे उतरली. एखादी कवायत चालावी तशा त्यांच्या हालचाली होत्या. त्यातली सफाई आणि रेखीवता पहाण्याजोगी होती. प्रत्येकाने आपापल्या पोझिशन्स् घेतल्या. त्यातला एक तरुण त्वरेने पुढे झाला. चित्त्यासारखा जमिनीवरोबर धावत तो आमच्या बाजूस आला. आमच्यापासून अवघ्या पाच यार्डावर तो जमिनीला चिकटून पडून राहिला.

पंधरा मिनिटे तशीच गेली. श्वास रोखून आम्ही पहात होतो. हळूहळू विमानाचा दुरून येणारा आवाज ऐकू येऊ लागला. हळूहळू हा आवाज मोठा होत चालला. विमान आमच्या बाजूसच येत होते. तृतीयेच्या क्षीण चंद्रप्रकाशात विमानाची आकृती आकाशात दिसू लागली. विमानाचे दिवे बंद होते. पण ते डाकोटा आहे हे ओळखणे अवघड नव्हते. पाक पॅरा ड्रॉपिंगसाठी वापरत असलेले C.113 नव्हते, हे माझ्या लक्षात आले.

आमच्या समोरचा तरुण उठला. आमच्या बाजूस हलकेच आवाज न करता सरकला. खिशातून छोटी बाटली काढली आणि कापडाच्या बोळ्यावर आतील द्रव ओतले. पेट्रोलचा वास आमच्यापर्यंत पोहोचला. काडी ओढून त्याने तो कापसाचा बोळा पेटवला. त्या ज्वालांनी पसरलेल्या उजेडात मी त्याचा चेहरा स्पष्ट पाहू शकलो. दिल्ली किंवा आग्र्याच्या कॉलेजमध्ये शिकत असलेल्या तरुणासारखाच तो दिसत होता. तरतरीत, पाणीदार, रेखीव! त्याचे खांदे रुंद आणि भरलेले होते. घारे डोळे सावध होते. हालचाली लीलया होत होत्या.

तो मागे वळला. जमिनीबरोबरच, त्वरेने तो शेताच्या दुसऱ्या बाजूस गेला आणि साधारण २० यार्डावर त्याने दुसरा बोळा पेटवला. आणि दोन गोळे वेगवेगळ्या ठिकाणी पेटवून त्याने 'टी' हे इंग्लीश अक्षर तयार केले. शेवटचा गोळा पेटवून तो त्याच्या सहकाऱ्याकडे जाऊन दिसेनासा झाला.

मलाच नकळत मी हे सारं काहीसं कौतुकानं पहात होतो. पण यशचा चेहरा रागाने लालीलाल झाला. मुठी आवळून तो स्तब्ध राहिला होता.

आमच्या डोक्यावरून गेलेले विमान फिरून गिरकी घेऊन पेटत्या बोळ्यांच्या प्रकाशाच्या रोखाने येऊ लागले. पहाता पहाता ते खाली आले. साधारण १००० फुटावर! डाकोटाचा मागचा दरवाजा उघडलेला मी पाहिला. विमान शेतावर आले आणि एका पाठोपाठ एक अशा दोन आकृती विमानाबाहेर पडल्या.

स्टॅटिक लाईन तुटली आणि दोन ऑलिव्ह ग्रीन रंगाची पॅराशूट उघडली गेली, चंद्राच्या क्षीण प्रकाशात पंख पसरलेल्या दोन अजस्र पक्ष्यांसारखी ती पॅराशूट तरंगत हलकेच खाली उतरू लागली.

★ ★

# [ ५ ]

माझ्या मनात पहिला विचार आला कर्नल नायरांचा ! ह्या सद्गृहस्थाने थोडीशी जरी दूरदृष्टी दाखवून माझ्याबरोबर काही सैन्यातले अधिकारी वा भारतीय पोलिस पथकातील पोलिस दिले असते तर आत्ता काही मिनिटात ह्या प्रकरणाचा शेवट झाला असता.

इन्स्पेक्टर मेहरा ह्यावेळी काय करत असतील ? ह्या आलिशान गाडीच्या मागा-वर जर तो असेल तर काही क्षणात तेही येथे पोहोचले पाहिजेत. त्यानी तपासाची कोणती दिशा पकडली आहे ? माझ्यापेक्षा त्याना काही अधिक माहिती एव्हाना मिळाली असेल काय ? पकडलेल्या दोन पाक सैनिकांकडून ते काही माहिती काढू शकले असतील काय ?

वास्तविक माझ्यापेक्षा त्याना कितीतरी कमी अडचणी होत्या. एक तर ते त्यांच्या पोलिसासह काम करत होते. पोलिसाना मिळणारी सर्व माहिती त्यांना समजत अस-णार. प्रश्न होता ह्यावेळी ते कोठे आहेत ?

दोन्ही पॅराशूट समोरच्या शेतात, आम-च्याशी समांतर रेषेत, जाऊन आदळली. त्यावरच्या छत्र्या खालच्या सरसांच्या वेलावर पसरल्या.

" आणखीन् पॅराट्रुपर्स ! "— यशे पुटपुटला.

ते पॅराट्रुपर नव्हते. ही पुरवठयासाठी केलेली योजना होती. पकडलेल्या पाक सैनिकावरोबर आणलेला सगळा दारू-गोळा पकडला गेला होता. तसेच भारतीय नोटाही ! ह्या दोन्हीचाही पुरवठा होणे आवश्यक होते. वरोवर हुलकावणी दाखवून ह्या पाक सैनिकानी येथले, त्यांच्या मागा-वर असलेले पोलिस मीरठला पाठवले आणि नेमके हे त्याच ड्रॉपिंग झोनचा उप-योग करण्याकरिता फिरून तेथेंच आले होते. वरिष्ठ अधिकारी म्हणून कर्नल नायरनी ह्या शक्यतेचा विचार करणे आवश्यक होते.

पॅराशूट्स् आमच्यापासून अंदाज तीस-एक फुटांवर पडली होती. हळूच पुढे सरकलो असतो तर त्या पाकसैनिकांपेक्षा आम्हीच त्यांच्यापर्यंत अगोदर पोहोचलो असतो. पण मागे पाक सैनिक सज्ज होते. त्या पॅराशूटपर्यंत पोहचण्यापूर्वीच आमच्या शरीराची चाळण उडाली असती.

पॅराशूट जमिनीवर उतरून पुरे तीन सेकंद झाले असावेत. कोठेच काही हालचाल नव्हती. वाराही पडला होता. झाडांची पाने देखील निस्तब्ध होती. मघाशी पेटलेले बोळे आता विझू लागले होते. आमच्या श्वासाचा आवाज आम्हालाच मोठा वाटत होता. हे सारंच कसं शांत शांत होतं. इतका वेळ सफाईनं चाललेल्या नाटकात एखादं पात्र वाक्य विसरावं आणि स्टेजवर शांतता पसरावी तशी ती शांतता विचित्र आणि अस्वस्थ करणारी होती.

आणि काही क्षण गेले. आता ते बोळे पूर्ण विझून गेले. फिरून सर्वत्र अंधार पसरला.

इतक्यात मघाचा तरुण जमिनीपासून थोडासा वर उठलेला आम्हाला दिसला. त्वरेने धावत तो पॅराशूटजवळ पोहोचला. खाली वाकून पॅराशूटच्या रिगिंग लाईन्सच्या गुंत्यांतून तो पार्सल सोडवून घेऊ लागला.

★ ★ ★




★ ★ ★

माझ्या बाजूस खुसखुस असा अस्पष्टसा आवाज झाला. पहातो तो यशने आपले सर्व्हिस रिव्हॉल्व्हर बाहेर काढले होते. अगदी अभावितपणे सैन्यातली नेहमीची शिवी माझ्या ओठावर आली. ती तशीच आत ढकलत मी त्याच्या हातातल्या रिव्हॉल्व्हरवर झडप घातली. यश रिव्हॉल्व्हर सोडेना.

दात दाबून मी म्हणालो, " मूर्ख ! " आणि ते रिव्हॉल्व्हर मी जमिनीवर दाबून धरले. ह्या धडपडीचा आवाज त्या तरुणापर्यंत पोहोचला काय ? —कळायला मार्ग नव्हता. पण तो तरुण एकदम थांबला. आम्ही लपलो होतो त्या दिशेला त्याने एक दृटिक्षेप टाकला. आमच्या दोघांचे श्वास थांबले. आम्ही जमिनीबरोबर गप्प पडून राहिलो. क्षणमात्र थांबून तो तरुण फिरून त्वरेने कामाला लागला. त्याने एक बॅग त्या रिंगिंग लाईन्सपासून सोडवली आणि दुसऱ्या पॅराशूटकडे जाण्याकरिता तो जमिनीपासून काहीसा वर उठला. त्या सरसांच्या रोपातून सरपटत, त्वरेने तो दुसऱ्या पॅराशूटजवळ पोहोचला. फिरून तो त्या रोपात मिसळून जाणार इतक्यात ३०३ रायफलचे तीन चार आवाज एकाच वेळी त्या शांत वातावरणात कडाडले.

त्या तरुणास त्या गोळ्या लागल्या की नाही हे समजले नाही. पण तो त्या रोपात खाली पडून दिसेनासा झाला. पलिकडच्या बाजूने रायफलच्या गोळ्यांचा वर्षाव चालूच राहिला.

त्यांच्या फायरिंगच्या आवाजावरून मी ओळखले की हे आर्म्ड पोलिसांचे पथक आहे. इन्स्पेक्टर मेहरानी ह्या लोकांचा बरोबर मागोवा घेतला होता तर —! एक तर ते ह्या लोकांच्या पाठोपाठ मीरठहून येथे आले असावेत किंवा आम्ही येण्याअगोदरपासूनच येथे दबा धरून बसलेले असावेत. दुसरी शक्यता कमी होती. आणि मीरठहून जर ह्या पाक सैनिकापाठोपाठ ते आले असले तर त्यानी ज्या सावधपणे आवाज होऊ न देता ह्या पाक सैनिकांसमोर पोझिशन्स् घेतल्या त्याबद्दल त्यांची निश्चित प्रशंसा केली पाहिजे. पुरेसे पोलिस बरोबर असले तर इन्स्पेक्टर मेहरानी ह्या पाक सैनिकाना चोहोबाजूनी वेढले असले पाहिजे— आणि जर त्यांच्या योजनेप्रमाणे सर्व व्यवस्थित पार पडेल तर त्या पाक सैनिकाना ते येथेच पकडू शकतील ह्यात मला शंका उरली नाही.

पण पोलिसांच्या गोळीबाराला उलटया बाजूने तेवढाच जोराचा प्रतिसाद मिळाला. ह्या लाइट मशीनगन्स् किंवा स्वयंचलित गन्स् असाव्यात. पोलिसांच्या एका गोळीचे प्रत्युत्तर म्हणून पलिकडून त्यांच्या चौपट गोळ्यांची फैरी होत होती.

आमच्या समोर, ह्या दोन्ही बाजूनी चाललेल्या गोळीबारात समोरचा तरुण मात्र अद्याप काहीच हालचाल न करता पडून होता. तो जिवंत असण्याची शक्यता मला कमी वाटू लागली. त्याच्या पासून काही अंतरावर दुसरे पॅराशूट पडलेले होते. आणि सरसांच्या रोपातून मघाशी त्याने सोडवून आपणाबरोबर नेलेली बॅग मला अस्पष्टशी दिसत होती. त्याच्यावरूनच दोन्ही पक्षांचा गोळीबार चालला होता. पोलिसाना पुढे येता येणे ह्या जबरदस्त फैरीमुळे पाक सैनिकानी अशक्य करून टाकलं. पाक सैनिकानीही त्या पॅराशूटपर्यंत पोहोचता येणंही तितकंच कठीण होते.

आतापर्यंतच्या गोळीबाराच्या दिशेवरून एक स्पष्ट झालं की पोलिस काही सगळ्या बाजूने ह्या पाक सैनिकाना वेढू शकले नव्हते. कदाचित त्यांच्याकडे पुरेसे पोलिस नसावेत. कदाचित् इन्स्पेक्टर मेहरा हळूहळू ह्या पाक सैनिकांच्या पिछाडीला निवडक पोलिसांसह सरकत असतील. आणखीन् काही वेळ जाईल तर कदाचित पोलिसाना अधिक कुमकही येईल. पुढच्या तीन चार मिनिटात ह्याचा शेवट काय होणार ह्याची कल्पना येईल असा माझा अंदाज होता. पण झाले वेगळेच !

एक पाक सैनिक जमिनीपासून काहीसा उठला. क्षणार्धात गोळ्यांचा भडका

उडाला. तो सैनिक विलक्षण चपळाईनं फिरून भुईसपाट झाला. एक गोळा भिरभिरत येऊन, त्या पॅराशूटला ओलांडून, आमच्यापासून फार तर १५ यार्डावर पडला. तो हॅण्ड ग्रेनेड असेल तर आम्ही हुतात्मे होण्याची वेळ आली. मी जमिनीत डोके खुपसले आणि कानावर व डोक्यावर हातांची घडी केली. स्फोट होण्याची मी वाट पाहू लागलो.

दोन तीन क्षण गेले. पण केवढे लांब वाटले ते ! ग्रेनेड फुटल्याचा दबला आवाज ऐकू आला, आणि दाट धूर एकदम वर उसळू लागला. वारा नव्हताच. क्षणार्धात आणखीन् दोन स्मोक ग्रेनेड येऊन पडले आणि शेताच्यामध्ये धुराची जाड भिंत उभी राहिली. भिंतीच्या एका बाजूस पोलिस राहिले आणि दुसऱ्या बाजूस पॅराशूट आणि पाक सैनिक ! आम्ही साधारण पाक सैनिकांच्या बाजूसच होतो. त्यामुळे भिंतीच्या अलिकडेच राहिलो.

काय घडते आहे हे लक्षात यायला पोलिसाना थोडा वेळ लागला. पण जेव्हा त्याना ते समजले तेव्हा त्यानी त्वेषाने बंदुकीच्या फैरी त्या धुरावरच सोडायला सुरुवात केली. त्याना चोख उत्तर पाक मशीन गन्स् देत राहिल्या.

समोरचा तरुण काही उठला नाही. तो मेला असल्याची माझी शंका खरी झाली असे वाटले. पण मग हालचाल दिसली. तो सरसाच्या रोपाबाहेर डोके काढून, त्याच्यापासून जवळच असलेल्या दुसऱ्या पॅराशूटकडे तो सरकण्याचा प्रयत्न करत होता. त्याच्या हालचालीतली सफाई आता कोठच्या कोठे नाहीशी झाली होती. आणि ज्या तऱ्हेने तो कष्टाने पुढे सरकण्याचा प्रयत्न करत होता त्यावरून वाटले की बहुतेक त्याच्या पोटात गोळ्या लागल्या असाव्यात. शत्रूलाही तसे मरण येऊ नये. पोटात जखम झालेला माणूस लगेच मरतही नाही. मरण्यापूर्वी कितीतरी तास मरण परवडले अशा अवस्थेत तळमळत ठेवते.




इतक्यात पाक सैनिकांपैकी एक चित्त्याच्या वेगाने पुढे सरकत असलेला मी पाहिला. त्याच्या हालचालीवरून मी ओळखले की हा काही सैन्यात अलिकडेच भरती झालेला रिक्रूट नाही. हा कसलेला 'कमांडो' आहे. निदान पंधरा ते वीस वर्षे ह्याने सैन्यात काम केलेले असावे. दुसऱ्या महायुद्धात लढाईचा अनुभवही ह्याने बहुतेक घेतलेला असावा. त्याच्या डोक्यावरून सणसणून चाललेल्या गोळ्यांची त्याला पर्वा नव्हती ! जणू काही कवायतीच्या मैदानावर प्रात्यक्षिकाकरिता डमी गोळीबार चालू आहे आणि तो समोरच्या जवानाना आपल्या कामाचा 'नमुना' दाखवत आहे. निर्भयतेने, सहजतेने, पण विलक्षण सावधपणे तो पुढे झाला. वेगाने त्या दुसऱ्या पॅराशूटजवळ पोहोचला. रिगिंग लाइन्समध्ये गुंतलेले पार्सल त्याने अलग केले. ते विलक्षण जड असावे. त्याला ते उचलेना. तसा तो प्रयत्न सोडून त्याने ते तसेच खेचत त्या जखमी तरुणाजवळ आणले. त्याच्याजवळची बॅग आपणाकडे घेतली. क्षणमात्र तो त्या तरुणाजवळ थांबला. तो त्याच्या जखमा पहात असावा.

अचानक काय होणार ह्याची मला कल्पना आली तसा मी शहारलो. वाटू लागले ओरडावे, "थांब, मारू नकोस !" पण माझ्या ओठातून शब्द फुटला नाही. पडलेल्या तरुणाच्या कानाजवळ त्याने बंदूक टेकवली आणि गोळी झाडली. कवटी फोडून ती आरपार गेली असावी. दोन पार्सले घेऊन तो सैनिक सरसांच्या रोपातून अलिकडे सरकू लागला.

ह्या साऱ्याचा यशवर काय परिणाम झाला हे पहाण्यासाठी मी यशकडे नजर वळवली. आणि माझ्या हृदयाचा ठोका चुकला. शेजारी यश नव्हता. ह्या गोळीबाराच्या धुमश्चक्रीत तो येथून उठून केव्हा नाहीसा झाला मला समजलेही नाही. तो कोठे गेला असावा, कशाला ह्याचा काडीमात्रही अंदाज मला येईना. एक तुटके पोलिस रिव्हाल्व्हर घेऊन ह्या पाक सैनिकांच्या मागे जाऊन त्याना त्याने गारद करायचे ठरवले असले तर तो काही परत येत नाही, हे मला समजून चुकले.

एव्हाना पाक सैनिकांपैकी दोघे थोडे पुढे जाऊन त्यांनी ती जड पेटी खेचून आणायला त्या सैनिकास मदत केली. तो सैनिक मशीन-गन चालवणाऱ्या आपल्या अधिकाऱ्याजवळ पोहोचला. त्यांचे संभाषण मला चाललेल्या गोळीबारातून अर्धवट ऐकू येऊ लागले.

"सर, ती मशीन-गन माझ्याकडे द्या आणि पोलिसानी आपल्याला वेढण्यापूर्वी इथून निघा !"

"नाही, नाही . . . तुम्ही—"

"सर, बोलण्यात वेळ घालवू नका. माझं ऐका. चला !"

त्या सुभेदार मेजरने जवळजवळ मशीनगन हिसकावूनच घेतली. दुसरे दोघे ती जड पार्सले घेऊन सरपटत मागे बांधापलिकडे काळोखात अदृश्य झाले.

खुसखस आवाज झाला तसे मी दचकून मागे पाहिले. यश फिरून येऊन माझ्या शेजारी भुईसपाट झाला. तो दिसला तशी त्याच्याबद्दलची काळजी नाहीशी झाली आणि तिची जागा रागाने घेतली. पण तो कोठे गेला होता हे विचारण्याची येथे सोयच नव्हती.

धुराचा पडदा आता थोडासा विरळ झाला होता. पोलिसांचा गोळीबार जवळ जवळ थांबला होता. बांधापलिकडे मगाचचे दोन पाक सैनिक क्षणमात्र दिसले, ते त्यांच्या मोटारीकडे धावत होते.

ते दिसताच फिरून पोलिसांच्या बंदुका कडाडल्या. मघाच्या धुराचा फायदा घेऊन पोलिसानी शेतातले अर्धे अधिक अंतर कापले होते. पॅराशूटपासून ते आता केवळ

अनुक्रमणिका




दहा पंधरा हातापर्यंत आले होते. पॅराशूट आता रिकामी होती !

त्यांच्या बंदुकाना तेवढेच जबरदस्त प्रत्युत्तर समोरच्या, मागे राहिलेल्या केवळ दोन पाक सैनिकांकडून आले. त्याचा दणका असा होता की पोलिसांची आगेकूच एकदम थांबलीच.

त्या दोघांपैकी एकही थांबला नाही. ते धावत असताना क्षणमात्र दिसले तेवढेच! आता दोन्ही बाजूनी अविरत गोळीबारास सुरुवात झाली होती.

आणि ह्या गोळीबारातूनही मोटार सुरू झाल्याचा आवाज मला ऐकू आला. पोलिसानी त्या दिशेने बंदुकीच्या फैरी झाडल्या.

धुळीचा लोट उठला आणि ते दोघे पाक सैनिक, आमच्या समोरून, पोलिसांच्या समोरून, नुकतीच आलेली ती दोन पार्सले घेऊन निघून गेले.

आम्ही . . . आम्ही नुसते पहात राहिलो होतो. ☆ ☆

[ ६ ]

मी यशला खूण केली आणि आम्ही सरपटत मागे सरकलो. साधारण तीस-पस्तीस यार्ड तसेच मागे सरकत गेल्यावर जेव्हा पोलिस किंवा पाक सैनिकाना आम्ही दिसणार नाही ह्याची खात्री पटली, तेव्हा आम्ही धावायला सुरुवात केली.

पोलिस आणि पाक सैनिकांचा गोळीबार चालूच होता. पोलिसानी कडे करून त्याना वेढल्याखेरीज राहिलेले ते दोघे सैनिक पोलिसांच्या हाती लागणे अशक्य होते. आणि ती गोष्ट कठीण होती. पोलिसांच्या हाती सापडण्यापेक्षा बंदुकीची गोळी, पोलिसांच्या किंवा स्वतःच्या, त्यानी पत्करली असती.

आता तेथे थांबण्यात अर्थ नव्हता. ह्या लढाईचे रोमहर्षक वर्णन आणि आपल्या पोलिसांच्या विजयाची कहाणी दुसरे दिवशी वृत्तपत्रात वाचायला मिळाली असती. प्रश्न होता तो त्या गाडीतून निघून गेलेल्या सैनिकांना पकडण्याचा!

बंगला लांबचा वळसा घेऊन आम्ही फिरून राजरस्त्यावर आलो. मी यशला म्हणालो, "मघाशी कुठे गेला होतास?"

"त्यांची गाडी पहायला!"

"पाहिलीस?"

"हो, इम्पाला आहे. D.L.T. 36448"

"तो नंबर खोटा असणार."

"तीही शक्यता आहे." यश तितक्याच शांतपणे म्हणाला.

"मी ती गाडी बंद पाडता येते का ते पहात होतो!"

"मग–!"

"बॅटरी प्लग पॉइंटमध्ये कागद घालता आला असता तर गाडी सुरूच झाली नसती–!"

आम्ही भरभर चालत होतो. चालता चालता यश पुढे म्हणाला,

"पण ते जमणे केवळ अशक्य होते. त्यांचा एक माणूस गाडीत बसून होता. मला बॉनेट उघडता येणे शक्य नव्हते.



मला स्वतःचाच राग आला. यशच्या जागी मी असतो तर गाडीतल्या माणसाला खलास करणं हा काही सेकंदांचाच प्रश्न होता.

'अन् आर्म कॉबॅट' कोर्समध्ये आम्हाल हे शिक्षण दिलेलं असतं. माणसाच्य शरीरात निदान सात जागा अशा असतात की जेथे एक ठोसा दिला तर तो तात्का बेशुद्ध होईल.

अर्थात् यशकडून ही अपेक्षा करणं चुकीचे होते. पोलिसाना हत्यारावांचू लढण्याचे शिक्षण दिले जाते की नाह ह्याची मला कल्पना नव्हती. दुसरे, यश तो धोका पत्करला असता की नाही ह्याबद्द मला शंका होती. सर्वसाधारणपणे इत लोक जो विचारही करत नाहीत तो आम्ह प्रथम करतो. 'आश्चर्य' हे अशा लढाई एक महत्त्वाचं हत्यार आहे.

फिरून यश म्हणाला, "पण माझ खेप अगदीच फुकट गेली नाही."

"म्हणजे?"

"गाडीच्या मागचा पेट्रोल टाकीच ड्रेनेज स्क्रू मी ढिला करून ठेवला आ सबंधच काढणार होतो. पण पेट्रोल गळ यला लागलं असतं तर त्याच्या वासाने सावध झाले असते. आता गाडी सुरू झाल की ह्या कच्च्या रस्त्याच्या हादऱ्याने खाली पडेल. रस्त्यावर पेट्रोल सांड जाईल. गाडी फार लांब जाऊ शकणा नाही."

मी एकदम सावध झालो. यशने मो कामगिरी केली होती. ते सैनिक अद्याप हाती लागण्याची शक्यता होती.

"यश, आपल्याला कुणाची गा मिळेल?"

"पोलिसांची जीप असणारच!"

"ते सोडून दे. पोलिसांची समज घालणे महाकठीण काम. गावात कुणा खाजगी गाडी–?"

"एकच होती ती ह्या सैनिका मीरठला नेली."

"कोणतेही कसलेही जलद गती वाहन–? मोटार सायकल, बस, ट्रक. काहीही चालेल!"



अनुक्रमणिका

"शक्यता कमी आहे. पण . . . हां दिल्ली ते हरिपूर बस सर्व्हिस आहे. शेवटची बस येथें मुक्कामाला असते."

मी धावायला सुरुवात केली. पॅराट्रुपर म्हणून मी ट्रेनिंगला असताना २०–२० मैल धावायची सवय केलेली आता कामी आली.

स्टॅंडवर झाडाखाली बस उभी होती. आम्हाला तेथें पोहोचायला फार तर दहा मिनिटे लागली असावीत. यश धापा टाकीत होता. त्याच्याकडे लक्ष द्यायला मला वेळ नव्हता. प्रत्येक सेकंद मोलाचा होता.

बसच्या मागच्या सीटवर सरदारजी झोपले होते. त्यांच्या कपड्यावरून ह्या गाडीचे ड्रायव्हर हेच हे मी ओळखले. चावी गाडीला नव्हती ह्याचा अर्थ ती त्यांच्या खिशात असणार हे नक्की होते.

शक्य तो सरदारजींच्या बरोबर झगडा मी टाळतो. एक तर शरीराने ते विलक्षण कणखर आणि मनाने चिवट असतात. दुसरे, त्यांच्या प्रतिक्रिया इतक्या अनपेक्षित असतात की त्यांच्याबद्दलचे सर्व अंदाज चुकतात आणि माणूस फसतो.

ह्या सुखानं झोपलेल्या सरदारजीना त्रास द्यायची माझी बिलकुल इच्छा नव्हती. पण इलाजच नव्हता. मी त्याना उठवले. सरदारजी जाम भडकले. गाडीत बसल्या बसल्या त्यानी भांडायला सुरुवात केली. समजून सांगण्याइतका वेळही नव्हता. सारी शक्ती एकवटून मी सरदारजींच्या हनुवटीखाली ठोसा ठेवून दिला. माझ्या हाताला झिणझिण्या आल्या. पण सरदारजी खाली कोसळले. साधारण अडीचशे पौंडाचा देह उचलून, गाडीच्या दरवाज्यातून बाहेर काढून झाडाच्या पारापर्यंत आणणे ही काही सोपी गोष्ट नव्हती. पण मी आणि यशने ती शक्य तितक्या त्वरेने पार पाडली. परतताना मी त्यांचा कोट, खिशात चावी असल्याची खात्री करून घेऊन, काढून आणला. तो कोट अंगावर चढवत यश ड्रायव्हरच्या सीटवर बसला.

गाडी सुरू झाली तशी अकस्मात कोठून तरी दोन कुत्र्यानी जोर जोरानी भुंकण्यास सुरुवात केली. ह्या भुंकण्याने सारा स्टॅंड जागा झाला असता. पण कुणी उठून आम्हाला अडविण्यापूर्वीच यशने गाडी रस्त्यावर आणली. प्रवास सुरू झाला.

थंडगार वारा लागत होता. माझं शरीर थकलं होतं. डोळे झोपेने मिटू लागले होते. ते उघडे ठेवण्याच्या माझ्या प्रयत्नाला अर्थ राहिला नव्हता. गाडीचा वेग, त्याने निर्माण झालेली लय आणि थंड वारा याने मला केव्हाच झोप लागली असती पण माझ्या डोक्यात विचारांचा भुंगा मेंदू कुरतडत होता.

ह्या पाक कमांडोंचे काय लक्ष्य असावे? कुणाचा खून, कोणती इमारत, उडवून द्यायची, वीजप्रवाह बंद पाडायचा की रेडिओ स्टेशन उध्वस्त करायचे – कोणती योजना त्यांच्या मनात असेल? कोणत्या आज्ञा त्यांच्या वरिष्ठांकडून त्याना मिळालेल्या असतील? आणि त्या ते कशा पार पाडणार असतील?

अनेक शक्यता मनात येत होत्या. प्रत्येक भयावह होती. जीवावर उदार होऊन आलेले, घातपाताचे शिक्षण घेतलेले, शस्त्रसज्ज हे तिघे दिल्लीत कोणताही गोंधळ उडवून देण्याची शक्यता होती.

विचार करता करता माझे डोळे केव्हा मिटले गेले हे मला समजलेही नाही.

खररंर—ब्रेकचा कर्णकठोर आवाज झाला. टायर रस्त्यावर घासत जाऊन गाडी वेडीवाकडी होत थांबली तसे माझे डोळे उघडले. गाडीच्या हेडलाईटच्या प्रकाशाच्या झोतात रस्त्याच्या बरोबर मध्यभागी एक तरुण उभा होता. गाडी इतक्या वेगात होती की यशने जोरात ब्रेक लावले नसते तर तो तरुण गाडीखाली सापडलाच असता.

गाडी थांबली तसे काय होते आहे हे समजायच्या आत दार उघडून दोघेजण आत आले. त्यांच्या मागोमाग गाडी थांबवणारा तिसरा तरुणही आत आला.

हा लेफ्टनंट असावा. दुसरे दोघे एन्. सी. ओ. असावेत. कदाचित् त्यांच्यापैकी रापलेल्या चेहऱ्याचा, वयस्क माणूस सुभेदार अथवा सुभेदार मेजर असावा. ह्या तरुणाचा वर्ण गोरापान होता. उंची पाच फूट आठ इंच. शरीराने भरलेला. कोवळ्या मिशा वाढवून त्यांची टोके त्याने वर वळवली होती, त्यामुळे तो काहीसा मजेशीर दिसत होता. शिल्लक राहिलेल्या तिघांमध्ये तो वयाने लहान व अधिकाराने मोठा होता. तेव्हा चेहऱ्यावर गंभीरपणा आणूनच तो वावरत होता.

दुसरे दोघे सैन्यात निदान १५ वर्षे सर्व्हिस केल्यासारखे दिसत होते. त्यातला वयाने जो मोठा होता तो निश्चितच दुसऱ्या महायुद्धात मध्य पूर्वेत अथवा आफ्रिकेत जर्मन पँझर सैन्याबरोबर झालेल्या लढाईत ब्रिटिश सैनिक म्हणून लढला असावा.

तिसरा माणूस मला आवडला नाही. पहाताक्षणीच एक प्रकारची घृणा निर्माण झाली. चेहऱ्यावर देवीचे वण होते. डोळे बारीक होते आणि त्यात क्रौर्याची छटा दिसत होती. त्या दोघांच्याही हातात अमेरिकन बनावटीच्या अद्यावत, स्वयंचलित बंदुका होत्या.

त्या तरुणाने दरवाजा बंद करून घेतला आणि आम्हा दोघांकडे एक वेळ निरखून पाहिले! आम्ही आतापर्यंत खरोखरच प्रेक्षणीय दिसू लागलो असणार. त्याच्या हातातले अमेरिकन ·३२ पिस्तूल माझ्याकडे रोखत त्याने विचारले,

"कुठं निघाली आहे ही गाडी ?"

"दिल्लीला !"

"ह्यावेळी? आणि पॅसेंजर कसे नाहीत?"

"गाडी रस्त्यात नादुरुस्त होऊन पडली होती. दुरुस्तीला मी दिल्लीहून गेलो होतो. स्टीअरिंग रॉड तुटला होता. दुरुस्त करून दिल्लीला घेऊन चाललोय.

पण तुम्ही कोण आहात ? तुम्हाला कशाला हवी ही माहिती ?"




महाराष्ट्रात गाजत असलेली 'चालू' नाटके

कटयार काळजांत घुसली

"आम्हीही प्रवासी आहोत. दिल्ली पहायला निघालोय्!"

"मग सकाळी मुरादाबाद–दिल्ली बसने या! प्रायव्हेट पॅसेंजर न्यायला बंदी आहे आम्हाला!"

"आम्ही पॅसेंजर थोडेच आहोत. तुमच्यापैकी मेकॅनिक आहोत. गाडी दुरुस्तीला तुमच्याबरोबर आलो होतो. खरं ना! "

"अहो पण— !"

"हे पहा, आम्हाला दिल्लीला पोहोचायचं आहे. फारच फार उशीरा म्हणजे पहाटेपर्यंत ! आणि फुकट नाही हं, चार्जेस देऊ आम्ही तुमचे!"

त्यानं खिशातून शंभराच्या तीन नोटा काढल्या आणि त्या आमच्या अंगावर फेकल्या. मी त्या उचलल्या. निरखून पाहिल्या आणि खिशात ठेवत म्हणालो.

"ठीक आहे. चला ना !"

"कासिम आपलं सामान आण !" त्या तरुणानं बारीक डोळ्याच्या माणसास सांगितले.

कासिम आणि त्याच्या पाठोपाठ दुसरा इसमही उतरला. मी खिडकीतून पहात होतो. रस्ता सोडून, सहजासहजी लक्षात येणार नाही अशा बेताने त्यानी इम्पाला उभी केली होती. मागची भलीमोठी डिक्की उघडून त्या दोघानी एक जड पेटी गाडीत चढवली. दुसरी छोटी बॅग कासिम धावत जाऊन घेऊन आला.

दरवाजाजवळ मी बसलो होतो. तेथून त्या तरुणाने मला उठवले आणि ड्रायव्हर मागे दोन सीटस् सोडून बसायला सांगितले. बरोबर माझ्या आणि यशच्या मागची जागा कासिमने घेतली. कासिम मागे बसला तसा मी अस्वस्थ झालो. हा धोकेबाज इसम मला दिसेल अशा जागी बसायला हवा होता.

यश इतका वेळ शांत होता. तो गाडीत आहे ह्याची जणु कोणी दखलच घेतलेली नव्हती. तो गाडी सुरू करणार इतक्यात तो जे. सि. ओ. म्हणाला, "थांबा!"

तो माझ्याजवळ आला आणि मला चाचपून माझ्याजवळ हत्यार नाही ह्याची त्याने खात्री करून घेतली. ह्याला म्हणतात अनुभव ! कोणतीही चूक घडू द्यायला, कोणताही अवास्तव धोका पत्करायची त्याची तयारी नव्हती.

माझ्याकडून तो यशकडे वळला, आणि मला एकदम आठवले की यशच्या खिशात पोलिस रिव्हाल्व्हर आहे. ते त्याच्या दृष्टीस पडले असते तर आम्हा दोघांचीही इतिश्री तेथेच झाली असती.

छातीत पडणारे ठोके मलाच ऐकू येऊ लागले ! त्या अधिकाऱ्यानं यशस्वी झडती घेतली. त्याला रिव्हॉल्व्हर काही सापडले नाही. तो तरुण लेफ्टनंट आता कंटाळला होता. ही झडती हा त्याला वेळेचा अपव्यय वाटत होता. मेकॅनिक आणि ड्रायव्हरकडे काय पिस्तुले असतात. अधिक शोधायला संधी न देता त्याने सुभेदार साहेबाना विचारले, " झाला ना तपास. निघू या आता ! "

पडत्या फळाची आज्ञा घेऊन यशने गाडी सुरू केली. त्या निर्जन रस्त्यावरून वारा प्यायल्यासारखी ती वेगाने धावू लागली.

पंधरा एक मिनिटे गाडीने रस्ता आक्रमला असेल इतक्यात मागून येणाऱ्या गाडीचा हॉर्न ऐकू येऊ लागला.

कासिमने माझ्या मागून यशला सांगितले, " जांऊ देत त्याना पुढे ! "— कासिमच्या आवाजात जरब होती. कमालीचा उर्मटपणा होता.

यशने हात दाखवला व मागच्या गाडीस रस्ता दिला. एका मागोमाग एक अशा दोन जीप गाड्या आम्हाला मागे टाकून वेगाने निघून गेल्या. त्यात पोलिस होते. इन्स्पेक्टर मेहरा त्यात असतील का ? बहुतेक असावेत ! मग ते दोघे मागे राहिलेले पाक सैनिक पकडले गेले, मारले ? इन्स्पेक्टर मेहरानी ही बस थांबवली कां नाही ? शोधली कां नाही ? प्रश्नाचं उत्तर मला सापडेना.

दिल्ली अद्याप दहा मैल दूर होती. तोवर आराम होता. पाक सैनिक कोठे असतील, काय करत असतील याचा विचार करायचे कारण नव्हते. कारण ते आमच्या बरोबरच होते आणि ते काय करत होते हे आम्ही पहात होतो.

काहीच करता येण्याची शक्यता नव्हती. मग झोप घ्यायला ही वेळ उत्तम म्हणून मी मागच्या रेलींगवर डोके टेकले आणि डोळे मिटले.

मघाशी डोळ्यावर झोपेची झापड आली होती. आता डोळे मिटले तरी झोप यायला तयार नव्हती ! मागे बसलेल्या कासिमचा चेहरा नजरेसमोर दिसत होता.

पहाटे चारच्या सुमारास आम्ही शहादऱ्यास आलो. पेट्रोलपंप दिसला तसा गाडी थांबवायला सांगून तो गुलछबू मिशीवाला लेफ्टनंट खाली उतरला.

पेट्रोल पंपावरून कुणाला तरी फोन करून तो दोन मिनिटात परतला.

आम्ही थांबलो होतो इतक्यात एक ’६८ मॉडेलची फोर्ड आणि त्या पाठोपाठ एक अॅंबेसीडर गाडी आम्हाला ओलांडून दिल्लीकडे निघून गेल्या.

शहादरा ओलांडून आम्ही जमुना ब्रिजजवळ आलो. पुलाच्या सुरुवातीसच

# इंडियनऑईल
## आमचें आहे!



स्टोव्हवरील स्वयंपाकाच्या दगदगीने जीव अगदीं त्रासून जायचा माझा. इंडियनऑईलमुळे आतां तो त्रास चुकला. इंडेननें—इंडियनऑईलच्या गॅसनें—माझा स्वयंपाक आतां किती जलद व स्वच्छ होतो. भांडी तर अजिबात काजळत नाहींत. शिवाय इतर कामाला फुरसत पण मिळते.

माझा घरचा अभ्यास आणि आईचीं घरगुती कामें आतां इंडियनऑईलमुळें फार सोपीं झालींत. दिव्यांसाठीं व स्वयंपाकासाठीं लागणारें 'ज्योति' केरोसीन इंडियनऑईल पुरविते. माझ्या गांवात तें बैलगाडीनें येतें पण दूरवरच्या खेडोपाड्यांत सुद्धां तें पोंचवलें जातें. त्यासाठीं सर्व प्रकारचीं वाहनें — टांकीच्या गाड्या, ट्रक, तिचाकी गाड्या, उंटांच्या व खेचरांच्या गाड्या आणि हातगाड्या पण — वापरलीं जातात.

इंडियनऑईल आमचें आहे म्हणूनच या सर्व गोष्टी तें करू शकतें.




*—आर्थिक समृद्धीसाठीं राष्ट्रीय ट्रस्ट*

**इंडियन ऑईल कॉर्पोरेशन लिमिटेड**

IOC 7/HA MAR

पोलिसानी ती फोर्ड गाडी आणि त्यामागून आलेली अँबेसिडर थांबवली होती. तपास चालू झाला होता.

फोर्डमध्ये आठ–दहा माणसांचे एक कुटुंब होते आणि थंडीत, अशा अपरात्री, सर्वानाच खाली उतरायला लावल्याबद्दल त्यांच्यापैकी एक माणूस पोलिसांशी भांडत होता.

अँबेसिडरमध्ये पाच माणसे होती. दोन पोलिस त्याना प्रश्न विचारत होते. तपास कसून चालला होता.

मघाशी पुढे आलेल्या पोलिसांच्या दोन्ही जीप गाड्या रस्त्याच्या कडेला दिसत होत्या. इन्स्पेक्टर मेहरा मात्र कुठंच दिसत नव्हते. कदाचित ते मागेच, पोलिसांबरोबर राहिले असतील. आणि तसे असेल तर त्यानी फार मोठी चूक केली असं मी म्हणेन.

यशने हॉर्न वाजवला तसा एक पोलिस येऊन त्याच्यावर खेकसला. ते खेकसणे पचवून यश म्हणाला,

" बाबा रे जाऊ देना. नेहमीची बस आहे. बंद पडली म्हणून आज एवढा उशीर झाला ! "

तो पोलिस गाडीचा दरवाजा उघडून आत चढला. त्याने स्वतःशीच ठरवलेले असावे की ह्या गाडीत पाक सैनिक नाहीत. शक्यता होती ते अँबेसिडरमध्ये असण्याची ! त्याना पकडण्याचे श्रेय आपणास मिळावे म्हणून त्याच्या साहेबानी अँबेसिडरमधील लोकांच्या झडतीचे काम आपणाकडे घेतले होते. आणि ह्या बसमधल्या पॅसेंजरच्या चौकशीचे काम साहेबानी आपल्या माथी मारले. पाक सैनिक काय अशा बसमधून उजळ माथ्याने, आतले दिवे लावून प्रवास करतील काय ? काहीतरीच साहेबांचे ! अशा विचारात असलेले पोलिसदादा—कंटाळत त्यानी विचारले, " कोणती गाडी ?"

" दिल्ली मुरादाबाद बस सर्व्हिस. रस्त्यात बंद पडली म्हणून आणायला गेलो होतो. " – त्या जे. सी. ओ.ने सांगितले.

आमच्या सगळ्यांचेच कपडे धुळीने माखलेले होते. त्याकडे पहात त्यानं विचारलं, "सगळे मेकॅनिक काय ?"

" आम्ही चौघे मेकॅनिक. पुढचा ड्रायव्हर ! "

" ते काय मला समजत नाही ?" असा प्रश्नार्थक कटाक्ष रागानं आम्हाकडे टाकत पोलीस महाशयानी गाडीची पाहणी केली. मग त्यांचे लक्ष कासिमने आणून ठेवलेल्या भल्या मोठ्या पेटीकडे गेले.

" ह्यात काय आहे ?" पेटीवर पाय देत पोलिसदादानी विचारलं.

' गाडी दुरुस्तीनं सामान—काढून दाखव का ?" तत्परतेनं त्या अधिकाऱ्यानं विचारलं !

पोलिस महाशयानी मानेनेच नको म्हटलं !

ह्या पोलिसाला कोणत्या शब्दात सूचना द्यायची मला समजेना. काही बोललो असतो तर कासिमच्या बंदुकीने माझ्या देहाची निश्चितच चाळण केली असती. कासिमने मोठ्या हुषारीने त्यावर कोट टाकून ती बेमालूम दडवली होती.












पोलिसाने भली दांडगी जांभई दिली आणि दार मोडेल इतक्या जोराने ते आदळून "जाऊ देत" म्हणून खूण केली.

गाडी सुरू झाली. इतरांचा तपास अद्याप चालूच होता. त्या गाड्या व माणसे ओलांडून आम्ही जमुना ब्रिजवर आलो. हा शहादऱ्याजवळचा यमुनेवरचा पूल केवढा मोठा आहे. ह्या एकाच पुलावरून वरच्या बाजूने रेल्वे आणि खालून मोटारींची सतत रहदारी सुरू असते.

पुलावर पोलिसांचा पहारा चालू होता. कर्नल नायरनी सांगितल्याप्रमाणे प्रत्येक महत्त्वाच्या ठिकाणी पहारा अधिक वाढलेला दिसत होता. नेहमीपेक्षा कितीतरी अधिक पोलिस गस्त घालत फिरत होते.

पूल ओलांडून गाडी पलिकडच्या बाजूस आली तशी फिरून ती पोलिसाकडून थांबविण्यात आली. ह्या खेपी पोलीस काही आत आले नाहीत. कुठली गाडी, कुठे निघाली, वगैरे मामुली चौकशी करून त्यानी जायला सांगितलं!

यमुनेच्या किनाऱ्याने आम्ही राजघाटाकडे निघालो. तो ओलांडून इंद्रप्रस्थ मार्गाकडे जाण्याची कासिमने मागून सूचना दिली.

दिवसा गजबजलेला हा रस्ता आता निर्जन होता. दिल्ली म्युनिसिपालिटीचे दिवे जळत होते म्हणून हा शहराचा एक भाग म्हणायचा! एरवी एकही माणूस नाही. मोटार नाही. आम्ही आपले एकटेच निघालो होतो.

कासिम मागून सूचना देत होता तशी गाडी यश वळवत होता, चालवत होता. ह्या कासिमला आणि जे. सी. ओ.ला दिल्लीची उत्तम माहिती असावी.

ते तिघे एकमेकांशी एक अक्षरही बोलले नाहीत. सर्व काही अगोदर ठरल्याप्रमाणे चालले होते. कासिम सूचना देत होता. दुसरे दोघे गप्प होते.

अचानक कासिमने गाडी डाव्या बाजूस वळवायला सांगितली. हा भाग अगदीच निर्जन होता. रस्त्याच्या उजव्या बाजूस खेळाचे मैदान होते. मैदानापलिकडे दुकाने असल्याने आता त्या बाजूस बिलकुल जाग नव्हती.

मैदानाच्या ह्या बाजून दुतर्फा झाडे होती. असेच पुढे गेल्यावर कनिष्ट नोकरांची वसाहत लागते. आम्ही पाच एक मिनिटे तसेच पुढे गेलो असतो तर तेथे पोहोचलो असतो. पण डाव्या बाजूने येऊन मिळणाऱ्या रस्त्याजवळ गाडी येताच कासिमने एकदम गाडी थांबवायला सांगितले.

ह्या डाव्या हाताच्या रस्त्यावर, अंधारात एक डॉज गाडी उभी होती.

आमची गाडी थांबताच त्या गाडीने लाईट एक वेळ लावले व विझवले! ही त्यांची खूण ठरली होती तर–! पेट्रोल पंपावरून केलेल्या मघाच्या फोनचा अर्थ आता माझ्या लक्षात आला.

गाडी थांबली तसा तो जे. सी. ओ. उतरला आणि त्या गाडीकडे निघून गेला. ह्या सर्वांच्याच हालचालीमध्ये एक विलक्षण शिस्त होती. सारे काही पूर्वनियोजित असल्यासारखे आखीव व सुसंगत



अनुक्रमणिका








होते. कोणीही अवास्तव शब्द बोलत नव्हते, कारण नसताना हालचाल करत नव्हते.

तो जे. सी. ओ. परत येईपर्यंत गाडीत स्तब्धता होती. आम्ही सारेच चित्रासारखे बसून होतो. फरक एवढाच की पुढे काय होणार आहे ह्याची त्याना निश्चित कल्पना होती. मी आणि यश त्याबद्दल तर्क किंवा कुतर्क करत होतो.

जे. सी. ओ. परत आला आणि त्यानं त्या अधिकाऱ्यास जे सांगितलं ते आम्हाला काही ऐकू आलं नाही. पण एकंदरीत सर्व त्यांच्या अपेक्षेप्रमाणेच चाललेले दिसले.

त्या अधिकाऱ्यानं आणि जे. सी. ओ. नं ती जड पेटी मोठ्या मुश्कीलीनं उचलली आणि ते दोघे त्या गाडीकडे निघून गेले. गाडीत उरलो आम्ही तिघे. मी, कासिम आणि यश !

कासिम आपल्या जागेवरून हलला नव्हता. तो काय करणार आहे ह्याचा मला अंदाज येईना.

तो लेफ्टनंट फिरून आला. त्याने ती दुसरी छोटी बॅग उचलली आणि कासिमकडे पाहून तो म्हणाला,

" चलो, चलेंगे !"

कासिम सीटवरून उठला. गाडीच्या दारात जाऊन तो भरकन् मागे वळला. हातातली बंदूक त्याने आमच्यावर रोखली.

बाहेर त्या डॉज गाडीत दोघे बसले. गाडीचे इंजिन सुरू करून ते कासिमची वाट पाहू लागले.

कासिम आणि मी एकमेकाना निरखत उभे होतो. मला त्या माणसाची एकदम घृणा आली.

आपल्या उर्मट आवाजात तो म्हणाला.

" चल, ते पैसे दे परत !"

" कां ?" मी विचारले.

"ते पैसे स्वर्गात चालायचे नाहीत."

त्याच्या चेहऱ्यावर खुनशी हास्य होते.

" म्हणजे —?"

" पैसे वापस दे दो ! "— तो जवळजवळ ओरडलाच. मी नोटा काढल्या आणि त्याच्या अंगावर फेकल्या.

आम्हावरील नजर न काढता त्यानं त्या उचलल्या आणि खिशात कोंबल्या.

" अभी अल्ला ताला का नाम ले लो –!"

म्हणत त्याने आपली बंदूक माझ्या रोखाने उचलली. आपल्याला पाहिलेले दोन साक्षीदार मागे जिवंत ठेवण्याइतके ते मूर्ख नव्हते. काही सेकंदातच आपला इहलोकचा प्रवास संपणार हे मला समजून चुकले.

☆☆

## [ ७ ]

त्यावेळी मी फार तर दहा वर्षांचा असेन. पण आजही सारे कसे काल घडल्यासारखे स्पष्ट आठवते. आणि अंगावर सरसरून काटा येतो. माझे वडील फॉरेस्ट रेंजर होते. त्यांच्याबरोबर माझी पॉइंट २२ घेऊन मी ह्या पूर्वीही कितींदा तरी ससे किंवा हरणे मारायला गेलो होतो. पण ही पहिलीच वेळ वाघाच्या शिकारीची !

रात्रीची वेळ होती. आम्ही मचाणावर बसलो होतो. संध्याकाळी मारलेली गाय आमच्या समोरच्या झाडाखाली पडली होती. आम्हाला फार वेळ वाट पहायला लागली नाही. वाघ कोठून तरी अकस्मात गायीजवळ येऊन उभा राहिला. थोडा वेळ स्तब्धतेत गेला. भोवतालचा तो अंदाज घेत असाव ा. गायीभोवती एक फेरी घालून त्यानं खात्री करून घेतली आणि मग भक्ष्याला तोंड लावलं— . . . वडिलांच्या हेड–लाईटचा प्रकाश क्षणमात्र पडला. वाघाचे डोळे दिपले असावेत. वाघ काहीसा बाजूला कलंडला आणि पुढच्याच क्षणी काय होतंय्, समजण्यापूर्वी त्यानं मचाणावर झेप घेतली. त्याची ती गर्जना, कराल जवडा, उग्र आवेश, मी सचैल स्नान केल्यासारखा घामाने भिजून गेलो. मागे सरकलो आणि मचाणावरून खाली कोसळलो. आणि वडिलानी वर्मी घातलेल्या दुसऱ्या गोळीने हवेतून वाघ कोसळला.

मोडलेला हात महिनाभर गळ्यात अडकवून मी फिरत होतो. हात बरा झाला. पण साक्षात् मृत्यूचे ते दर्शन माझ्या स्मृतिपटलावर कायमचा ठसा नोंदवून गेले आहे. अद्यापही त्या स्मृतीने मृत्यूची कडवट चव तोंडात जाणवू लागते.

महाराष्ट्रात गाजत असलेली 'चालू' नाटके.........



' नाटककाराच्या शोधात सहा पात्रे '



दुसरा प्रसंग, नाईट जंपसाठी मी विमानाच्या दरवाजात प्रथम उभा राहिलो तेव्हाचा! काळोखाचा असीम दर्या खाली पसरलेला! ह्यात उडी घ्यायची, ह्या पोकळीत जाणून बुजून आपले शरीर झोकून द्यायचे आणि पॅराशूट नाही उघडले तर?— मला आलेला घाम केवळ त्या जाड कपड्यांमुळे स्मोक डॅनिसन आणि त्यावरच्या हार्नेसमुळं नाही हे मला समजून चुकले होते. लडाखला बर्फ पडताना जशी थंडी हळुहळू आत शिरते, तशी ही भीती हळूहळू ह्या जाड कपड्याच्या आत शिरली, त्यातून माझ्या त्वचेच्या आत, मांसात आणि माझ्या हाडाना जाऊन भिडली. पण उडी मारल्यावर तीन सेकंदातच पॅराशूट उघडले आणि आकाशातील तारे आणि जमिनीवरचे लुकलुकणारे दिवे ह्या दोन्हीमध्ये अलगद, मजेत तरंगू लागलो.

त्यानंतर आजवर, मला मृत्यूची भीती वाटेल असा तिसरा प्रसंग घडला नाही. कदाचित् ह्याचं श्रेय कल्पनेला दिलं पाहिजे. जास्त बरोबर सांगायचं म्हणजे तिच्या वडिलानाच दिलं पाहिजे. कच्छच्या रणात आजुबाजूला तोफांचे गोळे पडत असताही मी बॅटरीपासून हाललो नाही. लोकाना वाटलं, मी संपलो, तेंव्हाही मी रेंज सांगत, तोफेचं बेअरिंग देत राहिलो ह्याचं कारण— मला वाटतं, मला जीवनाबद्दल फारशी आस्थाच उरली नसावी. एक प्रकारचा वेडा त्वेष, राग ह्यानी मनात दुसरे विचार यायला जागाच ठेवली नाही. हा राग कुणाचा? कल्पनेचा—तिच्या वडिलांचा?

कल्पनेवर मला रागावता येणंच शक्य नव्हतं. तिच्या वडीलांवर तरी मी कां रागवावं?—माझा राग होता स्वतःवरच!

जीवनाला माणूस कंटाळतो तेव्हा मृत्यू त्याच्याकडे पाठ फिरवून उभा रहातो.

मी येथे मरणार नाही ह्याची मला मनोमनी खात्री होती. वास्तविक तशी आशा बाळगायला कोणतंच कारण नव्हतं.

—कासीमला दुसऱ्याला मारण्यात एक आनंद होता, तो त्याच्या खुनशी मुद्रेवर प्रकट झालेला होता.

त्याच्या हातातील स्वयंचलित बंदूक कोणत्याही क्षणी उडेल आणि माझ्या अंगातून दहापाच गोळ्या आरपार जातील. काही क्षणांचाच प्रश्न! पण ह्या कासीमच्या रूपाने मृत्यू समोर आला तशी जीवनाबद्दलची आसक्ती उफाळून उठली. दुसऱ्या कशाकरिता नाही, ह्या पॅराट्रुपर्सना शोधून काढण्याची कामगिरी हातून पुरी व्हावी म्हणून असेल, पण माझी मरायला तयारी नव्हती. ह्या कासीमच्या हातून तरी नाहीच नाही.

—आणि ह्याच वेळी एकाएकी गाडीतील दिवे बंद झाले. मी सीटखाली डुबी मारली, कासीमच्या हातातील बंदूक उडाली आणि माझ्या डाव्या खांद्यातून एक जळते लोखंड आरपार गेले. यशच्या पिस्तुलाचा आवाज झाला आणि ओरडून कासीम दारातून खाली पडला. तो उठतो आहे तोंवर पलिकडच्या गेवरलेटमधून गोळ्यांची एक फैरी झडली आणि कासीमच्या अंगाची चाळण झाली. वेगाने ती गाडी निघून गेली.

सारे क्षणार्धात् घडले. खांदा अद्याप जळत होता. आतले रक्त पेटल्यासारखे भासत होते. पण थांबायला सवड नव्हती. मी कासीमकडे धावलो. यशची गोळी त्याच्या डाव्या दंडावर लागली होती. त्याच्याच सहकाऱ्यांच्या बंदुकीने त्याच्या शरीराची चाळण झाली होती. पण अद्यापही थोडी धुगधुगी होती.

त्याचा गळा पकडत मी त्वेषाने ओरडलो, "बोल, ते दोघे कुठे गेले? बोल—!"

माणूस किती क्रूर होऊ शकतो! हे क्रौर्य मला वाटते, त्याच्या अंगी नेहमीच सुप्तावस्थेत असते. ते क्रौर्य शत्रूच्या अंगी आहे हे आपण गृहित धरलेले असते. पण तेच आपल्याही अंगी असल्याची भयानक जाणीव आपल्याला ज्या क्षणी होते तेव्हा स्वतःचीच लाज वाटते. युद्धाचा त्वेष दुसऱ्याचे क्रौर्य पाहूनच येतो आणि आपण जेव्हा तेवढेच क्रूर आहोत हे दिसतं तेव्हा युद्धाचा उबग येतो.

युद्धात काय गौरव असेल ते कधी लढले नाहीत, त्या लेखक आणि कवी लोकाना माहिती, ज्यानी लढाईचा आवाजही ऐकला नाही त्या पुढाऱ्याना आणि सैनिकाच्या

मृत्यूचे आणि त्याने मिळवलेल्या विजयाचे भांडवल करणाऱ्या नेत्याना माहिती, मला तर युद्ध म्हणजे सामुदायिक कत्तली, खून आणि रक्तपातच सगळीकडे दिसतात. एक विमनस्क पोकळी माझे मन ग्रासून टाकते, जेव्हा जेव्हा मी युद्धाचा विचार करतो तेव्हा आणि पूर्वी तैमूरलंग, चेंगीझखान, नादिरशहा ह्या साऱ्यानी केलेल्या क्रूर कत्तलीत आणि आधुनिक युद्धात केवळ त्याच्या वाढत्या विनाश शक्तिपलिकडे काही फरक दिसत नाही.

पण त्यावेळी ह्यातले काही आठवले नाही. थोडी फार धुगधुगी असलेल्या कासीमशी मी अमानुषतेने वागलो आणि युद्धात सारंच क्षम्य असतं म्हणून मला कुणी दोषीही धरणार नाही. युद्धाची हीच शोकांतिका आहे.

त्या खुनशी कासीमचा चेहेरा एकदम बदलला होता. आपलेच सहकारी आपल्याला गोळ्या घालतील असे त्याला कल्पनेतही वाटले नव्हते.. पण त्यांचा नाइलाज होता. दिल्लीच्या भरवस्तीत गाडीतल्या दोघांबरोबर बंदुकीच्या फैरी झाडत रहाणं त्यांच्या दृष्टीनं कमालीचं धोक्याचं होतं आणि आम्ही आतून गोळ्या घालण्याची शक्यता असल्यानं, जखमी कासीमला उचलून स्वतच्या गाडीत घेणंही अशक्य झालं असावं.

कासीमला मी बोलता करण्यासाठी जे करता येणे शक्य होते, ते सारे प्रयत्न केले. त्यात त्या मरणाऱ्या माणसाचे सुख-दुःख पाहिलं नाही. जेवढ्या यातना त्याला झाल्या असतील त्या त्यानेच स्वतःवर ओढवून घेतल्या आहेत असे मला वाटत होते. आणि ह्यात अमानुषता कसली ? युद्ध सुरू झाल्यावर मानवता संपते का मानवता संपल्यावर युद्ध सुरू होते ह्याचं उत्तर, युद्ध पेटवणाऱ्या माणसानाही सांगता येणार नाही.

सारे हाल भोगूनही कासीम बोलला नाही. त्याची परिसीमेची सहनशक्ती की हे हाल होत आहेत हे कळण्याची जाणीव हरपल्यामुळे—मला ठाऊक नाही, पण याने ते दोघे कोठे गेले किंवा ते काय करणार आहेत ह्याबद्दल एक अक्षरहीक ढळे नाही. जर ते सर्व त्याला यातना जाणवत असताही केवळ मनोनिग्रहाच्या जोरावर त्यानं केलं असेल तर त्याला पाक सरकारनं मरणोत्तर मानचक्र द्यावं असं मला वाटलं.

पण हे सारे यशच्या घरी गरम गरम चहाचे घुटके घेताना वाटत आहे.

कासीम बेशुद्ध झाला तेव्हा यशने मला जागे करावे तसे हलवले.

"तुमचा खांदा बांधायला हवा. त्यातून रक्त ओघळते आहे." — तो म्हणाला.

माझ्या खांद्यातली कळ आता हृदयात गेली होती. त्यामुळे खांदा बधीर झाला होता.

दोन माणसे माझ्यासमोरून फिरून निसटली होती. आणि सापडलेला माणूस बोलायला तयार नव्हता. फिरून मला त्वेष आला. कासीमला मारण्यासाठी उगारलेला माझा हात धरत मला यश म्हणाला, "एवढ्यात पोलिस येथे येतील.











अनुक्रमणिका

तुम्हाला अशा अवस्थेत ते पहातील तर पकडून लॉक-अपमध्ये टाकतील. तुमची सुटका होईपर्यंत ते पॅराट्रुपर्स काहीही करू शकतील –!"

मी स्वतःकडे प्रथमच पाह्यलं. अगोदरच मळलेले कपडे ! आता खांद्यातून वहाणाऱ्या रक्ताने लाल झालेले, दोन्ही हात कासीमच्या जखमातून येणाऱ्या रक्ताने माखलेले . . . मी कोण हे सांगूनही पोलिसानी मला सोडले नसते.

यशने मला ओढले आणि आम्ही दोघानी धावायला सुरुवात केली.

" कुठे ?"— मी पळता पळता विचारले.

"मी नीट नेतोय् ! "—अशी खूण करीत यशने मला धावत रहायला सांगितले.

पॅराट्रुपरना पाठीवर सामान घेऊन २०–२० मैलांचे अंतर धावायला लावतात. पण ह्या ५ मिनिटांइतके धावणे मला कधीच कठिण वाटले नव्हते.

कोणत्याही क्षणी माझी शक्ती संपेल आणि मी रस्त्यावर कोसळेन अशी भीती सतत वाटत होती. दूरवर पोलिसांच्या गाडीचा सिरेनचा आवाज पहाटेचा काळोख कापत ऐकू आला आणि त्याने फिरून थकलेल्या पायांना शक्ती आणली.

दहा-एक मिनिटात आम्ही पहाडगंजला पोहोचलो. डाव्या हाताच्या दुसऱ्याच घरापाशी यश थांबला. दारावर बेल होती. पण बटण न दावता त्याने दार वाजवल. अर्ध्या-एक मिनिटात दार किलकिले झाले. आणि यशला पहाताच दार उघडले गेले.

ज्या मूक अस्वस्थतेनं, काळजीनं आणि आनंदानं यशचे स्वागत त्या टप्पोऱ्या काळ्याशार डोळ्यानी केले, त्याने माझ्या अंतःकरणात फिरून कळ उठली . . . कल्पनेच्या आठवणीची.

" काय अवस्था झालीय् तुमची ?"— पंजाबीत ती म्हणाली. त्याच्या अंगावरून तिची थरथरती बोटे फिरत होती.

" हो, हो, आत तर येऊ देशील ?"— म्हणत यश बाजूस सरकला तसा पहिल्यांदाच मी तिला दिसलो. माझ्या अवताराकडे पहाताच ती दचकलीच.

" हे काय ? रक्त ? काय झालंय् . . . ?"

" आत येऊ दे, सांगतो !"

ती लगबगीनं बाजूस सरकली. आम्ही दोघे आत शिरलो. समोरच एक बैठकीची खोली होती. त्यात झोपलेले यशचे वडील असावेत. त्याना आमची जाग न देता, आम्ही पलिकडच्या खोलीत गेलो. खोलीत एक चारपाई होती. जमिनीवरच दोन गाद्या घातल्या होत्या. त्यावर मध्यभागी आरामात यशची मुलगी झोपली होती. गोरीपान, गोबऱ्या गालांची घरी केलेल्या गुलाबी रजईत गुंडाळलेली ४–५ वर्षांची मुलगी दिसायला यशसारखीच होती.

यशने मला चारपाईवर बसवले. मागच्या बाजूस स्वयंपाकघर असावे. यशने चारपाईखालची बॅग काढली. घरात लोखंडी कपाट नव्हते. अद्याप संसार बॅगांमध्येच ठेवलेला दिसत होता. बॅगेतून त्याने कापसाची गुंडाळी काढली. तोवर त्याची बायको गरम पाणी घेऊन आली. यशने मला त्यात हात बुडवायला लावले. माझ्या हातावर गोठलेले रक्त कासीमचे होते. मला त्याची घृणा आली नाही, वाईट वाटले. प्रथमच वाईट वाटले. उगीचच हळहळ वाटली.

गरम पाणी लाल झाले. मनात आले, थोडक्यात चुकले. एरव्ही कासीमच्या हातावर माझे आणि यशचे रक्त असते. आणि असावं तो, ह्यावेळी ते डाग धूत बसला असता. कित्येक वेळा, पॅराट्रुपरच्या जीवनात आपण जिवंत आहोत हाच अपघात वाटू लागतो. ते पाणी फेकून देऊन, यशच्या बायकोने दुसरे पाणी आणले. दोघानी मिळून माझी जखम धुतली. यशने विचारले –

" आपण डॉक्टरकडे जाऊ या ? अद्याप रक्त येतच आहे !"

"तेवढा वेळ आहेच कुठे ? आपल्याला निघायला हवं !"

यशची बायको पुढं झाली. एक दोरी घेऊन तिनं जखमेच्या वरती माझा दंड



## बाजीराव—मस्तानी

तो :— आमुची मराठी बोली
कळत का तुला ?

ती :— बोल बोलीचे कुणाला
हृदय बोली उगता
हांसरी नजर सजणाची
पुरेशी बोलि हो मजला !

तो :— आमुची मराठी चाल
रुचत का तुला ?

ती :— चाल-चाली कां कधीं त्या
चालल्या प्रेमापुढे ?
पजकडे ओढ सजणाची
पुरेशी बोलि हो मजला.

तो :— आमुचा मराठी देश
गमत का तुला ?

ती :— देशवेषांनी कुठें कां
अंतरें स्नेहाळली
प्रियाच्या स्कंध देशींचा
मोहवी स्वर्ग हा मजला

तो :— आमुचा मराठी बाणा
विदित का तुला ?

ती :– खड्ग बाणा तुझा राया
बाणला माझ्या मनीं
वंचना न होईल माझी
भरंवसा मला, तुझा हा

– अमृतानंद
नागपूर

बांधला. अगदी घट्ट; त्या दोरीत एक पेन्सिल घातली आणि तिचे वेढे द्यायला सुरुवात केली. दोरी घट्ट घट्ट होत चालली.

"दुखत नाही ना ?" तिनं विचारलं.

" तुम्हाला बरीच माहिती दिसते भाभीजी !" मी हसून म्हणालो.

"थोडी. मी फर्स्ट एडच्या क्लासला जात होते !"—रक्त यायचं थांबलं. त्यावर कापसाचा मोठा तुकडा ठेवून तिनं जखम बांधून टाकली. त्या स्पर्शात अगत्य होतं, सफाई होती.

जखम बांधून झाली तसा मी यशला म्हणालो,

" चला, निघू या आपण!"

" छे छे एवढ्यात मी नाही जाऊ द्यायची तुम्हाला !" —आम्ही सैन्यातले अधिकारी, पण ज्या सहजतेने स्त्रिया अधिकार गाजवतात, आज्ञा सोडतात, ती आम्हालाही जमायची नाही.

मी म्हणालो, "आता आग्रह करू नका भाभीजी, आम्ही परत येऊ !"

"परत तर याच पण एवढ्यात जायचं नाही. "

" पण —!"

" हे पहा, अशा कपड्यात बाहेर पडाल तर पोलिस पकडतील तुम्हाला. तुम्हाला ह्यांचे कपडे बरोबर येतील. तोवर आलेच मी. "

भाभी निघून गेली.

यशने मला माझा शर्ट काढायला मदत केली. तोंड धुवून, कपडे बदलले तशी मला खूपच हुषारी वाटू लागली. आता फिरून निघायची घाई मला अस्वस्थ करू लागली. एक क्षणही येथे थांबू नये, दरम्यान काय उत्पात होतील ह्याची काळजी वाटू लागली. काहीतरी भयानक एवढ्यात घडले असेल असे उगीचच वाटू लागले.

एवढ्यात यशची बायको चहा, त्याचबरोबर भली मोठी बशी भरून बिस्किटे घेऊन आली. वाफा येणारा गरम चहा तिने कपात ओतला. त्याचा वास नाकात शिरला, तसा मला उत्साह आला. आम्ही चहा घेऊ लागलो तशी भाभीजी, मुलीजवळ जाऊन बसली. तिच्या केसातून हलकेच हात फिरवत, कानाशी कुजबुजली—

" मुन्नी, पाहिलंस का, कोण आलंय् ? शू:, ए तुझे बाबा आलेत "—

माझ्या आईची आठवण आहे ती अगदी अस्पष्ट ! घरी एक फोटो आहे माझ्या आईचा ! फोटोतून ती माझ्याकडे पहात असते, माझ्याशी हसत असते—असं मला वडिलानी सांगितल्यामुळे वाटत असे. मी दीड दोन वर्षाचा असतानाच साध्या तापाचं निमित्त होऊन ती वारली. मरण्यापूर्वी वडिलाना जवळ बोलावून क्षीण आवाजात म्हणाली, " हे पहा, मी फार लवकर तुम्हाला सोडून जाते आहे. एक मागणं आहे. नाही म्हणायचं नाही. तुम्ही एकटं रहायचं नाही. दुसरं लग्न करा."

वडिलानी दुसरं लग्न केलं नाही. म्हणत, "तुझ्या आईसारखं माझ्यावर दुसरं कोणी प्रेम करणार नाही."— मी आईसारखाच दिसतो असं ते म्हणत आणि त्यामुळे तर त्यांचं माझ्यावर विलक्षण प्रेम होतं.

पण त्यानी मला असं कानाशी हलकेच गोड गोड शब्द बोलून उठवलेलं कधी आठवत नाही. त्याकरिता अशी आईच हवी. छोटी उठली. सुस्तावलेल्या डोळ्यानी तिनं आईकडे पाहिलं, मोठ्या माणसासारखा हात वर करून आळस दिला. कोणी भलत्या वेळी दिवा लावला आहे, असा रागाचा, कपाळाला आठ्या घालून एक कटाक्ष माझ्याकडे टाकला आणि मग तिला यश दिसला.

डोळे फिरून मिटून तिनं यशकडे हात केला. तिला उचलून यशच्या मांडीवर ठेवत भाभीजी माझ्याकडे वळल्या —

"नाही, नाही, एक कप चहा घेऊन मी तुम्हाला उठू देणार नाही, "— आणि त्यानी फिरून माझा कप काठोकाठ भरला. मुन्नी तिच्या बाबांच्या मांडीवर विसावली

अनुक्रमणिका








होती. एक हात वर वर करून बाबांच्या गालाला कुरवाळीत होती. मग तिनं विचारलं,

" बाबा, हत्ती आणला का ?"

"हत्ती ?"

" मला तुम्ही सांगितलं होतं, शाळेत जायला सुरवात कर, हत्ती जाणून देतो तुला. हत्तीवरून मी शाळेत जाणार बाबा!"

"हत्ती करायला टाकलाय्. झाला की आणेन !"

"मला लाकडाचा नकोय् ! खराखुरा, सोंड हलवणारा हत्ती हवाय्."

" आणू, आणू !"— म्हणत यश उठला.

त्या कुटुंबाचे सुख पाहून मी तृप्त झालो. मी असलं काही पाहिलंच नव्हतं. शाळेचे दिवस हॉस्टेलमध्ये गेले. कॉलेजचे दिवस कल्पनेच्या सहवासात ! कल्पना–फिरून कल्पना !

"भाऊजी, फिरून कधी याल ?"

" येईन. एक दोन दिवसातच !"

" खरंच या. ! हे बरोबर नसले तरी एकटे या. ह्यांचा नेम नाही. फिरून दुसऱ्याच कोणत्या तरी कामाला सुरवात करतील!"

" मी येईन. न संकोचता, यश बरोबर नसला तरी तुमच्या हातचा गरम चहा घेऊन जाईन !"

मुन्नी फिरून झोपेच्या आधीन झाली होती. बहुतेक ती हत्तीवरून शाळेत चालली असावी. बाहेरच्या खोलीत यशचे वृद्ध वडील झोपले होते. त्याना रात्री झोप येत नाही. पहाटे पहाटे डोळा लागतो. फिरून त्यांची झोपमोड होऊ नये म्हणून आवाज न करता, आम्ही घराबाहेर पडलो.

मी विचारले—"आता कुठं ?"

" ज्या गाडीतून ते गेले तिच्या मालकाला मी ओळखतो. आपण त्यांच्याकडे जाऊ."

आम्ही एक टॅक्सी थांबवली. टॅक्सीत बसता बसता सकाळी ताजा पेपर घेऊन चाललेल्या मुलाकडून उगीचच मी पेपर विकत घेतला.

युद्धात आम्ही पाकिस्तानच्या निकामी केलेल्या रणगाड्यांची संख्या वाढती होती.

माझी 'स्टॉप प्रेस' मधील तीन-चार ओळींच्या एका बातमीवर नजर गेली. आणि कोणी डोक्यात घणाचा घाव घालावा तशी क्षणमात्र डोळ्यांपुढे अंधारी आली. माझी जाणीवच हरवली. आणि त्या त्वेषाने मला पुरं ग्रासून टाकलं.

बातमी होती —

"आज पहाटे काही अज्ञात इसमानी हल्ला करून कैदेत असलेल्या पाक अधिकाऱ्याला पळवून नेले. त्याना थांबवण्याचा प्रयत्न करीत असताना भोसकल्यामुळे, हॉस्पिटलमध्ये ड्यूटीवर असलेले कॅप्टन डॉक्टर वर्मा आणि एक पहारेकरी जागचे जागी ठार झाले. पोलिस अज्ञात इसमांचा तपास करीत आहेत."

☆ ☆



[ ८ ]

"कर्नल नायर"—पलिकडून तत्परतेने आवाज आला. हा माणूस टेलीफोनपासून गेले तीस बत्तीस तास हालला नसावा. पण मला आता त्याचे कौतुक राहिले नव्हते.

"बत्राबद्दल आज सकाळी . . ." मला शब्द सापडेनात.

"मेजर हुसेनना पळवून नेण्याच्या झटापटीत डॉक्टर बत्रा ठार झाले, हे खरे आहे !" कर्नल नायर म्हणाले.

माझा राग एकदम उफाळून आला. "कर्नल नायर, तुम्ही सिनियर ऑफिसर आहात. मला माफ करा पण तुम्ही ह्या सगळ्या गोष्टींचा गोंधळ करून टाकला आहे !"

"मी—?"

"हो तुम्ही ! पाक सैनिकांकडून जे सामान मिळालं त्यावरून कोणत्याही अनुभवी अधिकाऱ्याला कल्पना यायला हवी होती की आता त्यांच्याकडे दारुगोळा नाही. भारतीय पळत नाही. त्याचा फिरून त्याना पुरवठा होणार, कदाचित जुनाच ड्रॉपिंग झोन ते त्याकरिता वापरणार !"

"त्याकरिता तेथे पोलिस ठेवले होते !"

"पोलिस—! पोलिस ठेवले असताही त्यानी दारुगोळा हस्तगत केला आणि त्यांच्या देखत ते तेथून पसार झाले !"

"पण —!"

"कर्नल नायर, तेथून ते दिल्लीत येतील आणि हरिपुरातील चौकी जर त्यानी मेजर हुसेनना सोडविण्यासाठी पेटवून दिली, पोलिसाना गोळ्या घालून मारले, तर येथेही ते मेजर हुसेनना पळवून नेण्याचा प्रयत्न करतील हे तुमच्या लक्षात यायला हवं होतं."

"त्यांचा तो शुद्ध वेडेपणा होता. कोणत्याही शहाण्या माणसानं असला धोका पत्करला नसता."

"शहाणी माणसं शत्रूच्या प्रदेशात विमानातून उड्या मारत नाहीत. काहीसा असा वेडेपणा अंगी असल्याखेरीज कॅमांडोना यश मिळत नाही. सर्वसाधारण माणसं 'अशक्य' म्हणून ज्या गोष्टींचा विचार सोडून देतात, तेथूनच हे सैनिक सुरुवात करतात–आणि यशस्वी होतात.

मिलीटरी हॉस्पिटलमध्ये मी गेलो होतो तेव्हा मेजर हुसेनना दिलेली खोली पाहिली आणि त्याच वेळी माझ्या लक्षात आलं की ही खोली अगदी एका बाजूला आहे. कम्पाऊंडच्या भिंतीजवळ आहे आणि तेथे पहारा पुरेसा नाही."

"हे पहा बत्राबद्दलच्या तुमच्या भावना मी समजू शकतो. पण त्याची आठवण काढत बसून, असा त्रागा करून तो काही फिरून जिवंत होणार नाहीत."

"कर्नलसाहेब —!"

"थांबा, माझं बोलणं प्रथम पूर्ण होऊ दे. डॉक्टर बत्राचं जे झालं ते आणखीन् हजरांचं होऊ नये म्हणून ह्या सैनिकाना शक्य तितक्या लवकर पकडलं पाहिजे. तुझी काही प्रगती —?"

मी बोललो नाही. तसे कर्नल नायरच पुढे बोलू लागले,

"हे पहा, हे सैनिक आज पहाटे दिल्लीत, एका बसमधून आल्याचं आम्हाला समजलं. ड्रायव्हरसह एकूण पाच माणसं होती. त्या पांचापैकी एकजण पोलिसाना बसजवळच मृतावस्थेत सापडला. मरणापूर्वी त्याचे खूप हाल करून कुणीतरी त्याच्याकडून माहिती काढण्याचा प्रयत्न केला असावा असे दिसते. म्हणजे पाचापैकी चारच राहिले.

पण मिलीटरी हॉस्पिटलमध्ये झालेल्या झटापटीत फक्त दोनच सैनिक होते. एक बाहेर गाडीत होता. म्हणजे फिरून एका माणसाचा पत्ता लागत नाही.

हे दोन सैनिक भिंतीवरून उतरून हॉस्पिटलच्या आवारात आले. मेजर हुसेनच्या खोलीसमोर पहाऱ्यावर असलेल्या पहारेकऱ्यास त्यानी ओरडण्याचीही संधी दिली नाही. त्याचे तोंड दाबून त्यानी त्यास भोसकले. काही क्षणातच त्यानी त्यास खलास केले. It was a perfect job done with excellent efficiency. थोडाही वेळ न घालवता त्यानी मेजर हुसेनना उचलून बाहेर आणले. पण हॉस्पिटलची भिंत मेजर हुसेनना लवकर चढता येईना. ह्याच वेळी डॉक्टर बत्राने त्याना पाहिले. ते तिघे, बत्रा एकटा ! बत्रा एकदम धावला आणि त्याने हुसेनना मिठी घातली. हुसेन आणि तो इतक्या जवळ होते की दुसऱ्या दोघाना त्याला












गोळीही घालता येईना. बन्नानं मोठ्यांदा हाका द्यायला सुरूवात केली. पहाटेच्या शांत वेळी त्या हाकेने रुग्ण सैनिक दचकून जागे झाले. बिछान्यावरून ते त्या स्थितीत मेजर हुसेनच्या खोलीकडे येऊ लागले. मग पाक सैनिकाना इलाजच उरला नाही. बन्ना हुसेनना मुंगळ्यासारखा चिकटलेला. एकाने त्याला खेचून बाजूला काढले, आणि दुसऱ्याने त्यास भोसकले. भल्या मोठ्या चाकूचं पातं मुठीपर्यंत काळजात घुसलं. बन्ना खाली कोसळला."

"कर्नल नायर—!"

"वेट ए मिनिट! पोलिसाना जे बसमधल्या पाच इसमांचं वर्णन मिळालं आहे त्यात एकाचं वर्णन तुझ्याशी बरेच मिळतेजुळते आहे. पोलिसांपासून दूर रहा. तू आमचा माणूस आहेस हे, त्यानी तुला पकडलं तर, त्याना सांगायला आणि तुला सोडवून आणायला वेळ मिळायचा नाही. आज, नव्हे काही तासात आता त्यांचा पत्ता लागायला हवा.

Wish you best luck!"

मी बोलायच्या आत टेलिफोन बंद झाला.

बन्नाच्या मृत्यूची बातमी ऐकल्यापासून माझं चित्त ठिकाणावर नव्हतं. रस्त्यात दिसलेल्या पहिल्या टेलिफोनजवळ टॅक्सी थांबवून मी कर्नल नायरना फोन केला, तेव्हा मी रागानं जळत होतो. त्यांच्यावर, ते वरिष्ठ अधिकारी आहेत हे विसरून मी तो राग काढला. आता राहिला तो त्वेष! मी यशला म्हणालो, "आता काहीही होवो यश आपण त्याना पकडायचेच ! मी बन्नाच्या खुनाबद्दल त्याना माफ करणार नाही. त्याचा हिशेब मी चुकता करेन !"

यश बोलला नाही. ड्रायव्हरनं मागं वळून विचारलं, "कुठं घेऊ साहेब ?"

"करोल बाग. आर्य समाज रोड !"—यशने त्यास सांगितले. त्या दोघांच्या ह्या प्रश्नोत्तरामुळे मी भानावर आलो. अशा गाडीत काहीही बोलणे धोक्याचे होते. मख्ख चेहरा करून. काहीही न ऐकल्याचा भाव चेहऱ्यावर आणून गाडी चालविण्याऱ्या ड्रायव्हरचे कान काही वेळा नको तेवढे तीक्ष्ण असण्याचा संभव होता.

आर्य समाज रोडवर पंजाब कमर्शियल बँकेजवळ यशने गाडी थांबवली. ड्रायव्हरला पैसे देऊन आम्ही टॅक्सी सोडून दिली. सकाळचे सात वाजले होते. रस्त्यावर तुरळक माणसे दिसत होती. एरव्ही सारे शांत होते.

रस्त्याच्या उजव्या बाजूस एक बंगला होता. बाहेर छोटया कंपाऊंडमध्ये बगीचा केला होता. बाहेरील बाजूसच जिना होता, तो चढून आम्ही वरच्या मजल्यावर आलो. दारावर शुद्ध हिंदीत पाटी होती. "हरिचरण महरेश." बंगल्याचा सगळा वरचा मजला ह्या गृहस्थाकडे असावा.

दाराची बेल वाजवताच तत्परतेने दार उघडण्यात आलं. आमच्यासमोर उत्तर प्रदेशातला बळदंड शरीराचा भैय्या उभा होता. ह्यानं कधी काळी कुस्तीत नाव मिळवलेलं असावं. अद्यापही त्याचं पुष्ट भरलेलं शरीर प्रमाणबद्ध होतं. आम्ही महरेशना भेटायचं आहे म्हणून सांगितलं तसं "शेट आहेत, बसा !" असं त्यानं मोठ्या अदबीनं सांगितलं आणि शेटना बोलवायला तो आत निघून गेला.

खोलीत राधाकृष्ण, रामाला सीता सुवर्णमृग दाखवते आहे, कुरुक्षेत्रावर अर्जुन व कृष्ण अशा पाच सहा तस्बीरी होत्या. गांधी व नेहरू बोलत बसले आहेत असं खास तयार करून घेतलेलं तैलचित्र होतं. सकाळची वेळ असूनही खोली कमालीची स्वच्छ दिसत होती. गालिचावरच्या भल्या मोठ्या बिछायतीवरच्या पांढऱ्या शुभ्र चादरीला कोठेही चुण्या नव्हत्या. घरात उदवत्तीचा सुगंध दरवळत होता.

महरेश बाहेर आले. त्यांची स्नानसंध्या नुकतीच झालेली असावी. अंगावर परीटघडीचे पांढरे शुभ्र धोतर व कुडता होता. कपाळावर चंदनाचे गंध होते.

प्रसन्न हास्य करत ते म्हणाले, "बसा, बसा मी आपली काय सेवा करू शकतो ?" गृहस्थ बोलण्यात मिठ्ठास होता. डोक्यावर फारसे केस नव्हते. जे होते ते सगळे सफेत झाले होते. तरीही ह्या गृहस्थाचे बाळसे अद्याप कायम होते.

महाराष्ट्रात गाजत असलेली 'चालू' नाटके




झाला अनंत हनुमंत



अनुक्रमणिका

यश म्हणाला, " शेटजी काही खाजगी बोलायचं होतं."

" बोला बोला."

"नाही शेटजी इथं नाही बोलता यायचं!"

"अस्स ! मग आत चला ना !"

आत जाता जाता ते मोठ्यांदा म्हणाले, 'राम अवतार, जरा दोन कप गरम चहा घेऊन ये !"

आतली खोली लहानच होती. खोलीत एक मोठी चौपायी होती. त्यावर स्वच्छ बिछायत अंथरलेली होती. शेटजी म्हणाले, "बसा –"

उभ्या उभ्या यशने एकदम प्रश्न विचारला,

"आज पहाटे ३॥–४ च्या सुमारास तुम्हाला एक फोन आला होता, आणि तुम्ही जी गाडी पाठवलीत, ती आता कुठं आहे ?"

अट्टल जुगाऱ्याचा चेहरा निव्वळ निर्विकारच असतो. पण शेटजींचा चेहरा सदाचाच प्रसन्न होता. मृदु हास्य करत ते म्हणाले,

" आपला काही तरी गैरसमज झालेला दिसतो. मला पहाटे ४ वाजता कुणाचा फोन येणार ?"

"शेटजी, कुणी फोन केला होता आणि कशाला ते मला माहीत आहे."

"मग मला कशाला विचारताय् ?"

"मी विचारतो आहे शेटजी तुम्ही पाठवलेली गाडी कुठं आहे आता ?"

"ज्यानं फोन केला तो माणूस तुमच्या माहितीचा आहे ना. मग त्यालाच विचाराना !"

"शेटजी तुम्हाला ठीक उत्तरं द्यायची आहेत की नाही ?"

"तुम्ही कोण आहात –? माझ्या घरात येऊन मलाच दम देताहात ?"

—शेटजींच्या चेहऱ्यावरची सारी प्रसन्नता क्षणात नष्ट झाली. भिंतीवरच्या देवाच्या तस्वीरी, ही पांढरी शुभ्र बिछायत त्याचप्रमाणं चेहऱ्यावरचा प्रसन्न भाव हे शेटजींच्या धंद्याचं भांडवल होतं. पाहिजे तेव्हा त्याना उतरवून ठेवता येण्याजोगा तो एक मुखवटा होता.

यश हमरीतुमरीवर येत म्हणाला, "शेटजी तुम्ही हवी ती माहिती देता की पोलिस चौकीवर येता ?"

"ओ हो पोलिस आहात तर तुम्ही ! मग अशी चोरासारखी कां चौकशी सुरु केलीत ? बरं, वॉरंट असेलच तुमच्याजवळ !"

यश बोलला नाही.

"काय गोंधळ चालवला आहात तुम्ही माझ्या घरात घुसून ! हे पहा माझ्या दहा एक टॅक्सी आहेत. कबूल करतो एक दोन प्रायव्हेट टॅक्सी आहेत. त्यात केव्हा कोण बसून कुठं जातं ह्याची यादी मी ठेवत नाही. तुम्हाला मी काही गुन्हा केलाय् असं वाटत असेल तर जा आणि वॉरंट घेऊन या !"

यशचा स्वर चढला, " शेटजी, भारत-पाक युद्धात तुम्ही पाकिस्तानला मदत करत आहात. त्यांचे हेर तुमच्या गाड्या वापरतात. आज सकाळी एका पाक अधिकाऱ्यास तुमच्या गाडीतून पकडून नेण्यात आले. तुम्ही बऱ्या बोलानं जबाब द्या नाहीतर — !"

"उठा. तुम्ही माझ्या घरातून बाहेर व्हा !"

यश त्या उर्मटपणानं पेटून उठला. त्यानं शेटजींचा हात पकडला. त्यांच्या दंडाला धरून तो म्हणाला, "चला, मी तुम्हाला चौकीवर घेऊन चाललो आहे."

आणि त्याच वेळी बलदंड शरीराचा राम अवतार हातात चहाचे दोन पेले घेऊन दारात आला. निर्बुद्ध चेहऱ्यानं त्यानं हे सारं पाहिलं आणि विचारलं, "की शेट, की तकलीफ है ?"

ह्या साऱ्या प्रकाराचा मला उबग आला होता. यशने साराच मामला विघडवून टाकला होता. आता ह्यातून काहीच निष्पन्न होण्याची शक्यता नव्हती. पोलिस स्टेशनवरून पोलिस आणून, शेटजींना पकडून खऱ्याखोटयाची शहानिशा करण्याइतका वेळही नव्हता.

मी यशचा हात धरून म्हणालो, "चल आपण जाऊ या !"

"नाही, नाही. मी ह्याना घेतल्याखेरीज निघणार नाही !"

शक्य तितका आवाज खाली ठेवत मी म्हणालो, "झाली तेवढी शोभा पुरे झाली. चल आता !"

राम अवतार यशच्या जवळ येऊन उभा राहिला होता. शेटजींचा एक इषारा मिळाला असता तर त्याने यशला अक्षरशः उचलून बाहेर फेकला असता. यशने शेटजींकडे एक वेळ पाहिलं. सारा राग त्याच्या नजरेत अंगारासारखा फुलला होता. शेटजींचा हात सोडून, मोठ्या प्रयासानं तो मला म्हणाला, "चला !"

शेटजीना व राम अवतारला तेथेच सोडून रागाने धुसफुसत असलेल्या यशला घेऊन मी जिना उतरलो. ह्या अवाढव्य दिल्ली नगरीने त्या तीन पाक सैनिकाना गिळून टाकले होते. त्याना शोधून काढायला आता कोणताच दुवा आमच्या हाती राहिलेला नव्हता.

☆ ☆

[९]

टॅक्सीसाठी शेटजीच्या बंगल्याकडून आम्ही गुरुद्वार रोडच्या टॅक्सी स्टॅण्डकडे निघालो होतो. इतक्यात मला थांबवत यश जवळजवळ ओरडलाच,

"ती पहा, तीच ती गाडी !"

हिरव्या रंगाची शोवरलेट आमच्या समोरून येत होती. क्षणार्धात मी ओळखले हीच ती गाडी. आज पहाटे पाहिलेली !

गाडी आली आणि शेटजींच्या बंगल्यासमोर थांबली. मी आणि यश दोघेही धावलो. ड्रायव्हर उतरत होता एवढ्यात आम्ही त्याच्याजवळ पोहोचलो. यशने दुसऱ्या बाजूचा दरवाजा उघडला आणि तो गाडीत शिरला. मी ड्रायव्हरचा दरवाजा उघडून उभा राहिलो, तसा ड्रायव्हर त्रासिक आवाजात म्हणाला, "नाही, नाही आता गाडी कुठं जाणार नाही. मी गाडी सोडायला आलोय् !"

आतून यश म्हणाला, "चलो भाई चलो. बहुत जल्दी है !"

दरवाजा ढकलत ड्रायव्हर गाडीतून उतरत म्हणाला, "सांगितलं ना. आता गाडी कुठं जायची नाही !"

घाईघाईने जिन्याच्या पायऱ्या उतरून धावत येत असलेल्या राम अवतारला मी पाहिले. त्याच्या अवाढव्य शरीराच्या मानाने त्याची गती कौतुकास्पद होती.

"चलो" मी ड्रायव्हरला फिरून गाडीत ढकलत म्हणालो. इतक्यात राम अवतारने आवाज दिला,

"परताप !"

प्रताप ड्रायव्हरने चमकून राम अवतारच्या दिशेकडे पाहिले. विचार करायला वेळच नव्हता. प्रतापची माझ्याकडे पाठ होती. सारी ताकद एकवटून मी त्याच्या कानामागे चपराक ठेवून दिली. विमानातून ढकललेलं पोतं बाहेर पडावं तसा तो सीटवर कोसळला. मी त्याला ढकलून गाडीत बसलो आणि गाडी सुरू केली.

राम अवतारने रस्ता ओलांडला होता. त्वरेने तो गाडीकडे धावत होता. हा सगळा प्रकार त्याने पाहिला आणि त्याची गती वाढली. ज्या गिअरमध्ये गाडी होती त्याच गिअरमध्ये मी ती उठवली. एक हादरा देऊन ती चालू झाली. तो निर्बुद्ध राम अवतार गाडीला आडवा आला. जणू आपल्या ताकदीने तो गाडीला रोखणार होता.

आता त्याला वाचविण्यात अर्थ नव्हता. मी तसाच ॲक्सिलेटर दाबला, गाडीने गती पकडली, आणि समोरचा राम अवतार खेळात फुटबॉल हलकेच उडवावा तसा बाजूला फेकला गेला.

"मेला मेला . . . गाडी घातली अंगावर . . . अरे ड्रायव्हर पळून जातोय, थांबवा त्याला . . ." मागून दोघे चौघे ओरडत होते. मला पर्वा नव्हती. मी वेगाने गाडी तशीच चालू ठेवली.

उजवीकडे वळण घेऊन मी अजमलखाँ रोडवर गाडी आणली. नेहमी गजबजलेला हा रस्ता, सकाळच्या वेळी काहीसा रिकामा होता. तो ओलांडून मी सरळ रस्ता पकडला.

दिल्लीच्या भर वस्तीत. करोल बाग ते धवला कुँवा हा रस्ता अगदी निर्जन आहे.

हा भाग दिल्लीचा वाटतच नाही. आपण कुठल्या तरी आड रस्त्याने चाललो आहोत असं वाटण्याइतकी झाडे रस्त्याच्या दोन्ही बाजूंस स्वैर वाढलेली आहेत. धवला कुँवाच्या मिलिटरी कॉलनीत बवा रहातो. नव्हे तो आज पहाटेपर्यंत रहात होता. त्याच्याकडे कितीदा तरी ह्या रस्त्याने मी गेलो होतो.

वळणावर गाडीच्या चाकांचा आवाज किंकाळी मारल्यासारखा होत होता. पण मी गाडीची गती कमी केली नाही. अंदाजे तीन एक मैल आम्ही आलो असू ! आता पुढे काही अंतरावर वस्ती सुरू होईल हे माझ्या लक्षात आलं, तशी मी गाडी बाजूला वळवली. रस्ता सोडून बाजूच्या झाडीत घेतली आणि थांबवली.

यश माझ्याकडे विस्फारलेल्या नजरेने पहात होता. शेटजींच्या बरोबरच्या लांबलचक पाल्हाळीक संभाषणाने मी त्याच्यावर काहीसा रागावलोच होतो. त्याला मी घुश्शातच म्हणालो, "पहात नको बसूस. ह्याला शुद्धीवर आणायला हवा !"

प्रतापचे केस धरुन मी त्याचे डोके सरळ केले. एक हलकेच चापट त्याच्या गालावर देत मी त्याला हाक मारली, "प्रताप, ए प्रताप !"

काही हालचाल दिसेना. मघाशी मी दिली त्याच्या अर्धी नपराकही पुरली असती ह्याला. उगाच मारले मी एवढ्या जोरात!

साधारण दहा-एक मिनिटानंतर प्रतापने डोळे उघडले. पहिली गोष्ट त्याच्या लक्षात आली ती ही की आपण दिल्लीत नाही. ह्या धटींगणानी आपल्याला पकडून कुठल्या तरी जंगलात आणले आहे. इथं आपण ओरडलो, किंचाळलो तरी कोणी मदतीला येण्याची शक्यता नाही. युद्ध कैद्यांच्याकडून हवी ती माहिती काढण्याचे अनेक मार्ग असतात. त्याच्याशी गोडीगुलाबीने बोलून, त्याला सहानुभूती दाखवून, त्याचा आपणावर विश्वास निर्माण करुन माहिती काढण्याचा एक मार्ग तर दुसरा त्याला घाबरवून, आपल्याला सारी माहिती अगोदरच आहे असे दाखवून त्याला हव्या त्या गोष्टी बोलत्या करण्याचा दुसरा मार्ग ! प्रतापसारख्या गुंडाचे कौतुक करण्याइतका मला वेळ नव्हता.

प्रताप चेहऱ्यावरुन नवाली दिसत होता. तो होता काटकुळाच. पण राम अवतारपेक्षा अशी माणसे अधिक धोकेबाज असतात. केव्हा चाकू भोसकतील हे सांगता यायचं नाही.

—प्रताप शुद्धीवर आला तसा त्याच्या शर्टाला धरुन मी त्याला झटक्यात बसता केला. कदाचित् माझ्या डोळ्यात खून चढला असावा. प्रतापने माझी भीती घेतली होती.

"मला काही माहिती हवी आहे तुझ्याकडून. सरळ बोललास तर मी तुला त्रास देणार नाही. आज पहाटे त्या कासिमला गोळ्या घातल्यावर त्या दोघाना घेऊन तू कुठं गेलास —?"

प्रताप बोलला नाही. नुसता माझ्याकडे पहात राहिला.

"बोलत नाहीस तू. मी सांगतो तुला तू कुठं नेलंस त्याना ते !"





अनुक्रमणिका

त्याना घेऊन तू मिलीटरी हॉस्पिटलच्या बाजूस गेलास. खरं ना ?"

प्रतापनं प्रश्नाचं उत्तर दिलं नाही. घुम्या नजरेने तो माझ्याकडे पहात राहिला.

"पुढं कम्पाऊंडच्या भिंतीवरून ते दोघे उडी मारून आत गेले. तू बाहेर गाडीत थांबलास. आतून त्यानी एका अधिकाऱ्यास भिंतीवरून उडी घेऊन आणले. खरं ना !"

प्रताप बोलला नाही. पण त्याच्या चेहेऱ्यावरच्या प्रतिक्रिया मी निरखत होतो. आम्हाला बरीच माहिती आहे हे त्याला आता समजून चुकलं होतं.

" ह्या अधिकाऱ्याच्या पायास जखम झाली होती. त्यानी त्यास गाडीत बसवले आणि तुम्ही चौघे तिकडून निघालात –! बरोबर आहे ना !"

प्रताप अद्यापही गप्प होता. मी यशला म्हणालो, " हे पहा हा बोलत नाही. ह्याचं फालतू कौतुक करायला माझ्याजवळ वेळ नाही. तुझं पिस्तूल घे !"

यशनं मला पिस्तूल दिलं. त्या थंडगार नळीचा स्पर्श प्रतापच्या डोक्याला होताच त्याच्या कपाळावर घामाचे बिंदू चमकू लागले. मृत्यूचं रूपच मोठं भीषण असतं. प्रतापनं तोंड उघडलं.

"तुम्ही कोण आहात –?"

"ते सांगतो नंतर. त्याना गाडीत घालून तुम्ही तेथून निघालात ते थेट शेटजींच्या घरी आलात !"

"नाही, नाही आम्ही शेटजींच्याकडे नाही गेलो !"

"मग कुठं गेलात ?"

"मी त्याना लाल किल्ल्याजवळ सोडलं !"

" पुढं कुठं गेले ते ?"

" त्यानी मला निरोप दिला. परत गाडी लागली तर मागवून घेऊ म्हणाले आणि तेथल्या टॅक्सीत बसून ते निघून गेले."

"तिघेही ?"

" हो !"

वत्राच्या खुनात हाही सहभागी होता तर ! वत्राचा विचार मनात आला तसा माझा त्वेष उफाळून उठला.

"पुढे–?"

" पुढं कुठं काय ? पुढं ते कुठं गेले हे मला कसं काय कळणार ?"

" पुढं ?"

" पुढचं मला माहीत नाही. जे माहीत होतं ते सांगितलं तुम्हाला !" ह्या फाटक्या प्रतापबद्दल मला थोडीही दयामाया उरली नव्हती. माझ्या हातातल्या पिस्तुलानं मी त्याच्या कपाळावर जोराचा फटका दिला. पिस्तुलाच्या फोरसाईटचं टोक त्याच्या कपाळात घुसलं आणि जखमेतून रक्त ठिपकू लागलं.

त्याला फिरून बसता करत मी म्हणालो, "जर त्याना लाल किल्ल्याजवळ सोडलंस तर पुढचे दोन तास काय करत होतास तू ?"

प्रताप गप्पच बसला. फिरून मी पिस्तूल उचललं. तसा तो ओरडला, "सांगतो, सांगतो मारू नका !"

"मला फार थोडा वेळ आहे. झटझट बोल !"

"मी त्याना बरोबर साडेपाच वाजता लाल किल्ल्याजवळ सोडलं."

" पुढं ?"

" तेथून त्यानी दुसरी टॅक्सी घेतली आणि ते निघाले. त्यांच्या लक्षात येणार नाही अशा बेताने मी त्यांच्या मागोमाग निघालो."

"कां ?"

"ते कुठं उतरतात हे पहायला शेटजीनी मला सांगितलं होतं."

" पुढं ?"

"त्यानी चांदणी चौकातून टॅक्सी वळवली व जुम्मा मस्जिदकडे ते निघाले. जुम्मा मस्जिदला वळसा घालून मशिदीच्या डाव्या बाजूस ते उतरले.

"पुढं ?"

"टॅक्सीला त्यानी पैसे दिले. टॅक्सी जाईपर्यंत ते तेथेच उभे होते. ती गेल्यावर ते उजव्या हाताच्या गल्लीत शिरले. गल्लीत हिरव्या रंगाची तीन मजली एक इमारत आहे. त्या इमारतीत ते शिरले! "

"पुढं ?"

" मी गाडी जुमा मस्जिदच्या टॅक्सी स्टॅण्डच्या पलिकडे नेऊन उभी केली. तेथून फिरून माघारी आलो. गल्लीच्या तोंडाशीच एक हॉटेल आहे. तेथून ती इमारत स्पष्ट दिसते. त्या हॉटेलमध्ये मी अर्धा-एक तास काढला. त्या इमारतीच्या दोन्ही मजल्यांवर गॅलरी होती. गॅलरीत जरतारी कपडे दोरीवर टांगले होते. तिघांपैकी कोणीच मला फिरून त्या अर्ध्या तासात दिसले नाही. मग हॉटेलमधून परत येऊन गाडीत राहिलेला वेळ बसून काढला. गल्लीतून येणाऱ्या प्रत्येक माणसाकडे, गाडीकडे माझे लक्ष होते. तो वन्-वे असल्याने दुसऱ्या बाजूने मोटारी जाण्याची शक्यता नव्हती. शेवटी सात वाजून गेले तेव्हा शेटजीना फोन करायचा प्रयत्न केला. टेलिफोन नंबर मिळेना. तेव्हा सरळ शेटजींच्याकडे आलो."

मी क्षणभर विचार केला. पिस्तूल खिशात ठेवले आणि प्रतापचा शर्ट धरून मी त्याला बाहेर खेचले. रस्त्यावर उभा केलं. प्रतापमधली सारी हवा एव्हाना निघून गेली होती.

" मी . . . . मी सारं सांगितलं तुम्हाला. खरं खरं सांगितलं. आता माझा जीव घेऊ नका. पाया पडतो." आणि तो खरोखरच खाली वाकला.








त्याला उठवण्यासाठी मी पुढे झुकलो. क्षणमात्र मी बेसावध असेन. प्रतापच्या हातात चाकू चमकला. खालून तो वर झाला तो चाकू माझ्या पोटात खुपसण्यासाठीच ! मला वाटते कमांडो ट्रेनिंगमुळं माणसाला क्षणार्धात् विचार करण्याची सवयच होत असावी. मी त्याचा हात वरच्या वर पकडला आणि सारी ताकद एकवटून, तो मोडेल इतक्या जोरात पिरगळला. प्रतापच्या हातून चाकू खाली पडला. मघाचं घाबरणं हा सुंदर अभिनय होता ह्या खुनशी माणसाचा ! चाकू मी उचलला. खिशात घातला आणि म्हणालो, "आता तुला जिवंत सोडायचं कारण नाही."

आता प्रताप घाबरलेला दिसत नव्हता. कोंडीत सापडलेल्या हिंस्त्र श्वापदासारखा तो माझ्याकडे पहात राहिला. त्याच्या नजरेत केवळ असहाय्य चीड होती.

मी म्हणालो, "पण मी तुला मारत नाही. ह्या सकाळच्या रम्य वेळी दोन तीन मैल चालणं तुझ्या प्रकृतीला मानवेल. शेटजीना जाऊन सांग की आज संध्याकाळपर्यंत मी त्याना फिरून भेटायला येईन !"

प्रतापला तेथेच सोडून मी व यश गाडीने निघालो. धवला कुँवाला वळसा घालून गाडी लाल किल्ल्याच्या दिशेने धावू लागली.

यश इतका वेळ अगदी गप्प बसलेला होता. एकदम तो म्हणाला, "सर तुम्ही म्हणजे एक विलक्षण माणूस आहात !"

मी यशला विचारले, "प्रतापने सांगितलेली जागा तुला माहीत आहे ?'

"हो", यश म्हणाला.

"तो सगळाच भाग मुसलमान वस्तीचा आहे. प्रतापने सांगितलेल्या गल्लीत विशेषतः जरी-जरदौसी रहातात. पूर्वी राजेमहाराजे, नावाबांच्या वेळी ह्या कारागिराना फार मान असे. राजघराण्यातलं एक लग्न म्हणजे ह्याना आठ आठ, दहा दहा महिने काम असे. पैसेही चांगले मिळत. एकेका पोशाखावर खऱ्या जरीकामासाठी हजार हजार रुपये खर्च होत. आता राजेमहाराजे, नवाब गेले! केवळ रीती रिवाजासाठी एखादा पोशाख बनवला जातो. त्यावर खऱ्याऐवजी खोटचा जरीचे काम होते. मेहनत तेवढीच पण रोजी पाच रुपयेही हजेरी पडत नाही. परत काम मिळायचे तेही वर्ष, सहा महिन्यातून ! एका वेळचे हे कलाकार आता भूके मरत आहेत. त्यातले अतृप्त आत्मे सरकारच्या नावानं खडे फोडतात. ह्या पाक सैनिकाना तेथे आश्रय मिळाला असला तर त्यात काहीच नवल नाही."




यशने मला लांबलचक माहिती पुरवली.

प्रतापने सांगितल्याप्रमाणे मी जुमा मस्जीदच्या दिशेने गाडी वळवली. आणि एकाएकी मागून येणाऱ्या पोलिसांच्या गाड्यांच्या सायरेनचा आवाज आला. मी गाडीची गती कमी केली आणि गाडी रस्त्याच्या बाजूस वळवली.

आमच्या मागून येऊन भरधाव वेगाने पोलिसांच्या दोन रेडिओ स्टेशन-वॅगन निघून गेल्या. मी गाडी रस्त्यावर घेणार तोच पोलिसांची एक जीप व ट्रक आम्हाला ओलांडून गेला.

प्रतापने सांगितलेल्या एकेरी मार्गाजवळ मी गाडी थांबवली. पोलिसांच्या गाड्या तशाच आत घुसल्या होत्या. पलिकडच्या बाजूचाही रस्ता पोलिसानी बंद करून टाकला होता. ट्रकमधून आणखीन् पोलिस उतरत होते. त्यांच्या हातात रायफली आणि डोक्यावर शिरस्त्राणे होती. सारा रस्ता पोलिसानी फुलून गेला होता. त्या गर्दीत मला इन्स्पेक्टर मेहरा दिसले. बरोबरच्या चार पोलिसांसह ते नेमके त्या हिरव्या बिल्डिंगकडे त्वरेने निघाले होते.

रस्त्यावरच्या बघ्याना पोलिस छड्या उगारून हुसकत होते. वरच्या मजल्यावरील खिडक्यात, गॅलरीत माणसानी गर्दी केली होती. रस्त्यावरच्या पादचारीना पोलिस गल्लीच्या बाहेर घालवत होते.

आणि ह्याच क्षणी मी त्या तिघाना पाहिले. डोक्यावर मुस्लीम टोपी, जुना पुराणा कोट आणि मलमपट्टी केलेला पाय पॅंटमध्ये दडवलेला ! मोठ्या प्रयत्नाने, न लंगडता मेजर हुसेन पुढे चालले होते. मागून दोघे त्यांच्या पाठोपाठ चालले होते.

एका पोलिसाने त्याना दटावले आणि भरभर जाण्यास सांगितले आणि माझ्या लक्षात आले की ह्या पोलिसापैकी त्याना कोणीच पाहिलेले नाही. फार काय पोलिसांच्याकडे त्यांचे नेमके वर्णनही नाही. ते एकूण कितीजण आहेत ह्याचा निश्चित

अनुक्रमणिका

ाकडाही नाही. येऊन जाऊन मेजर सेनचे वर्णन त्यानी ऐकले असावे. पण ा वेषात, त्याना प्रत्यक्ष पाहिले असाही, ओळखणे मला अवघड झाले ये पोलिसांची काय कथा ?

त्यांच्या आमच्यामधले अंतर फार तर ोस फुटांचे असावे. ही गल्ली संपते ाणि मुख्य रस्त्याला मिळते तिकडे ते नघाले होते. आमच्या आणि त्यांच्याध्ये पोलिस होते. रस्त्यावरच्या गर्दी रणाऱ्या लोकाना ते चालायला सांगत ोते.

आणि ह्याच क्षणी यशनेही त्याना ाहिले. तो एकदम ओरडला, " ते पहा, ं पहा. पकडा त्याना –! "

त्याच्या आवाजाने पोलिस चमकले. ण त्या गर्दीच्या रस्त्यावर त्याना पकडा हणजे कुणाला ? सर्वत्र गोंधळ झाला. यानी मात्र मागे वळूनही पाहिले नाही. ं त्वरेने गर्दीतून वाट काढत चालत ोते.

मी तीरासारखा धावत सुटलो. यश ाझ्या पुढे होता. लोकाना धक्के देत, ोलिसाना न जुमानता आम्ही अर्धेअधिक ंतर कापले आणि सूट चढवलेल्या एका माणसाने यशला थांबवले. मूर्तीसारखा यश उभा राहिला. मी तेथे पोहोचलो तसा यशचा हात धरून मी त्याला म्हणालो, "थांबू नकोस !"

पण त्या माणसाची यशच्या हातावरची पकड भक्कम असावी. यश बावरला होता. त्याला तेथेच सोडून मला एकट्याला त्याना पकडता आले नसते. विचार करायला वेळ नव्हता. यशचा हात पकडलेल्या गृहस्थाच्या हनुवटीवर मी सारी शक्ती एकवटून ठोसा ठेवून दिला. तो खाली कोसळला! यशला खेचत मी म्हणालो, "चल–!"

आजुबाजूचे पोलिस आमच्याकडे धावले. काहीनी त्या पडलेल्या गृहस्थाला उचलले. काहीनी आमच्या भोवती कडे केले. पोलिसांच्या शिट्ट्या, आरडाओरडा– सर्वत्र एकच गोंधळ उडाला होता. ह्या पोलिसांच्या तावडीतून निसटणे अशक्यच झाले होते. एवढ्यात कुणीतरी वरच्या मजल्यावरून फटाकडे फेकले. त्यांच्या आवाजावरोवर पोलिस पांगले. कुणी इन्स्पेक्टरने हवेत पिस्तुलाचे बार काढले. ह्या गोंधळात मी आणि यश पोलिसांच्या वेढ्यातून निसटलो. एकाअर्थी पोलिस त्या पडलेल्या गृहस्थाला वाचवण्यामागे गुंतले होते ते आमच्या फायद्याचेच झाले.

आम्ही गल्लीच्या तोंडाशी आलो तर ते तिघे फिरून दिसले. रस्त्याच्या पलिकडच्या बाजूस ते उभे होते, अलिकडच्या बाजूस आम्ही! आम्ही रस्ता ओलांडणार इतक्यात कोठून तरी एक गाडी अचानक येऊन त्या तिघासमोर उभी राहिली. ते त्वरेने गाडीत चढले. आणि आम्ही रस्ता ओलांडत असताना, आमच्यापासून पाच हात अंतरावरून गाडी वेगाने निघून गेली. हे सारे काही सेकंदातच घडले. आणि बाहेर घडते आहे ह्याचा गल्लीतल्या पोलिसाना पत्ताही नव्हता.

त्यानी त्या हिरव्या इमारतीभोवतालचा वेढा आता पक्का करून टाकला होता. आयत्या वेळी फटाकडे फेकून गोंधळ उडवणाऱ्या माणसालाही त्यानी मोठ्या शिताफीने पकडले होते आणि मी मारलेल्या ठोशामुळे बेशुद्ध झालेला माणूसही एव्हाना शुद्धीवर आला असावा. आता काही मिनिटांचाच प्रश्न होता, त्या इमारतीत लपलेले पाक सैनिक आता त्यांच्या हातात आल्यातच जमा होते. ☆ ☆



## [ १० ]

"सर, तुम्ही कुणाला ठोसा दिलात, माहीत आहे ?"

"नाही. पण तू कमाल केलीस. थांबलास कसा तू तिथं ?"

"त्यानी माझा एकदम हातच धरला आणि मी गोंधळलो."

" ते, कोण ते ?"

"ते डेप्यूटी कमिशनर ऑफ् सी. आय्. डी. ह्या पाक सैनिकाना शोधण्याच्या कामगिरीवर त्यानीच मला नेमलं. माझे बॉस !"

तशा स्थितीतही मला हसू आलं. यश मात्र अधिकच गंभीर झाला. —'हे काही ठीक झालं नाही,'— स्वत:शीच बोलल्यासारखा यश म्हणाला.

"तू तर दोषी नाही ना त्यात ! हे सारं प्रकरण संपलं की तुझ्याबरोबर मी परत येईन त्यांच्याकडे, त्यांची माफी मागायला !"

तेवढ्यात समोरची प्लायमाउथ डावीकडे वळली. मी प्रतापची गाडी डावीकडे वळवली. प्लाय्‌माऊथमध्ये आणि आमच्यामध्ये त्याना शंका येऊ नये एवढे अन्तर ठेवून मी त्यांच्या मागोमाग चाललो होतो. प्रताप आणि शेटजीचे संध्याकाळी भेटल्यावर आभार मानायला हवे होते. ही गाडी अगदी उत्तम स्थितीत होती. ॲक्सिलेटरवर पाय ठेवताच हवी ती गती सहजतेनं पकडीत होती. प्लायमाऊथमधले आणि आमच्यातले अंतर कमी होईपर्यंत मी रहदारीचे सगळेच नियम मोडले असावेत. साधारण ६० मैल वेगान मी दिल्लीच्या गजबजू लागलेल्या रस्त्याने गाडी चालवली. एवीतेवी आतापर्यंत पोलिस माझ्या शोधात लागले होतेच. पाक सैनिकाना हरिपूरहून मी आणले, एका सभ्य, सर्वमान्य प्रतिष्ठित नागरिकाची गाडी चोरली. हो, त्या अगोदर बस सर्व्हिसची बस चोरली आणि आता उघड उघड डेप्यूटी कमिशनर ऑफ पोलिसवर सार्वजनिक ठिकाणी हल्ला चढवला होता.

समोरची प्लायमाउथ आता दिल्ली शहर सोडून दक्षिणेस निघाली होती. ओखला आता दिल्लीचे उपनगरच झाले आहे. रस्त्यावर ओखल्याच्या इंडस्ट्रियल इस्टेटकडे निघालेल्या कितीतरी गाड्या होत्या. त्यातच आमची गाडी मिसळून गेली. प्लायमाउथचा पाठलाग ही गोष्ट तितकीशी अवघड राहिली नाही.

त्याना आपल्या पाठलागाची कल्पना आली आहे वा नाही, हे कळायला मार्ग नव्हता. पण ते गाडी अगदी इतर गाड्या चालाव्यात तशीच चालवत होते. जणु ओखल्याच्या एखाद्या फॅक्टरीचे मालक निघाले असावेत! कोणती घाई नाही वा रहदारीचा कोणताही नियम मोडणे नाही!

ओखल्याची इंडस्ट्रियल इस्टेट रस्त्याच्या उजव्या बाजूस आहे. तिकडे जाण्यासाठी वळून अर्धा रस्ता ओलांडावा लागतो– आणि नेमकी तिथे अनपेक्षितपणे ती गोष्ट घडली. प्लायमाउथ पुढे गेली आणि पोलिसाने हात दाखवला. तशा ओखल्याकडे वळणाऱ्या आमच्या पुढच्या गाड्या थांबल्या. पलिकडून उलटचा दिशेने जाणाऱ्या गाड्याना पोलिस रस्ता देत होता. मी गाडी रस्त्याच्या डाव्या बाजूला घेतली. मागच्या दोघा ड्रायव्हरनी माझा उद्धार केला. तो स्वीकारत मी गाडी पुढे काढली.

इतका वेळ संथपणे चाललेली प्लायमाउथ एकदम विलक्षण वेगाने सुसाट धावत सुटली. मी पोलिसापर्यंत पोहोचेपर्यंत नाही म्हटले तरी चांगले ३५–४० सेकंद गेले असावेत आणि एव्हाना प्लायमाउथ दिसेनाशी झाली होती.

मी स्वत:लाच दोष देत गाडीची गती वाढवली. 'साधारण पाच मिनिटे गाडी चालवून, आम्ही ५–६ मैल अन्तर काटले. पुढील जवळ जवळ पाच मैल सरळ रस्ता दिसत होता, त्यावर प्लायमाउथ नव्हती. ह्या रस्त्याने तिला गिळून टाकले की काय, मला समजेना.

मी फिरून गाडी मागे वळवली. का ते मलाच सांगता येणार नाही. उलट फिरून, आम्ही ओखल्याकडे निघालो. आता रस्त्यावर फारशी रहदारी नव्हती. ओखल्याच्या पलिकडे एक पिकनिक स्पॉट होता. रविवारी वा सुट्टीच्या दिवशी दिल्लीकरांची तिकडे गर्दी उसळत असते. एरव्ही इकडे फारशी वस्तीही नव्हती. घरे तर नव्हतीच.

आणि एकाएकी यशला ती गाडी दिसली. उंच भिंतीच्या कम्पाउन्डच्या आत एक एकाकी बंगला होता. त्याच्या सळ्यांच्या दरवाजातून आत पोर्चमध्ये उभी असलेली ती हिरवी प्लायमाउथ यशने पाहिली. तसा तो लहान मुलासारखा जवळ जवळ ओरडलाच—"ती पहा गाडी!"

मी गाडीचा वेग कमी केला, पण थांबवली नाही. तसेच आम्ही दोन एक मैल गेलो. फिरून ओखल्याचा पोलिस आला.

गाडी थांबवून मी त्या पोलिसाला विचारले, "मैं पत्ता शोधतो आहे. ह्या रस्त्याच्या डाव्या बाजूला एक बंगला आहे. ओखल्यापासून ३ मैलावर— कुणाचा तो?"

"बंगला ? इकडं बंगले बरेच आहेत."

"नाही, मागे! ओखल्याच्या पुढे ! "

"हं, हं, तो खाजगी बंगला आहे. हरिचरण वर्मांचा ! पण ह्या दिवसात कोणीही नसतं तेथे ! "

"शुक्रिया! " म्हणून मी गाडी फिरून पोलिसाला वळसा



अनुक्रमणिका

घालून वळवली. साधारण दोन एक फर्लांगावर मला हवी तशी जागा पार्किंगला सापडली. तेथे गाडी थांबवत मी यशला म्हणालो, "चला आपण तो बंगला तरी पाहू!"– गाडीच्या काचा वर चढवून आम्ही दोघे चालत त्या बंगल्याकडे निघालो.

साधारण १५ मिनिटे चालल्यावर तो बंगला दुरून दिसू लागला. बंगला म्हणण्यापेक्षा बंगल्याच्या वरचे छप्पर! कारण बंगला एकतर रस्त्यापासून बराच दूर होता आणि दुसरे बंगल्याभोवती साधारण १० फुटांची उंच भिंत होती त्यामुळे बंगल्याचे आवार आणि छताव्यतिरिक्त भाग दिसणे मुश्किल झाले होते.

जो काही भाग दिसत होता त्यावरून एवढे समजले की बंगला बराच जुना असावा. छत उंच होते आणि जुन्या पद्धतीप्रमाणे भिंतीच्या वरच्या बाजूस उंचावर खिडक्या होत्या. वरच्या मजल्यावर एखादी खोली असावी आणि पुढच्या गच्चीत चढण्याकरिता लोखंडी गोल जिना होता.

रस्त्यावर फारशी रहदारी नव्हती. कोणी लोक सायकलवरून दिल्लीकडे निघाले होते आणि अधूनमधून दिसणारा एखादा देहाती सोडला तर रस्ता रहदारीचा नव्हता. बंगल्याच्या वरच्या खिडकीतून पहाणाऱ्याच्या नजरेत आम्ही सहजच आलो असतो. जाता जाता आम्ही त्या सळयांच्या दरवाजातून एक दृष्टिक्षेप टाकला. गाडी आता पोर्चमध्ये उभी नव्हती.

रस्ता सोडून मी बाजूच्या शेतात शिरलो. तसाच बांधाने चालत राहिलो. मागून यश येत होता.

सरसांच्या शेतात बसून भांगलण करणाऱ्या शेतकऱ्याने एकदम आम्हाला हटकले, "क्यों भाईसाहब, इकडं कुठं?"

त्याच्या शेजारी बसकण मारीत मी म्हणालो,

"तुमच्याकडंच!" एवढ्या वेळात यशही बसला. वाढलेल्या सरसांच्या शेतात आम्ही काहीसे झाकले गेलो.

"माझ्याकडं?"– विस्मयचकित होऊन तो उद्गारला– "काय, खताचे साहेब आहात काय?"

"नाही."

"मग सरकारी बंडिंगचे अधिकारी?"

मी मान हलवित म्हणालो, "नाही."

"आँ! मग कोण?"

"हे पहा, आम्हाला थोडी माहिती हवीय्!"

"कसली?"

"समोर दिसतो ना, त्या बंगल्याची!"

"तुम्ही कोण आहात?"

"ते सांगू नंतर!"– मी त्याच्या हातात एक दहाची नोट कोंबली. आमच्याकडे आणि त्या नोटेकडे आळीपाळीनं पहात त्यानं विचारलं–

"पण कशाकरिता?"

"असू देत मुलाबाळांना खाऊसाठी."

"माझ्या मुलाबाळांना रगड आहे खायला–तुम्ही कोण आहात?"

"त्यानं काय फरक पडतो ?"

"खूपच! तुम्ही कोण आहात ते सांगा अगोदर, मग पुढं बोलू!"

मी त्या अशिक्षित शेतकऱ्यापुढं हरलो. म्हणालो, "हे पहा, आम्ही पोलिसचे लोक आहोत!"

"मग अशी चोरासारखी आडवळणाने चौकशी कशाला?"

"त्याला तसंच काही कारण आहे. पण तू आमच्यावर विश्वास ठेव. आम्ही खरंच पोलिस आहोत."

"बरं, काय हवंय् तुम्हाला?"

"एक हिरवी गाडी मघाशी आत गेली, ती पाहिलीस तू?"

"हो!"

"आता दिसत नाही ती?"

"आतच असेल. बाहेर गेलेली तर दिसत नाही!"

"नक्की?"

"नक्की!"

"ह्या बंगल्यात कोण असतं नेहमी?"

"बहुतेक रिकामाच असतो. एक दरवान असतो. पण त्याचाही अधूनमधून पत्ता नसतो. शेट येतात कधीतरी भल्यामोठ्या गाडीत बसून, पण आता बरेच दिवसात नाहीत फिरकले!"

"आणि कोण असतं?"

"त्या शेटजींचे पाहुणे आले की इथं उतरतात. पण नेहमी दरवान सोडला तर कोणी रहात नाही इथं!"

"बरं, हा बंगला जरा पहायचा होता आम्हाला!"

"चला की! त्या दरवानाची माझी ओळख आहे. हाक मारतो त्याला!"

"नको, तसं नको! आमचा आम्ही पाहू! तू नजर ठेव बंगल्यावर. जर ती गाडी बाहेर पडली तर कुठं जाते ह्याकडं लक्ष असू दे!"

"ठीक. तुम्ही निर्धास्त जा!"— आणि त्यानं ती नोट माझ्या हातात परत दिली.

मी म्हणालो "हे काय?"

"अहो सरकारी माणसं ना तुम्ही! तुम्हाला मदत करायला हवीच. आता मघाशी जरा बारीक चौकशी केली, ती मनावर घेऊ नका. दिवस सध्या कसे आहेत, तुम्हाला माहिती आहेच! प्रत्येकानं सावध रहायला हवं! खरं ना!"

आम्ही दोघेही अवाक् झालो. "अखबार वाचतो ना रोज. त्यामुळं हे माहीत झालंय्! काय हो— आपलं सैन्य लाहोर कधी घेणार?"

आम्ही एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिलो. 'अखबार' वाचणाऱ्या त्या सैनिकानं आम्हाला आश्चर्याचा चांगलाच धक्का दिला होता.

त्याचा निरोप घेऊन आम्ही शेताच्या बांधावर आलो आणि तेथून पलिकडच्या रस्त्यावर! ह्या रस्त्याने, बंगला मागे टाकून चांगले मैलभर चालत पुढे गेलो आणि फिरून रस्ता सोडून

बंगल्याच्या वाजूच्या शेतात शिरलो. साधारण पंधरा मिनिटात शेतातून आम्ही बंगल्याच्या मागच्या बाजूस पोहोचलो. येथेही ती दहा फुटी उंच भित तिच्यावरच्या काटेरी तारेसह पहारा देत उभी होती. मागील बाजूस एक दरवाजा होता. पण तो कित्येक वर्षे उघडला गेला नसावा हे दुरूनही दिसत होते.

मागच्या बाजूचे शेत तुडवत आम्ही बंगल्याची ही बाजू न्याहाळली. बंगल्याच्या वरच्या छताखेरीज काहीच दिसले नाही.

बंगल्यापासून मागे काही अंतरावर एक झाड होते. यश त्या झाडावर चढला. त्याला जसे आतले दिसण्याची शक्यता होती तसाच तो आतल्या लोकाना दिसण्याचा धोका होता. पण काही वेळेस धोका पत्करण्यावाचून गत्यंतर नसते.

यशच्या पाहणीतून एवढेच निष्पन्न झाले की मागच्या बाजूस एक गॅरेज असून त्यात ती गाडी ठेवली असण्याची शक्यता आहे.

यश नाराज होऊन खाली उतरला. बंगल्यातले पाक सैनिक तर जाऊच देत पण शेतकऱ्याने सांगितलेला तो दरवानही त्याच्या दृष्टीस पडला नाही. सगळीकडेच सामसूम होती. थोड्या वेळापूर्वी मुक्कामास आलेल्या लोकांच्या वास्तव्याची अस्पष्टशीही खूण बाहेर दिसत नव्हती.

हा साराच एक प्रकारे बुद्धीबळाचा खेळ चालला आहे. त्यांची प्रत्येक चाल मोजून मापून, पूर्वनियोजित असल्यासारखी ! त्यांची तीनच मोहरी उरलेली, पण प्रत्येकाची चाल जणु वजीराची! आमच्याकडे असलेली सारी प्यादी टगवीत असा आतापर्यंतचा खेळ झाला. आमच्याकडचे एकेक मोहरे त्यांनी हुकमी टिपले! डॉक्टर वन्ना! केवढा क्रूर खेळ हा! बुद्धिबळातली मोहरी फिरून जिवंत होऊ शकतात. वन्ना मात्र परत येण्याची शक्यता नव्हती.

मी कमालीचा अस्वस्थ झालो. एक अनामिक उदासीनता, कमालीची उद्विग्नता मनात दाटून आली आणि अचानक कल्पना आठवली.

सुखाच्या वेळेप्रमाणे अशा वेळीही आपल्या प्रिय माणसाची आठवण तीव्रतेने होत असावी.

वाघाच्या शिकारीनंतर मोडका हात गळ्यात बांधून मी हिंडत होतो आणि कल्पना आमच्या घराशेजारी रहायला आली. तिच्या आणि माझ्या वडिलांचा स्नेह जमला आणि आमचे एक-मेकांकडे येणे जाणे सुरू झाले. माझ्या मोडक्या हाताबद्दल पहिल्याच भेटीत तिनं मला विचारलं आणि तिखटमीठ लावून मी तिला वाघाच्या शिकारीची हकीगत सांगितली. काळेशार डोळे विस्फारून ती ऐकत बसली आणि आमची गट्टी जमली.

पुढे माझी शाळा सुरू झाली आणि मी हॉस्टेलमध्ये रहाण्यासाठी दार्जिलिंगला निघून गेलो. पुढे सुट्टीत मी गावी गेलोच नाही. वडील

कामानिमित्त दिल्लीला आले होते. सुट्टीत तेथेच माझ्या काकांकडे त्यानी मला बोलावून घेतले.

त्यानंतर तब्बल तीन वर्षानी मी एकदम कल्पनेला पाहिलं. माझा डोळ्यावर विश्वासच बसेना! ही कल्पना, कालची चिमुरडी पोरगी – वाघाच्या शिकारीची हकीगत काळ्याशार डोळ्यानी ऐकत बसणारी– हीच का ती मुलगी !

–एव्हाना मी मिलीटरीत जायचं ठरवलं होतं. इतके दिवस ते माझं एकच ध्येय होतं. आता त्याबरोबर दुसरंही एक 'ध्येय' ठरलं– कल्पनेशी विवाह करण्याचं!

मी तिला ते सांगितलं, ते म्हणजे मिलीटरीत जाण्याचं माझं स्वप्न! ती चकित झाली. मी सैन्यात जाईन अशी काही तिची कल्पना नसावी.

मी डेहराडूनला इंटरव्ह्यूमध्ये पहिला आलो. डेहराडूनच्या मिलिटरी अकादमीत माझं शिक्षण सुरू झालं. दिवसभर मी कामात असे. संध्याकाळी खेळ. रात्री ठराविक वेळी झोपण्याचं आमच्यावर बंधन असे.

पण तरीही मी वेळ काढून कल्पनेला आठवड्यातून निदान दोन लांबलचक पत्रे लिहीत असे. पत्र पोस्टात टाकलं की कल्पनेच्या उत्तराची प्रतीक्षा सुरू होत असे.

पहिली सुट्टी पडली आणि मी गावी गेलो. घरात बॅग टाकली आणि कल्पनेच्या घराकडे धावलो. तिची आई स्वयंपाकघरात कामात होती. मागच्या बाजूच्या अंगणातून वर जायला जिना होता.

महाराष्ट्रात गाजत असलेली "चालू" नाटके . . .




हा खेळ सावल्यांचा

मी वर गेलो. खोलीत जमिनीवर बसून कल्पना काही लिहिण्यात गुंग झाली होती. मी तिच्या मागं उभा आहे ह्याचा तिला पत्ताच नव्हता.

तिचे काळेभोर केस पाठीवर मोकळे रुळत होते. त्याना हळूच हात लावावा अशी मनात इच्छा निर्माण झाली. मी हळूच तिला हाक दिली, "कल्पना–!"

ती एकदम दचकली. तिनं मागं वळून पाहिलं आणि मला पहाताच तिची मुद्रा उमलत्या फुलासारखी एकदम प्रफुल्लित झाली.

प्रसन्न हसत ती म्हणाली, "शंभर वर्ष जगशील तू! मी तुलाच पत्र लिहीत होते!"

"पाहू !"

"उंहूं !"

मी एकदम तिच्या हातातलं पत्र काढून घेतलं. माझ्या नावापुढे असलेली 'प्रिय' ही अक्षरे पाहून मी मोहरलो.

कल्पना माझ्या हातातलं पत्र हिसकावून घेऊ लागली. मी खोलीत पळत राहिलो. ती माझा पाठलाग करू लागली. मी तिच्या हाती सापडतोय थोडाच!

"अग, पण तू मला लिहिलं आहेस ना!" धावता, धावता मी म्हणालो,

"हो, पण ते इथं वाचायला नाही !"

कमाल आहे. एवढ्यात तिनं मला कोपऱ्यात पकडलं. रडवेल्या आवाजात ती म्हणाली, "देना पत्र !"

"उंहूं" पत्र अधिकच उंच धरत मी तिला म्हणालो. ती माझ्या हाताला लोंबकळली. तसा माझा हात खाली आला. ती पडेलसं मला वाटलं म्हणून मी तिला धरली आणि ती माझ्या बाहूत आली आणि मग हलकेच तिच्या हातांची माझ्या गळ्याभोवती मिठी पडली. तिचा उष्ण श्वास माझ्या श्वासात मिसळला गेला. तिची हनुवटी उचलली गेली आणि मग तिच्याप्रमाणे माझेही डोळे मिटले. जाणीव हरपली. दोन ओठावर ओठ टेकले गेले.

झाडावरून उतरलेला यश माझ्याकडे चमत्कारिक नजरेने पहात होता. ओशाळून हसत मी म्हणालो, "काय विचार आहे ?"

"मी त्या भिंतीवर चढून पहावं म्हणतो ! " यश म्हणाला. हा तरुण मुलगा कधीतरी, उत्साहाच्या भरात भलताच धोका घेणार आणि नको तो अनर्थ ओढवणार असं मला वाटलं.

मी बोललो नाही. आम्ही फिरून बंगल्याच्या मागच्या बाजूस आलो. भिंतीवर नुसती तारच नव्हती तर फुटक्या काचाही बसवलेल्या होत्या. भिंतीबरोबर आम्ही सगळी मागची बाजू फिरलो, आणि कोपऱ्यावर थांबलो.

मी यशला म्हणालो, "यश तुझं पिस्तूल !"

प्रतापला सोडल्यावर मी यशला पिस्तूल दिले होते. ते त्याने फिरून माझ्या हातात दिले. पिस्तूल भरलेले आहे ह्याची खात्री करून मी ते खिशात ठेवले. मी म्हणालो,










अनुक्रमणिका



पिंपरी (पुणें) येथील आधुनिक कारखाना

## गरवारे नायलॉन्स

आपल्या देशांत नायलॉन सुताचा पहिला कारखाना सुरू करण्याचा मान, गरवारे यांनी मिळविला आणि देशाच्या औद्योगिक प्रगतींत मोठी भर घातली. या कारखान्याने, सुरवातीपासून मासेमारीसाठीं व पॅरॅशूटसाठीं लागणाऱ्या विशिष्ठ सुताची गरज भागवून देशाला त्या बाबतींत स्वयंपूर्ण केलें व अन्नप्रश्न व संरक्षण या समस्या सोडवण्यास हातभार लावला.

आणि आतां, कापड व होजिअरी यांना लागणारे तलम सुतही तयार करून सामान्य माणसाचें जीवन अधिक सुखकर करण्यास मदत करीत आहेत.

याशिवाय कन्व्हेयर बेल्टस्, फायर होस, दोर, इत्यादि अनेक वस्तूंना आवश्यक अशा विशिष्ठ प्रकारच्या ताकदवान नायलॉन सुताचा गरवारे पुरवठा करतात.


'गरवारे' नायलॉन सूत अनेक ठिकाणीं उपयोगांत येते. उदा. साड्या, स्लॅक्स, जर्सी, शर्टसाठीं कापड, पायमोजे, मासेमारीसाठीं जाळे, दोर, पॅरॅशूटसाठीं लागणारा खास दोर, उद्योगधंद्यांत उपयोगी पडणारे होस व कन्व्हेयर बेल्ट्स् इत्यादि.

अनुक्रमणिका

"हे पहा यश, ही आपली शेवटची संधी आहे. ही गमावली तर आपल्यासारखे कमनशिबी आपणच! तू येथून धावत ओखल्याला जा, मिळेल तेथून कर्नल नायरना फोन कर. सांग. पाक सैनिक येथे आहेत."

"आणि तुम्ही–?"

"मी त्याना आपले लोक येईपर्यंत प्रसंग पडलाच तर बंगल्यातच थांबवून धरतो."

"पण ते कसं ?"

"मलाच माहीत नाही. प्रसंग पडेल त्याप्रमाणं मी ते ठरवेन!"

"म्हणजे ?"

"मी आत चाललो आहे !"

"सर– मलाही येऊ दे तुमच्याबरोबर!"

मी बोललो नाही. यश वरमला. म्हणाला, "सर, मी तुम्हाला पाहिलंय्. तुम्ही भलता धोका घेता. काही अनर्थ ओढवायचा, मला काळजी वाटते!"

मला हसू आलं. अगदी हेच विचार यशबद्दल माझ्या मनात काही मिनिटांपूर्वी आले होते. मी म्हणालो,

"यश आता एकमेकांची समजूत काढायला वेळ नाही. तू नीघ. कर्नल नायर– आर्मी हेडक्वॉर्टर्स–!"

यशने मानेने 'हो' म्हटले. तो निघणार इतक्यात मी म्हणालो, "एक मिनीट! मला जरा मदत कर."

त्याच्या खांद्यावर पाय ठेवून मी भिंतीच्या तारेचा खांब पकडला. आत एक वेळ डोकावून पाहिले आणि कुणीच दिसत नाही तसे मी स्वतःला वर उचलले !

यशने ते पाहिले. एकवार हात हलवून निरोप घेतला आणि तो धावत सुटला. मी तारेतून वाकून पलिकडे गेलो आणि आत कम्पाऊंडमध्ये उडी घेतली.

☆ ☆

## [११]



मी जसजसा अधिक विचार करत होतो तसे ह्या साऱ्याच गोष्टींबद्दल मला विलक्षण कुतूहल वाटू लागलं. हे सर्व इतक्या व्यवस्थितपणे जमवून आणणाऱ्या कल्पक बुद्धीबद्दल काहीसा आदरही वाटू लागला.

गावाबाहेरचा निर्जन बंगला, कधीमधी येऊन रहाणारा त्याचा मालक, अधूनमधून गैरहजर असणारा त्याचा दरवान! उद्या तशी पाळीच आली तर दरवानाला मारहाण करून काही अज्ञात माणसानी माझा बंगला वापरला ही तक्रार खुद्द मालक पोलिसांकडं करून स्वतः नामानिराळे राहू शकले असते. आपली गाडी ह्या लोकाना मीरठला जाण्याकरिता देऊन स्वतःच पोलीस स्टेशनवर गाडी चोरीला गेल्याची तक्रार नोंदवण्यांइतकेच हेही सोपे होते.

कुणी नवाबाने हौसेने हा बंगला पन्नास एक वर्षापूर्वी बांधलेला असावा. मागच्या बाजूस पूर्वी छानशी बाग असावी. आतासुद्धा हिरवेगार लॉन होते.

मागच्या बाजूस एक गॅरेज होते. प्रथम मी गॅरेजकडे गेलो. दाराच्या फटीतून आत पाहिले. प्रथम अंधाराव्यतिरिक्त काहीच दिसेना. नंतर डोळे सरावले तशी ती हिरवी गाडी दिसली. म्हणजे हे लोक अद्याप आत आहेत तर !

त्या गॅरेजच्या आडोशाने मी शांतपणे बंगल्याचे निरीक्षण केले. मागील बाजूचे दार बंद होते. खिडक्यांची दारेही बरेच दिवसात न उघडल्यासारखी घट्ट बंद झालेली दिसत होती. ह्या मागच्या बाजूच्या खोल्या वापरात नसाव्यात.

छतावर रेडिओची उंच एरियल दिसत होती. कदाचित येथे ट्रान्समीटर ठेवून येथून हव्या त्या बातम्या परदेशी पाठवता येण्याची शक्यताही दिसत होती. छतावर टेलिफोनच्या वायर्स होत्या. इतक्या दूरवर टेलिफोन घेण्यासाठी मालकानी बराच पैसा खर्च केला असावा.

पुढच्या बाजूस जाणे धोक्याचे होते. घरातून ह्या पाक सैनिकांपैकी कोणीतरी मला पहाण्याची शक्यता होती. दरवानही कदाचित एकदम समोर येऊन उभा राहिला असता. रात्रीची वेळ असती तर गोष्ट वेगळी. पण दिवसाढवळ्या बंगल्याच्या जवळ जाता येणे कठीण होते.

घराच्या भिंती उन्हाळ्यात त्रास होऊ नये म्हणून उंच बांधल्या होत्या. आणि वर छताजवळ, खोलीतील गरम हवा बाहेर जाण्यासाठी खिडक्या होत्या. त्या खिडक्याना गज नव्हते. त्यांच्या काचेच्या तावदानातून आत काय चालले आहे हे व्यवस्थित दिसू शकेल. परत कुणी बाहेर आलं तर छपरावर कोणी आहे का हे पहाण्याची शक्यता कमी होती.

मी हळूच बूट काढले. मागच्या बाजूस गच्चीवर जाण्यासाठी, बाटोळा लोखंडी जिना होता. त्यावर हलकेच मी चढलो. गच्चीवरून छपरावर उतरलो.

ही जुनी कौले माझ्या भाराने फुटणार तर नाहीत ना? माझ्या छातीत धडधडत होते. मी अतिशय काळजीपूर्वक प्रत्येक कौलाचा अंदाज घेत खिडकीजवळ पोहोचलो आणि पालीसारखा भिंतीला चिकटलो. खिडकीतून हळूच खाली डोकावले. प्रशस्त

हॉलमध्ये भिंतीवर वाघांची कातडी, गवे, हरणे आणि चित्त्यांची भरलेली डोकी लावलेली होती. दोन तीन लाइफसाईझची तैलचित्रे भिंतीवर होती. जमिनीवर जाड काश्मिरी गालिचा पसरलेला होता. त्यावर शिसवीच्या लाकडावर नक्षीकाम केलेला सोफासेट ठेवलेला होता. हॉलच्या एका कोपऱ्यात, टेबलावर टेलिफोन होता. बाहेरून दुर्लक्षिलेला, निर्जन वाटणारा बंगला आतून मोठ्या रुबाबात सजवलेला होता. हॉलमध्ये कोणीच नव्हते.

भिंतीबरोबर सरकत मी पुढच्या खिडकीकडे गेलो. तेथून डोकावले. ही बाथरूम होती. साधारणपणे दहा फूट बाय पंधरा फुटाची ऐसपैस बाथरूम होती ही! एका बाजूला चकचकीत सफेत वॉश बेसिन, दुसऱ्या कोपऱ्यात मोठा टब, त्याच्याजवळ शॉवरबाथचीही सोय, सर्व गोष्टी अद्यावत् होत्या.

तेथून मी पुढे सरकलो. हे शयनगृह होते. दोन मोठ्या कॉटस् एकमेकांना जोडून ठेवलेल्या! त्याच्या दुसऱ्या बाजूस एका मोठ्या टेबलावर नकाशा पसरून मेजर हुसेन त्या गुलछबू मिशा वाढवलेल्या तरुण अधिकाऱ्यास काही तरी समजावून सांगत होते.

तेवढ्या उंचीवरून तो नकाशा दिल्ली शहाराचा असावा एवढा तर्क मी करू शकलो, पण काचेच्या बंद तावदानामुळे ते काय बोलत होते हे ऐकू येत नव्हते. मेजर हुसेन आणि तो अधिकारी–लेफ्टनंटच असावा तो–मूक चित्रपटातल्या पात्रासारखे नुसते हातवारे करत बोलत असल्यासारखे दिसत होते. त्यांचे बोलणे ऐकू आले तर ते कशाबद्दल बोलत आहेत हे समजले असते. इतका प्रयत्न करूनही अद्याप त्यांचे काय लक्ष्य आहे याची पुसटशीही कल्पना मला आलेली नव्हती. ही ती संधी होती. मी जर खिडकी उघडू शकलो तर–! पण जर आवाज झाला तर–? आणि तो तिसरा जे. सी. ओ. सुभेदार मेजर कोठे आहे? माझ्याच पाळतीवर तर तो नसेल ना?

मी हलकेच खिडकीवर दाब दिला. खिडकी उघडली नाही. बरेच दिवस न वापरल्याने दार घट्ट बसले असावे. प्रतापकडून घेतलेल्या चाकूची मला आठवण झाली. तो चाकू मी खिशातून बाहेर काढला, उघडला, त्याचे पाते स्वच्छ होते. हलकेच मी ते खिडकीच्या दारात घातले आणि खिडकी उघडण्याचा प्रयत्न करू लागलो.

हळुहळू खिडकी खुली झाली. अगदी छोटीशी फट निर्माण झाली आणि त्यातून मला हुसेन आणि लेफ्टनंटचे शब्द अस्पष्ट ऐकू येऊ लागले.

आणि थोडी खिडकी उघडली तर–? ही बिजागरे किरकिरतील काय? मेजर हुसेन आणि त्या तरुण अधिकाऱ्याच्या ते लक्षात येईल काय?

यश म्हणतो तसा मी खरोखरच फार मोठा धोका पत्करत होतो काय? यशची



[अनुक्रमणिका](#)

झाली तसे लक्षात आले की तो हसरा, उमदा तरुण आतापर्यंत ओखल्याला पोहोचला असेल. कदाचित कर्नल नायरांशी तो फोनवर बोललाही असेल. त्याना एकदा आम्ही कोठे आहोत हे समजले की ते क्षणाचाही वेळ वाया घालवणार नाहीत.

मी खिडकीला हात घातला. दारावर हात ठेवत मी खांद्याने हळूच धक्का दिला. माझ्या अपेक्षेपेक्षा मोठा आवाज झाला, खिडकी उघडली. पण त्या आवाजाकडे मेजर हुसेन किंवा त्या अधिकाऱ्याचे लक्ष गेले नाही. कारण खिडकी उघडली गेली त्याच वेळी धाडकन् आवाज होऊन खालच्या खोलीचाही दरवाजा उघडला गेला. प्रथम यश आणि त्याच्य पाठीत पिस्तुलाचे टोक खुपसून, इतका वेळ दिसत नसलेला तो जे. सी. ओ. त्या खोलीत प्रवेशले.

मेजर हुसेननी नकाशा गुंडाळून ठेवला आणि प्रश्नार्थक मुद्रेने जे. सी. ओ. कडे पाहिले.

जे. सी. ओ. नं उत्तर दिलं नाही. ह्या सैनिकाबद्दल प्रथमपासून माझ्या मनात कोणती गोष्ट भरली असेल तर ती म्हणजे त्यांच्या कामातला रेखीवपणा! सारेच कसे पूर्वी अनेकवेळा तालीम करून, सुसंबद्ध बसवल्यासारखे ? कोठे कुणाचा फालतू शब्द नाही, अवास्तव हालचाल नाही.

त्या सुभेदार-मेजरने यशला भिंतीजवळ नेऊन उभे केले. यशला त्याने दोन्ही हात भिंतीवर टेकवायला लावले आणि काळजीपूर्वक त्याला तपसले. यशच्या खिशातल्या एकेक गोष्टी बाहेर काढून त्यानं मेजर हुसेनांच्या समोरच्या टेबलावर ठेवल्या.

मला देऊन उरलेल्या पिस्तुलच्या गोळ्या, आणि यशचे ओळख–पत्र त्यात होते. मेजर हुसेननी ते उचलले, पाहिले आणि निर्विकार चेहऱ्याने ते खाली ठेवले. झडती संपल्यावर त्यानी यशला खुर्चीवर बसवले आणि त्याचे हात मागे वळवून खुर्चीला करकचून बांधून टाकले.

मग अत्यंत मृदू आवाजात मेजर हुसेननी यशला विचारले,

"तुझं पिस्तूल काय झालं ?"

यश बोलला नाही.

"हे पहा आम्हाला तुला बिलकुल त्रास द्यायचा नाही. पण तू आमच्या प्रश्नांची उत्तरं दिलीस तरच ते शक्य होणार आहे. तुझ्याबरोबर एवढा वेळ जो माणूस होता, तो आत्ता तुला एकट्याला सोडून कुठं गेला ?"

ह्यावरही यश शांतच राहिला.

त्यावरोबर तो सुभेदार मेजर पुढं झाला. डाव्या हातानं यशचे केस धरून, डोकं गदागदा हलवत त्यानं विचारलं, "तुझ्याबरोबरचा दुसरा माणूस कुठं आहे ?"

इतका वेळ चाललेला मूक चित्रपट आता बोलका झाला होता. मी केवळ प्रेक्षकच होतो. मेजर हुसेनची मृदू भाषा फसवी होती. कैद्याला सहानुभूती दाखवून त्याचा विश्वास संपादन करण्याचा तो एक मार्ग होता. यशचे ते आता हाल करणार यात शंकाच नव्हती. प्रश्न एवढाच होता की यश किती वेळ टिकाव धरू शकला असता.

आम्ही दोघे एकत्र काम करतो आहोत ह्याची त्याना माहिती होती. मग माझा ठिकाणा यशच्या तोंडून वदवल्याखेरीज. ते त्याला सोडायचे नाहीत. आणि एकदा त्याना मी ह्या बंगल्यातच आहे हे समजलं की मग मला, ह्या दिवसाच्या प्रकाशात, शोधून काढायला त्याना वेळ लागायचा नाही.

माझ्याजवळ यशचे पिस्तूल होते. ही पहिलीच वेळ अशी होती की हे तिघेही एकाच वेळी माझ्या समोर होते. मी त्या दृष्टीने विचार करू लागलो तसे एक लक्षात आले की तो लेफ्टनंट आता खिडकीच्या बरोबर खाली भिंतीजवळ बसल्याने मला दिसेनासा झाला आहे. दुसरे, मी त्या तिघांना टिपण्यापूर्वी त्यानी यशच्या शरीराची चाळण केली असती. पण त्याला इलाज नव्हता. ह्या पाक सैनिकानी नाही कासिमला स्वतःच गोळ्या घालून बसमध्ये ठार केले? ह्यानीच ड्रॉपिंग झोनवर गोळी घालून मारलेल्या त्या तरुण अधिकाऱ्याचा चेहरा माझ्या नजरेसमोर आला. एकाचा मृत्यू अनेकांचे प्राण वाचवू शकत असेल तर—!

मी पिस्तूल बाहेर काढले आणि एकाएकी काळ्याशार केसांची यशची पत्नी

महाराष्ट्रात गाजत असलेली 'चालू' नाटके




खडाष्टक

अनुक्रमणिका

आठवण मला आठवली. हत्तीवरून शाळेत जायच्या गोष्टी करणारी छोटीशी मुन्ना आठवली.

माझा मीच विचलित झालो. गोळी न चालविण्याचे स्वतःशीच समर्थन करण्याकरिता कारणे शोधू लागलो.

थाडकन् आवाज झाला आणि मी चमकलो. सुभेदार मेजरांच्या आडदांड हाताची चपराक यशच्या गालावर बसली होती. सुभेदार–मेजर थांबले नाहीत. त्यानी दोन तीन चपराकी तशाच चढवल्या. त्याच्या आवाजाने माझ्या काळजाचे पाणी झाले!

मेजर हुसेन आता गप्प बसले होते आणि प्रश्न विचारण्यास सुभेदार-मेजरनी सुरुवात केली होती. माणसाला बोलते करण्याचे अनेक उपाय असतात. त्यातले काही इतके साधे पण प्रभावी असतात की यश कितपत सहन करू शकेल ह्याची मला शंका वाटू लागली.

एकाएकी सुभेदार-मेजरना सिगरेट पिण्याची लहर आली. त्यानी सिगरेट पेटवली तसा माझ्या हृदयाचा एक ठोका चुकला. आता ते काय करणार आहेत ह्याची मला पूर्ण कल्पना आली.

सिगरेट चांगली पेटू देण्याकरिता त्यानी एक मोठा झुरका घेतला आणि त्यानी फिरून विचारले, "बोल तो माणूस कुठं आहे?"

ह्यावर यशने उत्तर दिले नाही तशी त्यानी यशच्या गुढग्यावर बुटाची लाथ हाणली.

कळवळून यश किंचाळला. मला त्या सुभेदार-मेजरचा राग आला होताच. पण कासिमबद्दल जी घृणा वाटली होती तीच ह्या माणसाबद्दल वाटू लागली.लढाईत माणसामाणसात फारकत उरत नाही. कासिमने हेच केले असते. शांत दिसणारे सुभेदार–मेजर आता हेच करीत होते. कदाचत मीही हेच केले असते. आणि तरीही गम्मत ही की जे समोर घडत होतं त्याचा मला त्वेष आला. एक वेडा राग माझ्या डोक्यात चढला. बदलाचा सूड माझ्या मनात कोंदटून राहिला होता. आता यशवर चाललेल्या आत्याचारांचा बदला घेण्याच्या विचाराने मला ग्रासून टाकले.

त्या तिघांना तेथेच सोडून मी मागे वळलो. आवाज न करता, फिरून ते बादशाही स्नानगृह ओलांडून हॉलच्या खिडकीजवळ आलो.

हॉलमधली खिडकी उघडली. खिडकी उघडली तशी यशची आणखी एक, पहिल्याहून हृदयद्रावक किंकाळी माझ्या कानावर आली. मी खिडकीतून सरपटत आत शिरलो. जमीन जवळ जवळ वीस फूट खाली असावी. पॅराट्रुपरची नजर उंचीला मरते. दोन्ही पंजे जुळवले आणि मी खाली उडी घेतली. जाड काश्मिरी गालिच्यावर मी पडल्याने आवाज झाला नाही. मी उभा राहिलो.

हॉलच्या दुसऱ्या टोकाला टेलिफोन होता. कुणाला चाहूल लागली नसल्याची खात्री करून घेऊन मी चोर पावलानी टेलिफोनकडे सरकू लागलो.

पलिकडच्या खोलीतून विचारले जाणारे प्रश्न येथेही ऐकू येत होते. सुभेदार-मेजरऐवजी आता फिरून मेजर हुसेननी प्रश्न विचारायला सुरुवात केली होती. यश उत्तर देत नाही तोवर ते तिघे तेथेच गुंतलेले रहाणार हे मी ओळखले!

टेलिफोनची डायल कितीही हलक्या हाताने फिरवली तरी तिचा व्हायचा तितका आवाज झालाच. त्या आवाजाने मला घाम फुटला.

प्राण कानात आणून मी कर्नल नायरांचा आवाज ऐकू येण्याची वाट पाहू लागलो.

दोन वेळा रिंग वाजली. आणि पलिकडून कोणीतरी फोन उचलला,

"कोण पाहिजे तुम्हाला?"

दबल्या, अधीर आवाजात मी म्हणालो, "कर्नल नायर."

"कोण बोलत आहे?"

"Damn it, put me through." मी चिडून शक्य तो आवाज खाली ठेवत खेकसलो.

बझर वाजण्याचा आवाज टेलिफोनमधून ऐकू आला आणि तत्परतेने फोन उचलला गेला. हे घडायला काही सेकंदच लागले. ते मला तासासारखे वाटले.

"कर्नल नायर—!" तिकडून परिचित आवाजात शब्द ऐकू आले.

आणि माझे शब्द माझ्या ओठातच राहिले.







माझ्या पाठीमागून सुभेदार-मेजरचा आवाज मला ऐकू आला.

"एक शब्द बोललास तर गोळी घालीन मी!"

तो आणि लेफ्टनंट माझ्यामागे दहा हातावर पिस्तूल रोखून उभे होते. पलिकडच्या खोलीतून मेजर हुसेन यशला प्रश्न विचारत असल्याचा आवाज अद्यापही ऐकू येत होता.

"येस् – कर्नल नायर!" फिरून टेलिफोनमधून आवाज आला. आता काय व्हायचं ते होवो, मी बोलून टाकायचं ठरवलं.

फोनवर मी जवळ जवळ ओरडलोच, "हे पहा, मला ह्या पाक सैनिकांचा पत्ता लागला आहे—"

माझं वाक्य पुरं झालं नाही. माझ्या अपेक्षेपलिकडे, विलक्षण वेगाने त्या सुभेदार मेजरने आम्हामधले अंतर काटले. जबरदस्त ताकदीने त्याने लोखंडी पिस्तुलाचा दस्ता माझ्या डोक्यात मारला. क्षणार्धात काळोख्या आकाशात रंगीबेरंगी दारूकाम उडावे तसे असंख्य प्रकाशकण नजरेसमोर चमकले, आणि फिरून एकदम अंधार झाला.

नाइट जंपच्या वेळी विमानातून उडी घेतल्यावर पॅराशूट उघडण्यापूर्वी आपण वेडेवाकडे खोल खोल खाली फेकले जातो तसा मी अंत नसलेल्या काळोख्या गर्तेत कोसळलो. माझी शुद्ध हरपली. ✡ ✡

## [ १२ ]



पाण्याच्या जबरदस्त लाटेने माझा श्वास गुदमरून गेला. पोहण्यासाठी मी हात हलविण्याचा प्रयत्न केला पण हात उचलत नव्हते. ह्या यमुनेच्या पाण्यात आता मला जलसमाधी मिळणार हे समजून चुकलं. दुसरे दिवशी वृत्तपत्रात एक अपघाती मृत्यू म्हणून बातमी येईल आणि हे मला मारणारे पाक सैनिक सहीसलामत सुटतील. पाण्याची आणखीन् एक लाट आली आणि माझ्या नाकातोंडात पाणी गेले. सगळी ताकद एकवटून मी हात हलवले, डोळे उघडले तसे मला दिसले की मी यमुनेच्या पाण्यात नाही. मी एका खुर्चीवरच बसलो आहे आणि तो तरुण लेफ्टनंट मला शुद्धीवर आणण्यासाठी माझ्या तोंडावर ग्लास भरून पाण्याचे हबके मारत आहे.

मी डोळे उघडले तसा तो थांबला. समोरच्या खुर्चीवर टेबलापलिकडे मेजर हुसेन बसले होते. आणि त्यांच्या मागे उभे होते सुभेदार-मेजर! माझ्या खिशातल्या सगळ्या गोष्टी टेबलावर टाकलेल्या होत्या. त्यातला प्रतापचा चाकू सुभेदार मेजरनी घेतला होता आणि तो उघडून त्याचे सहजच परीक्षण चाललेले होते.

माझ्या डाव्या बाजूस यश खुर्चीत मान टाकून पडला होता. त्याच्या तोंडातून रक्त येत होते. मला प्रथम वाटले–तो मेलाच! पण त्याचा श्वास चालू होता. त्याचे हात आता सोडलेले होते. त्याच्या उजव्या हाताकडे माझी नजर गेली तशी त्वेषाची सणक माझ्या डोक्यात सणाणून गेली. यशच्या उजव्या हाताच्या बोटांची सारी नखे छिनून गेली होती. बोटांच्या चिंध्रड्या उडाल्या होत्या. माझ्याजवळ उभ्या असलेल्या लेफ्टनंटच्या नरडीचा घोट घेण्यासाठी मी झेप घेतली.

पण मी खुर्चीतून उठू शकलो नाही. डोक्यातून अशी चमत्कारिक कळ आली की मी खुर्चीतच कोसळलो. त्या आवाजानं यशचे डोळे उघडले. नेहमी बोलके, उत्साही, भावपूर्ण ते डोळे आता निस्तेज दिसत होते. आणि तरीही मला आपोआप समजलं की हे सारे असहनीय हाल होऊनही यश एक अक्षरही बोललेला नाही. ह्याचा अर्थ आता ती पाळी माझ्यावर येणार होती. यशइतके तरी मी सहन करू शकेन का, मी स्वत:लाच प्रश्न विचारला. प्रश्नाचं उत्तर सापडेना. माझी नजर फिरून परत परत सुभेदार-मेजरच्या हातातल्या प्रतापच्या चाकूकडे जाऊ लागली. अनेक विचारानी मला अस्वस्थ करून सोडले.

मी डोळे पूर्ण उघडले तसा ग्लास टेबलावर ठेवून लेफ्टनंट बाजूस झाला.

आता हातातल्या चाकूसह सुभेदार-मेजर पुढे येतील आणि प्रश्नोत्तरास सुरुवात होईल अशी माझी कल्पना होती. पण तसे होण्याऐवजी मेजर हुसेन हसून म्हणाले, "मिस्टर माथूर, तुम्हाला त्रास झाल्यावद्दल मी दिलगीर आहे. How about a cup of tea ?

मी काहीच उत्तर दिलं नाही. पण त्या लेफ्टनंटने मात्र आश्चर्याने विचारले, "सर, तुम्ही ह्याना ओळखता ?"

"हो तर–! आग्र्याच्या 'इन्किलाब' साप्ताहिकाचे हे सहसंपादक आहेत. आणि मला वाटतं रिकामपणी ते भारतीय सैन्यातही नोकरी करतात. खरं ना?"

मग सुभेदार-मेजरकडे पाहून ते म्हणाले, "बढिया चहा हवाय, मिळेल ?"

सुभेदार–मेजर निघून गेले. लेफ्टनंट हातात पिस्तूल घेऊन माझ्या समोरच्या खुर्चीवर बसून राहिला.

मेजर हुसेनच बोलत राहिले; "हे यशपाल चौधरी, दिल्लीच्या सी. आय. डी. खात्यात असतात. तुमची ओळख आहे?"

आम्ही दोघानी एकमेकांकडे पाहिले. कोणीच बोलले नाही. नाटकाचा प्रयोग चालावा तसे सगळे संभाषण चालले होते.

मेजर हुसेन पुढे म्हणाले, "काय दुर्दैवी योगायोग हा!" एरव्ही आपण दुसरीकडे भेटलो असतो तर मी तुला मेसवर ड्रिंकसाठी बोलावले असते. आमच्या मेसच्या हिरवळीवर, संध्याप्रकाशात आपल्या गप्पा रंगल्या असत्या! पण युद्ध ही फार वाईट गोष्ट आहे!"

"मलाही ते पटतं!" मी म्हणालो.

इतक्या वेळात पिस्तुल रोखून बसलेला तो लेफ्टनंट अस्वस्थ झाला होता.

"युद्ध वाईट खरं, पण, सर, आपल्यावर ते लादलं जातं त्यावेळी आपण काय करावं?"

"लढावं, अगदी प्राणपणानं लढावं! पण ते लादलं गेलं असेल तर—!"

"सर, काश्मीरचा प्रश्न पूर्वी कबूल केल्याप्रमाणं सार्वमत घेऊन भारतानं सोडवला असता, तेथल्या जनतेच्या मताप्रमाणं त्याना स्वतंत्र रहाण्याची किंवा पाकमध्ये विलीन होण्याची परवानगी दिली असती तर लढाईची काय आम्हाला हौस होती?"

—मेजर हुसेननी काही उत्तर दिलं नाही. आवेगानं तो लेफ्टनंट तसाच बोलत राहिला.

"सर, आपल्याला काय ह्याची कल्पना नाही की भारताची फौज आपल्या चौपट आहे. रशिया आणि अमेरिका दोन्हीकडून युद्ध साहित्य मिळवून भारत बलशाली झालेला आहे. फुकाफुकी हे युद्ध आम्ही आमच्यावर कशाला ओढवून घेऊ? पण सर अन्यायाचा प्रतिकार प्रत्येकानं केलाच पाहिजे. भले, मग त्यात मरण पत्करावं लागलं तरी हरकत नाही!"

तो ज्या आवेगानं, भावनाप्रधानतेने बोलत होता, ते पाहून मला यशची आठवण झाली. ड्रॉपिंग झोनवर काल रात्री अशीच भाषा मी यशच्या तोंडून ऐकली होती.

मेजर हुसेन म्हणाले, 'युसूफ, ह्या सर्वांआगोदर एक गोष्ट तुला शिकणे आवश्यक आहे!"

"कोणती सर?"

"आपलं डोकं शांत आणि जीभ ताब्यात ठेवणे ही!"

"सॉरी सर! पण ह्या अहिंसा आणि पंचशीलचा नारा लावणाऱ्या, ढोंगी, आपमतलबी भारताच्या दुटप्पी धोरणाचा मला राग येतो. सारेच खोटे, फसवे, नाटकी! लडाख ताब्यात ठेवायला ह्याना काश्मीर हवं असं कां नाही स्पष्ट म्हणत? आपण त्यांना पॅसेज देऊ!"

ह्यावर वास्तविक उत्तर यशकडून यायला हवे होते. पण तो बोलण्याच्या स्थितीत नव्हता.

"सर तुम्ही बोलत नाही–!"

"युसूफ सैनिकानं फार बोलूच नये मुळी! ते त्यानं राजकारणी पुढाऱ्यावर सोपवावं. आपण आपले चहा घेऊ! ते आता अधिक महत्त्वाचे!"

जे. सी. ओ. चहा घेऊन आला. आम्हा चौघाना त्याने चहा दिला. यशची कपबशी त्याच्या समोरच्या टेबलवर ठेवली. यशने त्याला हात लावला नाही.

गरम, वाफा येणारा चहा पोटात गेला तसं बरं वाटलं. काही वेळ कोणीच बोललं नाही. मग स्वतःशीच बोलल्यासारखे मेजर हुसेन बोलू लागले.

"विचार करायचा नाही म्हटलं तरी आठवणी येतच रहातात. दुसऱ्या महायुद्धाच्या आठवणी! आफ्रिकेच्या वाळवंटात जर्मन पॅंझर सैनिकांबरोबर झालेल्या युद्धाच्या आठवणी...बर्लिनचा पाडाव... त्यानंतरचे ते भयानक दिवस! शेवटी शेवटी जर्मन सैनिकच उरले नाहीत बर्लिनमध्ये. शहराच्या संरक्षणासाठी उभे असलेले जर्मन आम्ही शेतातली बुजगावणी गोळीने टिपावीत, तशी टिपली. जवळ जाऊन पाहिलं तर दहा बारा वर्षांची शाळकरी पोरे रक्ताच्या थारोळ्यात पडलेली!

आणि युद्धानंतर—! ह्या सैनिकांच्या बायका आपल्या कोवळ्या मुलीना अमेरिकन सैनिकांकडे पाठवत दोन ब्रेड आणि चीजच्या डब्यासाठी! हे युद्ध–युद्धात माणूस, माणूस रहात नाही. आणि त्याचा अनुभव लढूनच येतो–!"

"पण सर–!"

"प्रथम चहा घे. सैनिकानं आपल्या शरीराची काळजी घेतली पाहिजे. मारण्यासाठी, मरण्यासाठीही त्याची फार आवश्यकता असते!"

यशने चहाच्या कपाला हातही लावलेला नाही. त्यास आग्रह करणे व्यर्थ होते.

मेजर हुसेन आम्हा दोघांकडे पाहून म्हणाले, "हे पहा, तुम्हाला त्रास देण्याची आमची बिलकुल इच्छा नाही. तुम्ही आम्हाला त्रास देऊ नका, आम्ही तुम्हाला छळणार नाही. कबूल?"

इतरांचा, फार काय आपल्या सहकाऱ्यांचा सहजतेनं खून करणारे हे सैनिक आमच्यावरच कां एवढे 'रहेमदिल' आहेत हे मला जाणून घ्यायचे होते.

मी स्पष्टच विचारले, "मी हे कबूल करेन, पण तुम्ही इथं कां आलात ते सांगाल? एवीतेवी आमचं आयुष्य आता तुमच्याच हातात आहे. तेव्हा सांगण्यात तुम्हाला काहीच धोका नाही!"

"जरा सबूर धर! तुला आमचा बेत समजेलच. आणि जेव्हा तुला तो समजेल तेव्हा तूच मला कॉंग्रॅच्यूलेशन्स दिल्याखेरीज रहाणारा नाहीस!"

मग जे. सी. ओ. कडे वळून ते म्हणाले, "आता ह्याना घेऊन जा."

रशीद प्रथम माझ्याकडे आला. दंडाला हिसडा देऊन त्यानं मला उभं केलं, तशी फिरून डोक्यातून कळ आली. माझे दोन्ही हात मागं वळवून ते करकचून बांधून टाकले. आणि ओढतच त्याने मला खोलीच्या दुसऱ्या टोकाला नेलं. मघाशी मी पाहिलेलं स्नानगृह होतं ते!"

दारात उभा करत तो म्हणाला, "साहेबांच्यामुळे तू वाचलास. एरवी–!"

त्याच्या नजरेतला खुनशीपणा पाहून माझ्या सर्वांगावर शिरशिरी आली.

"आता काही गडबड करू नकोस! नाहीतर—!"

त्यानं वाक्य अर्धवट सोडून दिलं आणि धाडकन् दरवाजा बंद केला. ☆ ☆

## [ १३ ]

दार बंद झाले तसा पहिला विचार माझ्या मनात आला तो यशचा! आता हे त्याचा आणखीन् छळ तर करणार नाहीत ना ह्या शंकेने मला अकारण व्याकुळता आली. युद्धात सारेच क्षम्य असते असे म्हटले जाते!

पण त्यात 'क्षम्य' नेहमी आपल्याला असते असे गृहित धरलेले असते. शत्रू जे करतो ते 'अमानुष,' 'माणुसकीला काळीमा फासणारे' अशा शब्दानी वर्णिले जाते.

यशचा आवाज ऐकू येतो का हे पहाण्यासाठी मी दाराला कान लावले. काही अस्पष्ट शब्द ऐकू आले. पण ते कुणाचे होते हे मी ओळखू शकलो नाही. यशला पकडून आणले तेव्हा छतावरच्या खिडकीतून निव्वळ दृश्यच दिसत होते. आता हे अस्पष्ट ऐकू येणारे शब्द एवढाच यशचा आणि माझा दुवा राहिला होता.

यशची किंकाळी ऐकू आली नाही, त्या अर्थी ते यशचा छळ करीत नाहीत एवढे मी समजलो. दाराजवळून पावलांचे आवाज ऐकू आले. त्यानी यशला दुसऱ्या खोलीत हालविले आणि माझ्यासारखेच बंदिस्त करून ठेवले असणार हे आता स्पष्ट झाले!

पण आम्हा दोघाना त्यांनी जिवंत कां ठेवावे हे गूढ उलगडेना! त्याना एकत्र पाहिलेले आम्ही दोघेच साक्षीदार होतो. आणि असे महत्त्वाचे साक्षीदार मागे ठेवण्याचा धोका ते सहजासहजी पत्करणार नाहीत हे उघड होते. मग त्यांनी ही मेहेरबानी आमच्यावर कां करावी?

ह्या बंगल्यासारखी खुनाच्या दृष्टीने योग्य जागा त्यांना शोधूनही सापडली नसती. मरण्यापूर्वी मारलेली किंकाळी अथवा पिस्तुलाचा आवाज बाहेर रस्त्यापर्यंत पोहोचला नसता.








मग त्यानी आम्हाला जिवंत कां ठेवले ह्याचा मी विचार करू लागलो. कोणतेही कारण बुद्धीला पटेना. आम्ही त्याना सहकार्य देण्याची शक्यता सुतरामही नव्हती. कदाचित असेही असेल की आमच्या नकळत आमचा ते उपयोग करून घेणार असतील. कशाकरिता ते आमचा उपयोग करून घेऊ शकतील?

आणि एकदम मला आठवले की त्यांच्या टेबलावर दिल्लीचा 'रोड–मॅप' पसरलेला होता. त्यावर काही ठिकाणी पेन्सिलीने लाल वर्तुळे काढलेली होती. त्या वर्तुळांच्या नेमक्या जागा माझ्या लक्षात आल्या नाहीत. पण ही जागा शहराच्या उत्तरेस काहीशी पूर्वेला होती.

तेथे कोण भेटणार होते ? तेथे कुणाचा खून होणार होता? कोणती इमारत उडवून दिली जाणार होती?

विचार करून मेंदू शिणला. पण उत्तर सापडले नाही. मी जेथून सुरुवात केली तेथेच होतो.

कर्नल नायर ह्यावेळी काय करत असतील? माझा फोन कोठून आला हे त्याना शोधून काढता आले असेल काय? ओखल्याच्या बाजूने फोन आला एवढे जरी त्याना समजले तरी चौकशी चालू झाली असेल. ह्यापैकी कोणी ओखल्याच्या वळणावरच्या पोलिसाला विचारले तर आम्ही ह्या बंगल्याची चौकशी करत होतो हे त्याना समजू शकेल.

आमची रस्त्यात पडलेली गाडी कुणाच्या लक्षात आली असेल काय? आणि आली असल्यास त्यानी पोलिसात खबर दिली असेल काय? आपली गाडी चोरीला गेली ही तक्रार शेटजी पोलिसाकडे करणार नाहीत हे नक्की ! आपल्या राजधानीत उघड माथ्याने वावरणारा हा हिंदू नागरिक, त्याने हे करावे? केवळ काही रुपयांच्या मोबदल्यात आपल्या देशाला धोका द्यावा.

हो आणि आम्ही ज्याच्याशी बोललो तो शेतकरी ? का तोही ह्या लोकाना सामील होता. त्यानेच यशला पकडून द्यायला मदत केली ? सारा देशच पोखरला होता, तेथे विश्वास कुणाचा धरायचा!

चाचपडत मी हातानी नळ सोडला. त्या पाण्याच्या धारेखाली मी डोके धरले. मघाशी पिस्तुलाचा दस्ता लागला होता तेथे जखम झाली असावी. थंड पाणी लागताच ती जागा चुरचुरू लागली. पण थकलेल्या शरीराला पाण्यानं टवटवी आली. श्रम काहीसे कमी झालेसे वाटले.

ह्या खोलीतून सुटकेचा काही मार्ग आहे का हे मी शोधू लागलो. वर उंचावर खिडकी होती, आणि खिडकीला गज नव्हते. पण तेथवर पोहोचायचे कसे ? माझे हात मागे बांधलेले होते. प्रतापचा चाकू माझ्या खिशात असता तर–?

काही जादू घडेल आणि हिंदी सिनेमातल्या नाटयपूर्ण प्रसंगाप्रमाणे अचानक खिडकीतून खाली उतरून कोणी माझ्या हाताची दोरी कापून टाकेल तरच सुटका होण्याचा संभव होता. पण खरे जीवन सिनेमापेक्षा किती वेगळे असते–?

सिनेमा ! कल्पनेला सिनेमाची भारी आवड! 'प्यासा' तिनं पाहिलं त्या रात्री तिनं मला डेहराडूनला पाठवलेल्या पत्रात, "जाने क्या तूने कही–" आणि, "जाने वो लोग ये कैसे, जिनको प्यारसे प्यार मिला," ही गाणी लिहून पाठवली होती.

कल्पना ! डेहराडून अकादमीतील माझी चार वर्षे इंतजारीची होती. प्रत्येक शनिवारी कल्पनेचं न चुकता पत्र येई ! माझी तिला आठवड्यातून दोन दोन पत्रे जात ! तिचं पत्र येण्यापूर्वीच माझं उत्तर तयार असे. आणि कधी कधी मी आणि माझं पत्र तिच्यासमोर हजर होत असू.

ते विश्वच वेगळं होतं. साध्या साध्या शब्दाना वेगळा, गहिरा अर्थ येई. छोटयाशा गोष्टी विलक्षण सुखवून जायच्या. ती चारही वर्षे वसंत ऋतू संपलाच नाही.

दिल्लीहून मी एक छानदार सूटकेस आणली होती. आणि ती मी कधीच वापरत नसल्याने मित्राना त्याबद्दल मोठं कुतूहल होतं. एकदा लेफ्टनंट माथूरनं ती बरेलीला जाण्याकरता मागितली. मी म्हणालो, "दोस्त जान हाजीर आहे. पण सूटकेस तेवढी मागू नकोस."

"तुझी जान घेऊन काय त्यात काय कपडे भरू."

माथूर माझा दोस्त. पण त्या दिवशी रागावला. सूटकेसवरून जाम भडकला. मग त्याला सांगणे भाग पडले.

"दोस्त गुस्सा छोड दो ! बॅगेत माझा खजाना आहे !"

"म्हणजे ?"



अहिंसा परमो धर्मः



अनुक्रमणिका

"कल्पनेची पत्रं आहेत !" आणि ते ऐकल्यावर माथूर राग विसरला. म्हणाला, "पहिलं सांगितलं असतंस तर वॅग मागण्याची गुस्ताखी हातून घडली नसती !"

एक, भारतीय सैन्यात अधिकारी होण्याची इच्छा, दुसरे कल्पनेशी लग्न– ह्या पलिकडे मला स्वर्ग देखील तुच्छ होता. आणि ह्या दोन्ही गोष्टी माझ्या हातातल्या होत्या.

पासिंग ऑट परेडची मी वाट पहात होतो. वडील परेड पहायला डेहराडूनला आले होते. खांद्यावर तारा चमकला. आणि परेड संपताच वडिलाना मी माझी इच्छा सांगून टाकली. कल्पनेच्या वडिलांचा आणि त्यांचा अनेक वर्षांचा स्नेह ! ते म्हणाले, "मुलगी एकदम पसंत, आपण विचारून टाकू !"

मला कुठला तेवढा धीर निघायला. आम्ही गावी पोहोचलो त्याच दिवशी मी कल्पनेच्या घरी गेलो. ती घरी नव्हती. पण तिचे वडील होते. मी पुऱ्या युनिफॉर्ममध्ये होतो. एकुलता एक तारा माझ्या खांद्यावर चकाकत होता. त्यावेळी मला त्याचा केवढा अभिमान वाटत होता.

आम्ही दोघे बसलो. संध्याकाळची वेळ होती. कल्पनेच्या वडिलानी ग्लासमध्ये बीअर ओतली; आणि एक ग्लास माझ्यासमोर ठेवत ते म्हणाले, "तू आता सैन्यातला अधिकारी झालास. घे !"

ग्लासला हात न लावता मी तसाच बसून राहिलो.

"पूर्वी घेतली आहेस ना ? मग उगीच संकोचू नकोस ! घे !"

आम्ही चीअर्स म्हणालो. एकमेकांचे ग्लास क्षणमात्र भिडले. त्यांचा मंद, मंजुळ आवाज झाला. त्या फेसाळणाऱ्या सोनेरी पेयाचा थंडगार घोट घेत मी माझं अवसान गोळा केलं आणि म्हणालो,

" एक काम होतं, वास्तविक पपाच विचारणार होते तुम्हाला. पण . . . !"

"बोल, बोल " कल्पनेचे वडील अगदी सहजपणे म्हणाले.

मनाशी आजवर अनेकदा घोळून ठेवलेलं वाक्य बोलताना मी अडखळलो. कसाबसा मी म्हणालो, "आपण रागावणार नसला तर . . . तर मी . . . म्हणजे I would like to marry Kalpana–if you permit me!"

कल्पनेचे वडील काहीच बोलले नाहीत. हातातला ग्लास त्यानी टेबलावर ठेवला. त्यातली बीअर हिंदकळत राहिली. तसेच माझं मनही !

ही स्तब्धता मला असह्य झाली. कल्पनेचे वडील खिडकीतून बाहेर पहात राहिले. निरभ्र आकाशात, खिडकीजवळ आलेल्या फांदीवर चिमण्या चिवचिवत होत्या. त्यानी फिरून माझ्याकडे पाहिले. शब्द शोधत असल्यासारखे त्यांचे ओठ उगीचच हालले. मग गंभीर होत ते म्हणाले,

"तू मला आवडतोस. तुझा स्पष्टवक्तेपणा आवडला. स्वतःच विचारायला आलास तू ! अशी निर्भय तरुण पिढी हवी भारताला !"

ह्या भारताशी आता तरी मला काहीच कर्तव्य नव्हते. त्यांचा होकार ऐकण्यासाठी माझे प्राण कानात एकवटले होते.

"पण ज्या स्पष्टपणे तू प्रश्न विचारलास त्याच स्पष्टतेनं मी उत्तर दिलं तर तू रागावणार नाहीस, असं मी समजतो ! मला हे मान्य नाही !"

आवंढा गळ्याशी आला होता. तो गिळून मी विचारलं,

"एक विचारू ? माझ्यात काही दोष आहे का ?"

फिरून तीच स्तब्धता, फिरून माझी तीच अवस्था !

" नाही, ते कारण नाही. माझी मुलगी सैन्यातल्या अधिकाऱ्याची पत्नी व्हावी असं मला वाटत नाही. सैन्यातल्या अधिकाऱ्याचं जीवन नेहमी फिरतीचं, मुलांचे हाल, त्यांच्या शिक्षणाची आबाळ, अधिकारी आघाडीवर असला म्हणजे त्याची पत्नी एकटी ! परत युद्ध सुरू झालं म्हणजे त्याच्या जीवनाची शाश्वती नाही !"

"पण हेंही कुणाला तरी पत्करावं लागतं. देशासाठी लढावं लागतं —!"

"हो, मला मान्य आहे. ह्या अधिकाऱ्याबद्दल मला आदर आहे. पण माझ्या एकुलत्या एक मुलीचा पती मला सैन्यात नको आहे.

लांब नाही, माझ्या बहिणीचे यजमान कर्नल आहेत, आणि माझ्या बहिणीचं जीवन माझ्या मुलीच्या वाट्याला यावं असं मला वाटत नाही !"



अनुक्रमणिका

दोन दिवस मी माझ्या खोलीच्या बाहेर पडलो नाही. सैन्यातली नोकरी सोडण्याची माझी तयारी नव्हती तसेच परिस्थिती स्वीकारायलाही मी तयार नव्हतो. शेवटी मी कल्पनेला पत्र लिहिलं–माझ्याबरोबर पळून येण्याबद्दल !

तीन दिवस मी पत्राच्या उत्तराची वाट पहात होतो–पाण्याबाहेर काढलेल्या मासळीसारखा !

–अकस्मात टेलिफोनची घंटा वाजू लागली. हॉलमध्ये टेलिफोन ह्या स्नान-गृहाच्या दारापासून फारसा दूर नव्हता. मी दाराजवळ गेलो. खाली झोपलो आणि खालच्या फटीतून काही दिसते का पाहू लागलो.

टेलिफोनची घंटा वाजतच राहिली. पलिकडच्या खोलीत कोणीच नव्हते. हा फोन कुणाचा ?

इतक्यात झरझर चालणारी पावले दिसली. टेलिफोन उचलण्याचा आवाज ऐकू आला.

" हॅलो "– दबल्या आवाजात लेफ्टनंट युसूफने विचारले. काही क्षणानंतर युसूफचे शब्द ऐकू आले, " येस् स्पिकींग !"

फिरून काही वेळ काहीच ऐकू आले नाही. मग युसूफने काळजीपूर्वक विचारले, " पंतप्रधान आणि संरक्षण मंत्री जाणार आहेत ?

. . . नक्की ? . . . ठीक . . . आम्ही बरोबर आठ वाजता जमुना ब्रिजवर आहोत . . . थॅंक्स !"

फोन बंद झाला. युसूफची पावले त्याच त्वरेने माघारी जाताना मी पाहिली. फिरून सारे शांत झाले. ☆ ☆

## [ १४ ]

मला आणि यशला पहाताच शेतकरी-दादांची मुद्रा खुलली. ओळखीचं स्मित करून त्यानी हात वर केला. आता अंधार पडू लागला होता आणि तरीही तो शेता-तून बंगल्याकडे लक्ष ठेवत उभा होता. ह्याऐवजी त्यानं पोलिसाना खबर दिली असती तर —?

हिरवी गाडी बंगल्याच्या फाटकाबाहेर पडताना दिसली तसा तो प्रथम भांबावला. पण मला आणि यशला गाडीत पुढच्या सीटवर बसलेलं पाहून त्याचा संशय दूर झाला.

त्यानं हात हालवून आपणाकडे लक्ष वेधून घेण्याचा प्रयत्न केला. आणि आमच्याकडून काहीच प्रतिसाद न मिळाल्यानं तो गोंधळून गाडीकडे पहात राहिला.

मागे बसलेल्या कुणाच्या लक्षात हे आलं असेल का हा विचार माझ्या मनात यायला आणि लेफ्टनंट युसूफनं प्रश्न विचारायला एकच गाठ पडली.

"कोण होता तो ?"

मी बोललो नाही. तशीच गाडी चालवत राहिलो. तसा चिडून युसूफ म्हणाला,

'सूना नही, कौन था वह आदमी ?"

मी हसलो आणि म्हणालो, "तुम्हाला काय आम्ही मूर्ख वाटलो सरळ बंगल्यात शिरायला ? बाहेर आमचे लोक होते –!"

युसूफ चांगलाच चमकला. आपला पाठ-लाग होत नाही ना हे पहाण्यासाठी त्यानं एकवेळ मागे दृष्टीक्षेप टाकला. मागे कुणाची गाडी नाही हे पाहून तो मेजर हुसेनला म्हणाला,

"सर, तुम्ही पाहिलं नाहीत ! तो शेत-कऱ्यासारखा दिसणारा माणूस ह्यांच्यापैकी होता."

मेजर हुसेन बोलले नाहीत. तसा अधि-कच अस्वस्थ होत.युसूफ म्हणाला, "सर–!"

त्याला मध्येच थांबवत त्रासिक सुरात मेजर हुसेन म्हणाले, "तो पोलिसांपैकी असता तर त्यानं ह्याना आपण गाडीत असताना कधीच ओळख दिली नसती."

आम्ही आता दिल्ली–मथुरा रस्त्या-पर्यंत पोहोचलो. काळोख पडला होता आणि रस्त्यावरची गर्दी आता बरीच कमी झाली होती.

माझ्या शेजारी बसलेला यश अद्यापही निस्तब्धच बसला होता. त्याच्या म्लान डोळ्यातली जाणीवच हरपल्यासारखी झाली होती. शून्यात पाहिल्यासारखा तो बाहेर पहात बसला होता. मला पहिल्यांदा भेटलेला यश आठवला. केवढा बदल झाला होता त्याच्यात गेल्या काही तासांच्या अव-धीत ! पण तो सावरेल. काळ हेच कोण-त्याही व्यथेवर उत्तम औषध असते. त्याच्या-सारखा धन्वंतरी नाही. हळुवार हाताने तो जखमेवर मलमपट्टी करतो. हळूहळू घाव भरून येतात. पण ते खरोखरच येतात का ? का वरवर खपली धरली जाते आणि आत जखम तशीच ओली रहाते.

## कादंबरी स्पर्धेत यशस्वी झालेले



### प्रभाकर भालजी पेंढारकर

'दीपावली' ने आयोजित केलेल्या कादंबरी–स्पर्धेत पहिल्या क्रमांकाचे पारितोषिक पटकावणारे श्री. प्रभाकर पेंढारकर हे कोल्हापूरचे सुप्रसिद्ध दिग्दर्शक श्री. भालजी पेंढारकर यांचे चिरंजीव. बी. ए. ची पदवी हस्तगत केल्यावर आपल्या वडिलांच्याच हाताखाली दिग्दर्शक म्हणून त्यानी कामास सुरुवात केली. नंतर श्री. व्ही. शांताराम यांच्या 'राजकमल'–मध्येही त्यानी चार वर्षे तेच काम केले. १९५९ मध्ये 'भाव तोचि देव' या चित्रपटाचे कथा–लेखक आणि दिग्दर्शक म्हणून ते रसिकांपुढे आले. अधूनमधून एखादी कथा लिहिणे, नभोवाणी-साठी एकांकिका लिहिणे, इत्यादि प्रकारची त्यांची साहित्य-सेवा चालू होती. १९६२ साली 'फिल्म्स डिव्हिजन' ची नोकरी पत्करून त्यानी दिग्दर्शक या नात्याने लघुपट– अनुबोधपट यांच्या निर्मितीला सुरुवात केली. या नोकरीच्या निमित्ताने गेल्या पाच वर्षात—सध्या त्यांची पस्तिशी चालू आहे — त्यानी देशाच्या निरनिराळ्या भागातून अगदी कानाकोपऱ्यापर्यंत प्रवास केला. सामान्य नागरिकाला जाण्याची परवानगी नसते अशी — म्हणजे भारताच्या सीमा–रेषेपासून हिमालयाच्या बर्फाच्छादित शिखरां-पर्यंत बरीचशी ठिकाणे त्यानी समक्ष पाहिली आणि कॅमेऱ्याने टिपली. या त्यांच्या प्रवासात त्याना अनेक प्रकारचे व स्वभावाचे लोक भेटले, कित्येकांच्या ओळखी झाल्या, विविध अनुभवही मिळाले; त्यातले काही चित्तथरारक होते.

पॅरा–ट्रेनिंगवर फिल्म तयार करण्यासाठी पॅराशूट ट्रेनिंग स्कूलमध्ये ते गेले. तेथील मुख्य शिक्षक स्वॉड्रन लीडर मिनू वाणीया यांच्याशी त्यांचा परिचय झाला. त्यांच्या तेथील दोन महिन्यांच्या मुक्कामात त्याना सैनिकी-जीवन अगदी जवळून पाहण्यास मिळाले. प्रस्तुतच्या–'प्रतीक्षा' कादंबरीत त्यांच्या तेथील अनुभवांचा प्रत्यय येतोच.

इतके विविध अनुभव संग्रही असल्याने ते लिहून काढावे असा त्यांच्या अनेक मित्रानी आग्रह केला. त्यानुसार आणि सुप्रसिद्ध दिग्दर्शक व अभिनेते कै. बाबूराव पेंढारकर यांचे चिरंजीव श्री. त्यागराज यांच्या प्रोत्साहनाने श्री. प्रभाकर पेंढारकर यानी 'प्रतीक्षा' ही पहिलीच कादंबरी लिहिली. त्यांच्या प्रस्तुत लिखाणावरून त्यांच्याकडून दर्जेदार साहित्य–निर्मितीची वाच-कानी 'प्रतीक्षा' करण्यास काहीच हरकत नाही.



दुसऱ्या पारितोषिकाचे मानकरी

### रवींद्र रामचंद्र पिंगे

'दीपावली' ने आयोजित केलेल्या कादंबरी-स्पर्धेत श्री. रवींद्र पिंगे यांच्या 'परशुरामाची सांवली' या कादंबरीला दुसऱ्या क्रमां-काचे पारितोषिक मिळाले आहे.

श्री. पिंगे यांचा जन्म १९२६ साली मुंबईत झाला. त्यांचे आई–वडिल दोघेही प्राथमिक शिक्षक असल्याने बालपणापासूनच त्यांच्यावर शिक्षणाचे संस्कार झाले. ते पदवीधर असून आता-पर्यंत नगरपालिका, शिधावाटप, नौदल, सचिवालय इत्यादि ठिकाणी त्यानी नोकरी केली असून सध्या ते मुंबई आकाशवाणीवर साहाय्यक सादरकर्ते या पदावर काम करीत आहेत.

गेल्या वीस वर्षात त्यांनी भरपूर साहित्यसेवा केली असून त्यांचे साहित्य विविध नियतकालिकांतून प्रसिद्ध झालेले आहे. त्यांच्या 'महापूर' या श्रुतिकेला आकाशवाणीच्या नभोनाट्य स्पर्धेत पारितोषिक मिळाले होते. लेखनाचाच व्यवसाय त्यानी पत्करला असून ते त्या क्षेत्रात यशस्वितेचे शिखर गाठतील अशी त्यांच्या 'परशुरामाची सांवली' कादंबरीवरून खात्री पटते.

त्यांची सदर कादंबरी 'दीपावली'मधून यथावकाश प्रसिद्ध होणार आहे.

— संपादक





अनुक्रमणिका

तसे जर नसेल तर कल्पनेच्या आठवणीने अद्यापही मनात अशी चलबिचल कां व्हावी ? त्या प्रकरणाचा शेवट झाला हे एकदा ठरल्यावर मी फिरून असा व्याकूळ कां होतो आहे ?

कच्छला निघण्याची ऑर्डर आणि वडिलांचे पत्र एकाच दिवशी आले. माझा 'ऑर्डर्ली ग्यानसिंग माझं सामान भरत होता. त्या साऱ्या पसाऱ्यात मी वडिलांचं पत्र परत परत पहात बसलो होतो. पत्रात मजकूर होता– "कल्पनेचं लग्न ठरलं आहे. मुलगा दिल्लीलाच एका मोठ्या कंपनीत चांगल्या हुद्यावर आहे. लग्न पुढील आठवड्यात आहे . . . !"

ग्यानसिंगला प्रश्न पडला होता.– ह्या सुरेख सूटकेसचं काय करायचं ? मी ती कधीही विसंबत नसे, हे त्याला माहीत होतं. पण आघाडीवर काही ती नेता येणार नाही, म्हणून तो मला विचारायला थांबला होता.

मी म्हणालो, " ह्या किल्ल्या ! आम्ही मेल्यावर ही सूटकेस तू घे ! आतील सगळे कागद जाळून टाक. सूटकेस फिरून माझ्या नजरेसमोर आणू नकोस !"

कच्छच्या लढाईत माझं वॉर-रेकॉर्ड उत्तम आहे असं कर्नल नायर म्हणाले. उत्तर साधं होतं – जीवनाबद्दल आसक्ती न उरलेल्या माणसापासून मृत्यू नेहमीच दूर पळतो!

" उजव्या बाजूस ! " मेजर हुसेननी मला सूचना दिली. त्याप्रमाणे गाडी शहरात नेण्याऐवजी मी उजव्या बाजूस वळवली. गावाबाहेरील रिंग रोडने गाडी धावू लागली.

जीवनाबद्दल आसक्ती उरली नाही असं कच्छला जाताना जे वाटलं तो भ्रमच असावा. एरवी, युसूफच्या पिस्तुलाची पर्वा न करता मी गाडी कोणत्याही चौरस्त्यावर थांबवली असती आणि धावत सुटलो असतो.

युसूफच्या हातातल्या पिस्तुलाची नळी जवळजवळ माझ्या मानेला टेकली होती. असे काही मी केले असते तर गाडीबाहेर पडण्यापूर्वीच पिस्तुलाची गोळी माझ्या मानेतून आरपार गेली असती. असे मरायची माझी तयारी नव्हती. काहीही होवो मला ह्या तिघांबरोबर रहाणे आता अत्यावश्यक झाले होते.

त्या तिघानाही मी टेलिफोनवरील संवाद ऐकला असेन ह्याची बिलकुल कल्पना नव्हती. वास्तविक टेलिफोनवर आपण बोललो हे युसूफच्या गावीही नव्हते. तो तरुण होता आणि त्याला फाजील आत्मविश्वास होता. अशीच माणसे स्वतःला नकळत भलत्या चुका करून बसतात. मला काळजी होती ती मेजर हुसेन आणि सुभेदार-मेजरची !

ह्या मेजर हुसेनना आतापर्यंत एकदाही मी अस्वस्थ झालेलं पाहिलं नव्हतं. मिलीटरी हॉस्पिटलमध्ये कैदेत असताही चेहऱ्यावर भाव असा की सारी हुकमाची पाने त्यांच्याच हाती आहेत. जबरा आत्मविश्वास, विलक्षण थंड डोकं आणि सावध बुद्धी ! ह्या माणसाच्या हातून चूक होण्याची शक्यता कमी होती !

सुभेदार मेजरबद्दल प्रथमपासून मला अस्वस्थ करणारी कोणती गोष्ट असेल तर त्याची विलक्षण ताकद ! ज्या सहजतेने त्याने माझे दोन्ही हात पाठीशी पिळवटून बांधून टाकले, ती शक्ती सामान्य सैनिकाची नव्हती. त्याच्याशी मुकाबला करायची पाळी आली तर तो मला व यशला आवरायचा नाही.

यशच्या दुखऱ्या बोटावर कुणीतरी पट्टी बांधली होती. त्याचे केस विंचरलेले दिसत होते. कपडे तसे ठीक दिसत होते. ओढलेला चेहरा आणि निस्तेज नजर सोडली तर फार काही विशेष घडले आहे हे त्याच्याकडे पाहून लक्षात येणे कठीण !

इंद्रप्रस्थ मागे टाकून आम्ही पॉवर-हाऊस रस्त्याजवळ येऊ लागलो होतो. येथून पुढे उजव्या बाजूस राजघाट लागतो. तो ओलांडला की लोअर बेळा रोडने आम्ही थेट यमुना ब्रिजला पोहोचलो असतो.

ह्या पूल दिल्ली आणि उत्तर प्रदेशाला जोडणारा एक अत्यंत महत्त्वाचा सांधा ! पूर्ण लोखंडी खांबाच्या ह्या पुलावरून रोज हजारो मोटारी, ट्रक्स् दिल्लीला येतात-जातात.

ह्या पुलाचा विशेष असा की हा पूल जसा दिल्ली आणि उत्तर प्रदेशाचा दुवा तसाच दिल्ली–पंजाबचाही ! यमुना ह्या पुलावरून ओलांडून सीमेकडे जाणाऱ्या गाड्या प्रथम उत्तर प्रदेशात येतात आणि फिरून मुझफ्फरनगरजवळ यमुना ओलांडून पंजाबमध्ये प्रवेश करतात.

ह्या पुलाची रचना मोठी मजेशीर आहे. एकाच वेळी मोटारी, रेल्वे आणि पादचारी अशी तिहेरी वाहतूक या पुलावरून चालू असते. पुलाला दोन मजले आहेत. खालच्या रस्त्याने मोटारी, रेलिंग घातलेल्या फूटपाथवरून पादचारी आणि वरच्या मजल्यावरून रेल्वे अशी येथे व्यवस्था केलेली आहे !

अमृतसर आणि पंजाबसीमेकडे जाणाऱ्या फ्रॉंटीयर मेल वगैरे गाड्या ह्या पुलावरूनच जातात. हा पूल जर उडवून दिला तर आघाडीवर रसद पोहोचवायला दुसरा रस्ता पत्करावा लागेल. एक वेळ दुसऱ्या रस्त्याने दिल्लीहून पंजाबला जाता येईल. पण देशातून निरनिराळ्या बाजूने येणारे सैनिक, त्यांची साधनसामुग्री, हत्यारे, दारूगोळा उत्तर प्रदेशातून दिल्लीला पोहोचवणे कठीण होऊन बसेल. आघाडीवरून परत येणारे जखमी सैनिकही दिल्लीला पोहोचू शकणार नाहीत. दिल्लीहून जाणारी रसद वेळेवर पोहोचली नाही तर आघाडीवरचा साराच कार्यक्रम विस्कळीत होईल, आणि सैन्याच्या हालचाली, ज्या घड्याळाच्या काटघाबरहुकूम व्हाव्या लागतात, तशा न झाल्याने मोहिमा फिसकटतील.

पण ह्या सर्वापेक्षा महत्त्वाची गोष्ट अशी की दिल्लीसारख्या राजधानीच्या शहरी जर असा पूल उडवून देता आला तर जनतेत हाहाःकार उडेल. लोकांचे मनोधैर्य खचेल आणि ते फिरून सावरणे महाकठिण होऊन बसेल.

अनुक्रमणिका

हे सर्व पूल उडवून देता आले तर —! कमांडोंच्या इतिहासात ही एक लोकविलक्षण कामगिरी ठरेल. पण ते घडणे जवळ जवळ अशक्यच ! कारण एक तर ह्या पुलावर नेहमीच, सतत रहदारी चालू असते. दुसरे, आता हे पाक सैनिक भारतात उतरल्यापासून इतर ठिकाणावरोवरच पुलावरचा बंदोवस्तही अतिशय कडक केलेला होता. पुलावर डायनामाईट लावण्याकरिता काही वेळ तरी त्याना पुलावर निर्वेधपणे काम करायला मिळायला हवे. आणि ते घडणे अशक्यच होते ?

आता रस्त्याच्या डाव्या हातास लालकिल्ला दिसत होता. उजव्या बाजूस यमुनेवरील पूल दिसू लागला. ब्लॅक–औटमुळे रस्त्यावर दिवे नव्हते. मोटारीचा प्रकाशही दिव्यावर कागद चिकटवून किंवा काळा रंग लावून निव्वळ पुढच्या रस्त्यावर काही फुटांपर्यंतच पडेल अशी व्यवस्था करण्यात आली होती. नेहमी गजवजलेला हा भाग आज रहदारी चालू असताही निर्जीव, ओस पडलेल्या शहराच्या भागासारखा वाटत होता.

मेजर हुसेननी मला गाडी पुलाकडे घेण्यास सांगितले.

एखाद्या कादंबरीतल्या विलक्षण रहस्याने आपणास खिळवून टाकावे आणि ती कादंबरी संपवल्याखेरीज हातून खाली ठेवू नये असे मला झाले होते. शक्य असते तर ह्या कादंबरीतील मधली पाने गाळून मी एकदम शेवट वाचला असता. जीवनाच्या कादंबरीचा तसा तो कुणाला वाचता येत नाही आणि म्हणूनच त्यातले प्रत्येक प्रकरण हे असे रंगते.

पुलाच्या ह्या बाजूस गाड्यांची मोठी रांग लागली होती. ह्या रांगेच्या शेवटी आमची गाडी नेऊन मी उभी केली. पुलावर पहारा कडेकोट होता. प्रत्येक वाहनाची चौकशी केली जात होती. त्यावाचून कोणतेही वाहन पुलावर सोडले जात नव्हते.

आता शहादऱ्याच्या बाजूने येणाऱ्या गाड्यांसाठी पूल खुला केला होता आणि आमच्या बाजूच्या गाड्यांची चौकशी चालली होती. एक आशा होती. कर्नल नायरनी सांगितले होते की पोलिस माझ्या शोधात आहेत. एखादा पोलिस मला वर्णनावरूनही ओळखेल. अटक करेल तर साराच प्रश्न सुटेल.

एव्हाना आमच्या मागेही गाड्या येऊन उभ्या राहिल्या होत्या. येथून आता गाडी मागे नेता येणेही अशक्य ! हीच ती संधी ! मी उतरलो आणि धावत सुटलो तर –! नशीव चांगले असले तर युसूफच्या पिस्तुलातून सुटणाऱ्या गोळ्या मी चुकवू शकेन. प्रश्न हा होता की अशा जागी ह्या पाक सैनिकानी गोळ्या झाडून साऱ्या पोलिसांचे लक्ष आपल्याकडे वेधून घेतले असते काय ?

हे पाक सैनिक काय करत असावेत आता ! गाडीचा मागे दिसणारा आरसा आम्ही गाडीत वसल्यापासूनच वेपत्ता होता. त्यामुळे मागे काय हालचाल चालू आहे हे समजणे अशक्य होते. मागे पहायच्या वंदीची गाडी सुरू करतानाच मेजर हुसेननी आम्हाला कल्पना दिली होती आणि पहाण्याचा प्रयत्न केला तर 'बुऱ्या नतीजास' तयार रहा असा इशाराही त्यानी दिला होता.

रस्त्यावर काळोख होता. गाडीतही काळोख होता. मागे ते काय करीत आहेत हे समजायला मार्ग नव्हता. पण मागच्या हलकेच चाललेल्या आवाजावरून ते गप्प बसलेले नाहीत हे मी समजू शकत होतो. ते तसे गुंतले आहेत. तेवढ्यात गाडीतून उतरायचे. पुढच्या गाडीआड दडायचे आणि तिच्या आडोशाने पलिकडे उभ्या असलेल्या पोलिसांकडे धावत सुटायचे, मी ठरवले ! दोन शक्यता होत्या. एक तर सैनिकांनी मला गोळ्या घातल्या असत्या, तसे झाले असते तर त्यांच्याकडे लगेच पोलिसांचे लक्ष गेले असते. दुसरी शक्यता, ते गप्प राहिले असते, तर पकडले गेले असते. निदान त्यांचा येथे जो काय बेत ठरला होता तो तरी उधळला गेला असता.

कां कुणास ठाऊक मला वाटत राहिले, ही आपली शेवटची संधी. काही करायचे झाले तर ती हीच वेळ !

मी स्टिअरिंग व्हीलवरून हात काढला, आता दार उघडणार इतक्यात मेजर हुसेन मला म्हणाले—

"आपल्या बाजूची रहदारी खुली केली आहे. गाडी एकदम पुढं घे !"

"पण क्यू आहे. समोरच्या गाड्या –?"

"Never mind. Take our car ahead!"

देशात गांधी जन्मशताब्दी साजरी होत आहे




**सत्य (कीं सत्ता) हेच परब्रम्ह !**

मी गाडी चालू केली. रांगेत उभ्या असलेल्या गाड्याना ओलांडून मी जसा पुढे निघालो तसा काही गाड्यानी हॉर्न वाजवून, काही ड्रायव्हरनी खिडकीतून तोंड बाहेर काढून आमचा उद्धार करायला सुरुवात केली.

त्यांच्याकडे दुर्लक्ष करून मी पुलाच्या प्रवेशापर्यंत गाडी पुढे आणली. एक पोलिस त्वरेने पुढे आला आणि गाडी थांबवत आमच्यावर खेकसला, " आगे कहाँ जाता है ?"

पोलिस गाडीच्या डाव्या बाजूस होता. यशलाच त्याने प्रश्न केला, " किसकी गाडी है यह ?"

"पुलिस की !" मागून उत्तर आले.

माझ्या कानाजवळ थंडगार पिस्तुलाच्या नळीचा स्पर्श होत होता. कुणीतरी आतून यशचे आयडेंटीटी कार्ड पोलिसाच्या पुढे धरले. पुलावर दिवे नव्हतेच. पोलिसने, कागद चिकटवून मंद प्रकाश केलेल्या विजेरीचा झोत कार्डावर टाकला.

आत यशचा फोटो होता. तो पाहिल्यावर यशला सॅल्यूट ठोकून पोलिस म्हणाला, "चलो, जाने दो !"

मी गाडीचे गिअर बदलले. गाडी हलली तसा मागे दोन्ही दारे उघडल्याचा आवाज झाला. मी चमकून मागे पहाणार तोच पिस्तुलाच्या नळीने मला थांबवत, मागून युसूफ म्हणाला,

" मागं पहाण्याची कोशिश करू नकोस. गाडी चालू राहू दे."

फ्राँटीयर मेलची दूरून शिटी ऐकू आली. आमच्या पुढे दोन गाड्या ब्लॅक–औटमुळे धीम्या गतीनं चालल्या होत्या. त्यांच्या मागोमाग मीही निघालो. मागचे काही दिसण्याचा संभवच नव्हता. साधारण पुलाच्या मध्यावर आम्ही आलो आणि अकस्मात मेजर हुसेन म्हणाले,

"गाडी थांबव !"

गाडी थांबली. मागून येणाऱ्या मोटारीने हॉर्न वाजवला आणि आमची गाडी हालत नाही हे पहाताच तो डावीकडे वळसा घालून निघून गेला. रहदारी चालूच राहिली.

पुलाच्या मध्यभागी मोटार थांबवून काय करायचे, ह्या पाक सैनिकांच्या मनात आहे हे मला समजेना. मी क्षणभर विचार केला आणि जे व्हायचे ते होवो म्हणून मी मागे वळून पाहिले.

—गाडी रिकामी होती !

"यश, ते पळाले !"—मी ओरडलो.

इतका वेळ सुन्न होऊन बसलेला यश एकदम चमकला. आम्ही दोघानी मागे पाहिले. आणि त्याच वेळी, अंधाराचा फायदा घेऊन, पुलाच्या रेलिंग आड रशीदला लोकांच्या गर्दीत मिसळताना मी पाहिले.

आम्ही दोघे त्वरेने खाली उतरलो—आणि फिरून आगगाडीची धडधड स्पष्ट ऐकू आली.

त्या आवाजासरशी सारे रहस्य काळोख्या खोलीत कोणी एकदम हजार कँडलचा दिवा पेटवावा तसे स्पष्ट दिसू लागले.

गाडी रिकामी आहे ह्याचा अर्थ विमानातून टाकलेला सगळा दारूगोळा मागच्या डिक्कीत असणार. त्याला फ्यूज लावून हे तिथे निघून गेले होते.

सगळ्या पोलिसांदेखत, इतका कडक बंदोबस्त असताही पूल उडवायचा हा साधा, सोपा उपाय ! आणि पूल उडवायला निवडलेली वेळही अशी विलक्षण ! काही क्षणातच फ्राँटीयर मेल पुलावर येईल आणि आघाडीला भेट द्यायला चाललेल्या पंतप्रधान, संरक्षणमंत्री आणि जनरल चौधरी ह्या सर्वांसह ती उडवली जाईल.

हे सारे विचार क्षणार्धात माझ्या मनात चमकून गेले.

ह्या स्फोट कधी होणार ? दहा सेकंद ? पंधरा ? कदाचित पाचच !

यशला मी म्हणालो, "ह्या गाडीच्या डिक्कीत बॉम्ब आहे. पूल उडवून द्यायला ठेवलेला !"

– माझं वाक्य पूर्ण व्हायच्या आत यश डिक्कीकडे धावला. डिक्कीची चावी प्रथमपासूनच कुणीतरी काढून ठेवलेली होती. साऱ्या ताकदीने यशने हॅण्डल वर खेचण्याचा प्रयत्न केला. डिक्की उघडली नाही.

काय होते आहे हे लक्षात येण्यापूर्वीच फिरून यश गाडीच्या पुढच्या बाजूस धावला. मी तेथे पोहचण्यापूर्वी* त्याने गाडी सुरू केली.

काय घडते आहे ह्याची कल्पना आली तसा मी थिजून गेलो ! जागचे पाय उचलेनात !

कसाबसा मी ओरडलो, "यश, यश हा मूर्खपणा करू नकोस."

पण माझे शब्द कुणालाच ऐकू आले नसावेत. कारण ह्याच वेळी धाड धाड आवाज करीत फ्राँटीयर मेल पुलावर येत होती. यशने गिअर बदलण्याइतकाही वेळ दवडला नाही. गाडी पुलावरून सुसाट धावत होती.

–ह्याच वेळी मला मेजर हुसेन दिसले. ते आणि त्यांच्या पलिकडचा सुभेदार-मेजर रशीद दोघेही जागच्या जागी खिळल्या-

सारखे उभे होते. प्रथमच त्यांच्या कल्पनेतही न आलेली गोष्ट घडली होती. यशाचा मायेफिरूपणा पाहून ते अवाक् होऊन उभे होते.

आता फरांटीयर मेल आमच्या डोक्यावर आली होती. गाडीच्या हादऱ्याने पूल कंप पावत होता, आवाजाने इतर काही ऐकू येणे अशक्य झाले होते.

ह्या गाडीत भारताचे प्रधानमंत्री होते. संरक्षण मंत्री होते. ज्यांचा युद्धाशी काही संबंध नाही अशी असंख्य बायका मुलें होती. ह्या साऱ्यांच्याच खुनाचा कट मेजर हुसेननी रचला होता. माझ्या मनात एक त्वेषाची लहर उठली; आणि मी हुसेनांच्या अंगावर धावून गेलो.

ते वळले आणि फिरून धावायला सुरुवात करणार इतक्यात मी त्यांचा दंड धरून त्याना मागे खेचले आणि सारी शक्ती एकवटून ठोसा ठेवून दिला. त्या ठोशाबरोबर ते मागे फेकले गेले. दुखवलेल्या पायाने त्याना दगा दिला. कठड्याला ते थडकले आणि स्वतःला सावरण्यापूर्वी ते खाली यमुनेच्या पात्रात पडले.

आणि बरोबर ह्याच वेळी कान बधीर करणारा स्फोट कडाडला. जमीन, सारा पूल हादरला. रात्री एकदम माध्यान्हीचा सूर्य क्षणमात्र चमकून जावा असा प्रकाश पसरला. त्या प्रकाशात, बेफाट वेगाने पोलिसांच्या अडसराला न जुमानता पुलापलिकडे गेलेली यशची गाडी भुसनाळ्यासारखी पेटलेली मी पाहिली. त्याच्या शेजारची पोलिस चौकी, तेथल्या पोलिसासह चिंधड्या होऊन हवेत उडाली. पुलावर लोकांचा एकच हलकल्लोळ उडाला.

आणि एकाएकी माझ्या पोटात विलक्षण कळ आली. एकदम प्राण कंठाशी आले. डोळ्यासमोर अंधेरी आली. पडता पडता मी पाहिले—रक्ताने माखलेला, प्रतापचा सुरा घेऊन रशीद माझ्यासमोर उभा होता. खुनशी त्वेषाने त्याने—आणि एकवेळ ते धारदार तीक्ष्ण पाते माझ्या पोटात खुपसले. ☆ ☆

[दीपा. २१]

# [ १५ ]

मी खाली खोल खोल फेकला जात होतो. हा यमुना–ब्रिज तर नाही ? रशीदने मेजर हुसेनच्या पाठोपाठ मलाहि खाली नदीच्या पात्रात तर फेकून दिलेले नाही ? पाण्याच्या थंडगार स्पर्शाची मी वाट पहात होतो, आणि अचानक माझ्या सर्वांगाला जोराचा धक्का बसला. सवयीने मी वर पाहिले. पॅराशूट उघडले गेले होते. नेहमीप्रमाणे मी हवेवर तरंगत, एखाद्या अजस्र पक्षासारखा सहजतेने जमिनीकडे हळू हळू उतरू लागलो.

सकाळची वेळ होती. सूर्य नुकताच वर येत होता. सॅटर पॉईंटवर उभ्या असलेल्या पॅरा ट्रेनिंग स्कूलच्या अधिकाऱ्याना ओळखण्याइतका मी त्यांच्याजवळ आलो होतो. फ्लाईट लेफ्टनंट बानर्जीनं उकडते म्हणून शर्ट काढून ठेवला होता. त्याच्या शेजारी उभा असलेला सहानी मला सूचना देत होता, "नंबर चार एडी पंजे मिलाना. बायाँ पट्टा नीचे खींचो . . ."

सारेच कसे जादूच्या नगरीसारखे छोटे छोटे आणि सुरेख दिसत होते. ड्रॉपिंग झोनच्या भोवतालची झाडे, कंट्रोल टॉवरची इमारत, आम्हाला नेण्यासाठी आलेल्या जीप्स्, ट्रक्स् – लहान मुलांच्या खेळण्यासारख्या वाटत होत्या.

हळूहळू जमीन वर येऊ लागली. लहान वाटणारी माणसे, घरे, झाडे, पहाता पहाता मोठी होऊ लागली. सवयीने वाऱ्याचा अंदाज घेत मी रोलसाठी दोन्ही पाय जुळवले. दाणकन् मी जमिनीवर आदळलो. तळपायाच्या झिणझिण्या डोक्यापर्यंत पोहोचल्या. पोटात गोळा आला, आणि असहनीय कळ आली तसा मी अस्फुट किंचाळलोच!

माझ्या डोक्यावर हात ठेवत नर्स म्हणाली, "तुम्ही हालचाल केलीत तर फिरून जखम दुखत राहील. पोटाला घातलेले टाके निघतील !"












मी डोळे उघडले. दिल्लीच्या मिलीटरी हॉस्पिटलमधली ही खोली आहे. ह्या खोलीत मी पूर्वीही आलो होतो. त्यावेळी ह्या बिछान्यावर मेजर हुसेन होते.

आता त्याना दुसरी खोली दिली आहे. अधिक बंदोबस्ताची! पण आता बंदोबस्ताची जरूरी नाही. कारण आता ते फिरून पळून जायचे नाहीत. कोणी उचलून नेतो म्हटलं तरी ते शक्य व्हायचं नाही. त्यांच्या पाठीचा कणा दुखवला गेला आहे. कंबरेचे हाड आणि एक पाय मोडला आहे. ह्यातून ते जगलेच तर त्यांचा सैन्याला दूरच राहो, स्वतःलाही फारसा उपयोग होणार नाही. पुढचे सारे आयुष्य त्याना चाकांच्या खुर्चीवर बसून काढावे लागणार आहे. त्यांच्यासारख्या धडाडीच्या, जिद्दी अधिकाऱ्यास ही मृत्यूपेक्षा भयानक शिक्षा आहे.

सुभेदार मेजर रशीदबद्दलही आता मला वाईट वाटते आहे. त्याच्या हातातल्या सुऱ्याला न घाबरता, त्याला एका सरदारजीनी पकडले. दुसऱ्या दोघानी त्याला मिठी घातली आणि सुरा त्याच्या हातून हिसकावून घेतला. ह्या झटापटीत एक-दोघाना जखमा झाल्या. तसे लोक चवताळले जाट, शीख आणि भैय्यांनी पोलिस तेथे पोहोचेपर्यंत त्याला अर्धमेले करून टाकले. पोलिसानी कसेबसे त्याला लोकांच्या तडाख्यातून सोडवले. डोक्यातून, तोंडातून रक्त गळते आहे, कोपरातून निघालेला हात लोंबकळतो आहे. ओठ फाटले आहेत. कपडे रक्तानं भिजले आहेत अशा अवस्थेत त्याला पोलिसांनी रस्त्याने फरफटत पुलापलिकडे नेले आणि जीपमध्ये कोंबले.

मी जेव्हा शुद्धीवर आलो तेव्हा कां कुणास ठाऊक ह्या दोघाना पाहण्याची मला अत्यंत प्रबळ इच्छा झाली. जणू हा एक प्रकारे सामनाच होता, आणि तो संपल्यावर मला माझ्या जोडीदाराशी हात-मिळवणी करता येत नव्हती तर निदान प्रतिस्पर्ध्यांशी तरी करायची इच्छा होती.

मेजर हुसेनना हालवता येणे शक्य नव्हते. कंबरेखालचा त्यांचा सर्व भाग प्लॅस्टरमध्ये होता. पण कर्नल नायर आणि इन्स्पेक्टर मेहरानी स्वतःचे वजन खर्चून सुभेदार-मेजर रशीदला मला भेटायला आणले.

त्याचा हात प्लॅस्टरमध्ये होता. शरीरावर आणि डोक्यावरही जागोजागी बांधलेल्या शुभ्र बॅंडेजमुळे तो विचित्र दिसत होता. त्याला दंडाला धरून पोलिसानी आणून माझ्या खोलीत उभे केले. खोलीत कर्नल नायर, डॉक्टर आणि इन्स्पेक्टर मेहरा होते. त्याना भीती होती की रशीदला पाहून मी एकदम भडकेन, ओरडेन! त्यानाच काय, मला स्वतःला माझी प्रतिक्रिया रशीदला पाहून काय होईल याचा अंदाज नव्हता.

रशीदला माझ्यासमोर आणून उभे केल्यावर मी आपला एकटक पहातच राहिलो. मी पूर्वी पाहिलेल्या रशीदमध्ये आणि ह्या रशीदमध्ये, बॅंडेजमधून दिसणाऱ्या चेहऱ्याच्या सारखेपणापलिकडे काहीच साम्य उरलेले नव्हते. माझे हात असामान्य ताकदीने पिरगाळून मागे करकचून बांधणारा रशीद, स्नानघराच्या दारात, "साहेबामुळे तू ह्या खेपी वाचलास." म्हणून दरडावणारा रशीद, आणि शेवटी माझ्या पोटात सुरा खुपसताना मी पाहिलेला रशीद –! तो रशिद वेगळा होता. त्यावेळी त्याच्या डोक्यात खून होता, त्वेष होता, मायेफिरू राग होता. इतक्या परिश्रमाने जमवून आणलेला डाव उधळून गेल्याने आलेली बेडी निराशा होती— काहीही असो ते जिवंत माणसाचे डोळे होते.इयं डोक्याला असलेली ती निव्वळ दोन भोके होती. निस्तेज, कोणताही भाव नसलेले, जाणीव हरपलेले ते दोन डोळे पाहून मला त्याची दया आली.

आणि वाटले की मला तशा अवस्थेत पाहून त्यालाही माझी दया आली असावी.

खरंच मी कसा दिसत असेन. वृत्तपत्रात माझे आलेले फोटो सिस्टरने मला दाखवले होते. वृत्तपत्रात माझ्यावर रकानेच्या रकाने भरून मजकूर येत होता आणि मी थोडाफार यातना सहन करण्याइतका बरा असे तेव्हा सिस्टर मला तो वाचून दाखवत असे.

रशीदला घेऊन जाण्यासाठी कर्नल नायरनी सांगितले. पोलिसानी दंडाला धरून त्याला खेचले. त्यापूर्वी तो एक क्षण माझ्याकडे एकटक पहात होता. त्याला काही बोलायचे असावे. त्याचे ओठ हलले. दोनच शब्द तो बोलला. कदाचित "माफ किजिए" असं तो म्हणाला असेल. कदाचित् ती माझीच कल्पना असेल. कारण मला काहीच ऐकू आले नाही. पोलिस त्याला घेऊन निघून गेले.

कर्नल नायर माझ्याजवळ आले. डोक्यावर हलकेच हात ठेवत त्यानी विचारले, "आता कसं वाटतं ?"

ह्या प्रश्नाचं उत्तर त्याना माहीत होतं. डॉक्टराना माहीत होतं, आणि एव्हाना मलाही कळून चुकलं होतं. फिरून पोटातून असह्य कळा येऊ लागल्या. मी बिछान्यात तडफडू लागलो. सिस्टर पुढे झाली आणि तिनं मला फिरून मॉर्फियाचं इन्जेक्शन दिलं.

भिंतीवरच्या कॅलेंडरची तारीख सांगते आहे की माझा हा असा जाणीवे-नेणीवेतून प्रवास गेले तीन दिवस चालला. आहे. मॉर्फियाचा परिणाम उतरला की मी शुद्धीवर येत असे. काही तास मी शुद्धीवर असे. फिरून कळा सुरू झाल्या की मॉर्फियाचं इन्जेक्शन देण्यात येई. शुद्धीवर असलेल्या वेळीही मी काहीसा गुंगीत पडलेला असे.

समोरची माणसं ओळखायला मला उशीर लागे. बधीर झालेल्या शरीराच्या अवयवासारखी माझ्या मेंदूची अवस्था झाली होती.

माझे हे हाल माझ्या वडिलाना पहावत नसत. मी तडफडताना पाहून त्यांच्या डोळयात पाणी येई. त्यांचा मी एकुलता

एक मुलगा ! आईविना त्यानी वाढव-लेला ! त्यांच्या डोळ्यातले पाणी पाहून मला वाईट वाटे. शरीराच्या यातनाप्रमा-णेच मनाच्याही यातना मॉर्फियाच्या इन्जेक्शनने थांवत !

लेफ्टनंट युसूफ स्वतःहून पोलिसांच्या स्वाधीन झाला होता. मेजर हुसेनना पुला-वरून खाली यमुनेच्या वाळूत पडताना त्यानं पाहिलं. रशीदला पकडून लोकानी झोडपायला सुरुवात केलेली त्यानं पाहिली. पुलाच्या दोन्ही बाजूस पोलिसानी नाके-बंदी केली होती. त्या तरुण, उत्साही अधि-काऱ्याची उमेदच खचली, आत्मविश्वास ढळला, जिद्द संपली ! मग लढा कसला ? तो स्वतःहून पोलिसांच्या स्वाधीन झाला. रशीदला तशा अवस्थेत पाहिल्यानंतर युसूफला पहाण्याचा मला उत्साह राहिला नाही.

मला ' वीरचक्र' मिळाल्याचे समजले. सामना मी जिंकला होता खरा ! पण तो जिंकला तेव्हा यशापयशाची माझी आस्था संपली होती. हेडक्वॉर्टर्सहून मला पहाण्या-साठी ब्रिगेड कमांडर येऊन गेले. मोठ्या मुश्कीलीने सवड काढून घाई घाईतच ते आले होते. पण मी शुद्धीवर येईपर्यंत त्याना थांबवे लागले. शुद्धीवर आल्यावरही मी त्याना ओळखू शकलो नाही. त्याना माझ्याबद्दल वाटणारा अभि-मान पाहून माझं मन भरून आलं. वाटले, ह्याच्या शतांशाने जरी मला स्वतःबद्दल अभिमान वाटला असता तर ––!

कर्नल नायर आणि इन्स्पे-क्टर मेहरा मला भेटायला रोज येत आहेत. कर्नल नायरांच्या मागं कामाचा डोंगर उभा आहे. त्यातून वेळ काढून, दगदग करून त्यानी येणं मला पसंत नाही. पण मी आता त्याना तसं सांगायचं सोडून दिलं आहे. फार तर एखाद्या दिवसाचाच आता प्रश्न आहे. पोटात तीन चार खोल जखमा झालेला, आणि उत्तमोत्तम तज्ज्ञ डॉक्टर-रानी करूनही ज्याचं ऑपरेशन यशस्वी झालेलं नाही तो माणूस आणि किती दिवस जगणार आहे?

आज सप्टेंबरची तेवीस तारीख आहे. हातातला पेपर दाखवत सिस्टर मला सांगते आहे, "हे पहा! पाकनं युद्धबंदी स्वीकारली. युद्ध संपलं!"

कुणी जिंकलं हे युद्ध? हार कुणाची आणि जीत कुणाची? कोणीही जिंकलं असो अथवा हरलं असो आज माझ्या, रशीदच्या किंवा मेजर हुसेन यांच्या अवस्थेत फारसा फरक नाही.

–असे वाटण्याचे कारण कदाचित् आजच्या तरुणांचे श्रद्धाशून्य जीवन हे असेल! कदाचित हेही असेल की युद्धाच्या भट्टीत माणसाच्या अंगातील उत्तम गुण शुद्ध सुवर्णासारखे तावून सुलाखून निघतात, तसेच ह्या खाईत माणसाच्या माणुसकीचा होम होतो.

माझ्या पोटातल्या कळा वाढताहेत. सिस्टरला मार्फिया दे म्हणून मीच सांगणार होतो, इतक्यात ती माझ्याजवळ आली. आणि सुखदुःख, यशापयशाची आनंद वा खेद वाटण्यापलिकडे गेलेल्या अवस्थेतही माझ्या काळजाचं पाणी पाणी होईल अशी गोष्ट तिनं मला सांगितली.

यशची तरुण विधवा पत्नी, तिच्या छोट्या मुलीसह मला पहायला आली आहे. हॉस्पिटलच्या व्हरांड्यात ती वाट पहात आहेत.

–आयुष्य ही एक प्रतीक्षा आहे ! वेगवेगळ्या वेळी वेगवेगळ्या गोष्टींची ! भावपूर्ण तरुण वयात कल्पनेच्या पत्रांची प्रतीक्षा होती! नंतर खांद्यावर एक चकाकता तारा मिळविण्याची, तो मिळा-ल्यावर कल्पनेशी विवाहाचे स्वप्न प्रत्यक्षात येण्याची!

आणि आता–!

आता, जीवनाच्या शेवटच्या क्षणी ही प्रतीक्षा पुरे! केव्हातरी जी घडी यायचीच आहे, ती आता, ह्या क्षणी, यशची विधवा पत्नी आणि मुली भेटायला येण्यापूर्वी यावी–!

पोटातून असह्नीय कळ आली. मी दात ओठात रोवले. कळा येतच राहिल्या. मी तडफडू लागलो तशी लगबीगीने सिस्टरने इन्जेक्शनची सुई माझ्या शरीरात खुपसली.



काही क्षण गेले आणि पॅरा-शूट उघडले. फिरून मी हवेत तरंगू लागलो. नेहमीप्रमाणं खालची सृष्टी जादूनगरीसारखी रमणीय दिसू लागली आणि वाटू लागले – ह्या विश्वाचा स्वामी मी आहे.

● ● ●

(भारत–पाक संघर्षावरील काल्पनिक कादंबरी ! ह्या कादंबरीत वर्णन केलेल्या व्यक्ती व प्रसंग सर्वस्वी काल्पनिक असून वास्तवतेशी त्यांचा संबंध असल्यास तो केवळ योगायोग आहे ! )

# [illegible]

**ग्री**नरुमच्या आरशासमोर दीनानाथ वसले होते. तो आरसा, ते झगमगते दिवे, रंगाच्या पेट्या, मागे तारेवर टांगलेले कपडे, कोनाड्यात ठेवलेली पगडी, कोपऱ्यात ठेवण्यात आलेले दक्षिणी जोडे, व्हिग्ज आणि पिना – हे सारं दीनानाथांना परिचित असंच होतं. कपडे बदलत, पादत्राणे पालटत पगडीच्या जागी मुकुट दिसत असे. अंगरखा धोतराच्या जागी लष्करी पोषाख लटकलेला असे. क्वचित प्रसंगी भरजरी कपड्यानीच सारी ती खोली भरून जाई. त्या साऱ्या गोष्टी पालटत असत. पालटत नसत फक्त दीनानाथ! आरशासमोर बसायचं आणि बहुरूपी बनायचं. आज कृष्ण तर उद्या सुधाकर. परवा अर्जुन तर तेरवा धैर्यधर. रूप वेगळे, पोषाख आगळा, अभिनयाची जात वेगळी–गाण्याचे राग वेगळे. प्रत्येक भूमिकेची मागणी वेगळी वेगळी. अभिनयाची आणि गाण्याचीही! दीनानाथ तेच – प्रेक्षक तेच. रंगमंचाचा थाट आणि घाटही तोच. पण व्रन्समोअरच्या जागा वेगळ्या. टाळ्यांची वाक्यं वेगळी.

दीनानाथांना हे सारं परिचित होतं. चिरपरिचित होतं. त्यातला आनंद, धुंदी, बेहोषी – निर्मितीची तृप्ती आणि व्यावहारिक यशापयश. यशानंतर येणारे शैथिल्य आणि अपेशानंतर येणारा वैताग, येणारे वैफल्य आणि उगीचच मनात येऊन जाणारा निवृत्तीचा विचार. आणि मग एखाद्या नव्या नाटकाचे वा भूमिकेचे मिळणारे आवाहन व आव्हान. पुन्हा उभे राहणे. आणि कधी लोकप्रियतेच्या लाटेवर स्वार होऊन स्वर्गलोकाची सफर करून येणे तर कधी सपशेल आपटी आणि उलटया अर्थाचे स्वर्गदर्शन – ह्यांतच दीनानाथांचं आयुष्य गेलं होतं. असामान्य यशाची धुंदी. त्या धुंदीच्या पाठोपाठ तिच्यावर कुरघोडी करू पाहणारी स्तुतीची धुंदी – सत्कार– गौरव – गौरवाच्या प्रसंगी दिलेले गोड



**....नाटक संपले, अभिनय संपला, चारुदत्ताची कथा संपली आणि व्यथाही संपली.... उरले दीनानाथ, त्यांचं भाग्य आणि त्यांचं दुर्दैवही! .... असामान्य कलाविष्कार साधूनही त्या श्रेष्ठ कलावंतामधला कलाकार आतल्या आत आक्रोशात होता ....**











अनुक्रमणिका

शब्दांचे मद्य आणि नंतर सहजच पुढे येणारे खरेखुरे, कडू पण अमृतमय वाटणारे मद्य – त्या मद्याची एक–दोन–अनेक आवर्तनं. त्यांची वेहोषी त्यानी अनुभवली होती. आणि मग असामान्य अपेक्षांची हत्तीसारखी अंगावर चालून आलेली लाट, तिने मांडलेला हाहाःकार, झालेली पडझड, साथी-सोबत्यांनी काढलेला पळ. आणि येणारे एकाकी-पण–दीनानाथानी हेही अनुभवले होते. विलास अनुभवला होता. आणि वनवासातही वाटचाल केली होती. त्यानी लोकाना वेगवेगळी रूपे दाखविली होती. आणि नियतीने त्याना आपली वेगळी रूपे दाखवली होती. चांगली आणि वाईट, सुंदर आणि कुरुप. हसविणारी आणि क्वचित खाऊन टाकणारी! पण कलेचे वरदान घेऊन येणा-राना हे शाप स्वीकारावेच लागतात. ब्रम्हपदाची ओढ बाळगणाराना हे लोखंडाचे चणे पचवावेच लागतात. हे ते जाणून होते. पण फार मोठे स्वामित्व गाजवून झाल्यावर येणारे फार मोठे अपेश...

सहन करायला तसे कठिण! त्यातही बायकामुलांचा गोता-वळा–मुलं तशी लहान, लहानच. अशा परिस्थितीत येणारा मनस्ताप, लाचारी, स्वाभिमानाला घालावी रागणारी मुरड, सामान्य माण-सानाही द्यावे लागणारे देवत्व–त्याची त्रस्त करणारी अपरिहार्यता–पुढे चमकणाऱ्या काही नाण्यांची चमचम आणि होणारा त्यांचा आवाज कानात घुमावा म्हणून ऐकावे लागणारे उपदेशाचे मंत्र– "दीनानाथ, तुम्ही हे करा" "दीनानाथ, तुम्ही असं करायला नको होतं." "दीनानाथ, आम्ही तुमच्या पाठीशी उभे आहोत, तुम्ही ती अमुक भूमिका करा. तुम्ही तिला आगळे रूप द्याल." "दीनानाथ, तुम्ही तेवढी गाणी वदला बुवा– एक ना अनेक. बहुरूपी सजत होता. पण वृत्ती स्थिर होत चालली होती–स्थिर व्हायलाच हवी होती. कलाकाराची वृत्ती काहीशी अस्थिर, चंचल असली तरी चालणार होती. पण पतीची, पित्याची वृत्ती आता स्थिर व्हायलाच हवी होती.

समोरच्या कोपऱ्यात एक बैठक घातली होती. तीवर माई बसली होती. चारुलता तिच्या शेजारी बसली होती. प्रेमनाथ गादीवर झोपला होता. अरुणा दीनानाथांच्या शेजारी उभी राहून त्यांचा तो कायाकल्प पहात होती. मधूनच म्हणत होती, "बाबा, तुम्ही कित्ती छान दिसता आज!" तिच्या त्या म्हणण्याचे माईला हसू येत होतं. तिलाही ते पटत होतं. खूप दिवसानी दीनानाथानी मनापासून दाढी केली होती. बऱ्याच दिवसानी त्यानी ठेवणीतला पोषाख घातला होता. फर-कॅप घातली होती. सांगली संस्थानच्या राजानी कुठल्यातरी नव्या नाटकाच्या वेळी त्याना भेट म्हणून दिलेली चांदीच्या मुठीची काठी त्यानी मोठ्या रुबाबाने हाती घेतली होती. ताठ मानेने आणि ताठ चालीने ते नाट्यगृहापर्यंत चालत आले होते. जणु त्याना सुचवायचं होतं – कलाकार झुकल्यासारखा वाटला तरी वाकत नाही. आणि मोडल्यासारखा वाटला तरी तो पिचत नाही. काळाला आणि काळ पुरुषाला त्याचा पराभव करता येत नाही... विस्मृतीला त्याची स्मृती गाडून टाकता येत नाही. दारिद्र्याला त्याला खाऊन टाकता येत नाही. व्यसनाला त्याचं शरीर पोखरता येईल पण मनातली उमद खाऊन टाकता येणार नाही. "म्हणून तर मी पुन्हा पुन्हा उभा राहिलो आहे, राहणार आहे, राहिलंच पाहिजे–माझ्यासाठी नाही तरी माईसाठी, चारुलते-साठी, अरुणेसाठी, प्रेमनाथासाठी तरी!"

मेक-अप पूर्ण होत आला होता. आज खूप महिन्यानी ते रंगपटात बसले होते. ते सारे वातावरण परिचयाचे असूनही त्याना नवे वाटत होते. अनेक अर्थानी नवे. नाटक नवे नव्हते. पण भूमिका नवी होती. दीनानाथानी ती कधी केली नव्हती. दीनानाथानी अनेक आव्हाने स्वीकारली होती. भूमिकांची आव्हाने, विषयांची आव्हाने, सुरांची आव्हाने आणि व्यसनांची आव्हानेही! त्यांचा जिद्दी स्वभाव, धाडसी स्वभाव साऱ्यांना माहीत होता. त्यांच्या अभिनयाइतकेच त्यांच्या साहसी, हिंमती स्वभावाचेही लोकानी कौतुक केले होते. अशातल्याच काही लोकानी दीनानाथांच्या मदतीसाठी हा नाट्य-प्रयोग आयोजिला होता. दीनानाथांचे फिरलेले दिवस त्याना दिसत होते. पण नुसती लाचार मदत घेणे त्याना पटणार नाही हेही त्यांच्या ध्यानी आलेले होते. म्हणून त्यानी हा नवा घाट घातला होता. ह्यात नुसती मदत नव्हती तर एक कलात्मक आनंद होता. एक आव्हान होते म्हणूनच दीनानाथानी ते स्वीकारले होते. मेकअप करताना गेल्या काही दिवसातल्या यातना व मनस्तापाने एकीकडे

•••••••••••••••••••••••••••••••••••••••

प्र भा क र अ त्रे

•••••••••••••••••••••••••••••••••••••••

शरीराला त्रास होत होता तर एकीकडे त्या भूमिकेतल्या काही नव्या व सुंदर सुंदर जागा त्याना आवाहन करीत होत्या. एक मूक असा आनंद ते अनुभवीत होते. "आज मी माझ्या प्रेक्षकाना पुन्हा भेटणार आहे. नुसताच भेटणार नाही. नवे सौंदर्य दाखविणार आहे." त्यानी मोठ्या उत्साहाने ओठांवरून रंगाची कांडी फिरवली. अरुणा म्हणत होती, "बाबा, मला भूक लागली हो."

अभिनयाचा असीम आनंद आणि अरुणेला सतावणारी भूक– ह्यातलं खरं काय! की दोन्ही गोष्टी खऱ्या? सत्य? पहिला क्रम कुणाला द्यायचा? त्याना त्यावेळी 'भूक' नको होती. सौंदर्य हवे होते. म्हणून त्यानी माईला खुणावले– "हिला घेऊन जा." माई उठल्या. अरुणेला घेऊन गेल्या.

भूकही सत्य आणि कलात्मक सौंदर्यही सत्य! आपल्या दारि-द्र्यातही ज्या सौंदर्याची मोहिनी कधी सरली नाही तेच हे सत्य—

दीनानाथांची मान ताठ झाली. त्यानी मेकअप पूर्ण केला. आणि कपडे घालायला प्रारंभ केला. तेवढ्यात पहिली घंटा झाली. संस्थेचा सेक्रेटरी आत आला. "मी तयार आहे" दीनानाथ म्हणाले. ते धोतर नेसले. अंगरखा घातला. त्यावर त्यानी उपरणे परिधान केले. पगडी धारण केली. पुन्हा एकदा चेहऱ्यावरून पावडरचे फूल फिरवले. कपाळी गंध लावले. मग भिंतीवर टांगलेल्या नटराजाच्या प्रतिमेला त्यांनी वंदन केले. "नटराजा, आज मला बळ दे. यश दे. मी ही भूमिका नव्यानेच करतो आहे. माझ्या इतर भूमिकांप्रमाणेच








ह्याही भूमिकेला कीर्ति दे." आणि मग कां कुणास ठाऊक– त्यांच्या तोंडून ज्ञानेशांची ओवी बाहेर पडली, "दुरिताचे तिमिर जावो। विश्वस्वधर्म सूर्ये पाहो । जो जे वांछील तो ते लाहो। प्राणिजात ।। ज्ञानेश्वरी हा दीनानाथांचा श्रद्धा विषय होता. पण त्याचे प्रकटन ते टाळीत असत. पण नकळतच आज त्यांच्या तोंडून ती ओवी बाहेर पडली होती. त्यानी मनोमनच ज्ञानेशाला वंदन केले. म्हणाले, "योगिराज, यश द्या. मी फक्त कलेची सेवा जाणतो. त्यात मला साथ द्या!"

"कुणाला नमस्कार केलात?" माईने विचारले.

"माझ्या ज्ञानेशाला."

"काय मागितलंत?"

"दुरिताचे तिमिर जावो."

माईनी नकळत हात जोडले. चारुलता विचारीत होती, "आई, मी करू नमस्कार?"

"आपण सारे जण करू या."

साऱ्यानी नमस्कार केले.

तेवढ्यात दुसरी घंटा झाली.

सेक्रेटरी आत आला. दीनानाथाना म्हणाला "हाऊस अगदी पॅक्ड आहे. जादा खुर्च्या टाकाव्या लागल्या. तुमचे सारे चाहते, सरदार, राजघराण्यातली माणसं पुढे येऊन बसली आहेत. बाहेर तोबा गर्दी जमली आहे. पोलिस स्टेशनला फोन केला. बंदोबस्ताची मागणी केली आहे. पुन्हा प्रयोग लावावा लागणार. तुमच्या चिंता संपणार. पुन्हा एकदा तुमचे युग रंगभूमीवर अवतरणार!"

तो खूप उत्साहाने बोलत होता. दीनानाथ शांतपणे सारं ऐकत होते. असल्या शब्दांच्या नशेपेक्षा मद्याची नशा त्याना बरी वाटत असे. माणसे फसवी असतात, उगवत्या सूर्याला अर्घ्य देणारी असतात. हे त्याना ठाऊक होतं. त्यानी ते पाहिलं होतं. त्या मानाने मद्य हे अधिक प्रामाणिक होतं. त्याची नशा सच्ची होती. त्याला तर–तम भाव कळत नव्हते.

सेक्रेटरीचे भाषण संपल्यावर ते शांतपणे त्याला म्हणाले, "मला मद्य हवंय्. तुम्हाला मी सांगितलेलं होतंच!"



"होय! प्रयोगानंतरची रात्र आपलीच! आपण त्या मैफलीचे बादशहा असाल."

"आधी मद्य! मला नशा हवीय्!"

"नव्या नाटकाची, नव्या भूमिकेची नशा चढली नाही?"

"ती चढण्यासाठीच मला मद्य हवंय्"

"नाटकाच्या नशेसाठी मद्याची नशा?"

"होय! ते शास्त्र तुम्हाला कळायचं नाही. तुम्ही आधी मद्य आणा." दीनानाथांचा आवाज बदलू लागला होता. सेक्रेटरीने सावधगिरीची ती सूचना मानली. तो दुसऱ्या खोलीत गेला. त्याने मद्याची बाटली आणली. दीनानाथांच्या समोर ठेवीत तो नम्रपणे म्हणाला, "आज मृच्छकटिक नाटक आहे."

"आणि मी चारुदत्त आहे असंच ना?"

दीनानाथ त्याच्याकडे पहात मोठ्याने हसले. आणि मद्याचा चषक भरून हाती घेतला आणि माईकडे पहात म्हणाले, "माई, माझंच नाही तर चारुदत्ताचंही दारिद्र्य ह्या अमृताच्या पेल्यात मी बुडवून टाकतो. ह्या सुवर्णपेयानं त्याचं सोनं करून टाकतो." आणि त्यानी आणखी एक चषक भरला.

"आज संयम राखावा. खूप दिवसानी तुमचे चाहते मायबाप जमले आहेत. त्यांच्या अपेक्षाना तडा जाता कामा नये. आज फक्त तुमचं नाटक नाहीय्! तुमच्या नाट्यसेवेचा आज सत्कार व्हायचाय्! तुम्हाला आज थैली देणार आहेत."

"मला त्याची जाण आहे." असं म्हणत दीनानाथानी ती बाटली आणि चषक पेटीत ठेवून दिला. पुन्हा एकदा ओठांवरून लाली फिरवली. पावडरचे फूल तोंडावरून फिरवले. कपडे सारखे केले. पगडी घातली. पुन्हा एकदा नटराजाला नमस्कार करून नंतर ते माईसमोर उभे रहात म्हणाले, "आता मी कसा दिसतो?"

"छान! माझ्या ह्या भाग्याला दृष्ट न लागो." असं म्हणत त्यानी कानशिलावर बोटे मोडली. तेवढ्यात अरुणा म्हणाली, "आई मला भूक लागली ग!"

दीनानाथांच्या मनात कुठे तरी ओरखडा उठला. ते अस्वस्थ झाले. तेवढ्यात एक कार्यकर्ता आत आला. त्याला ते म्हणाले, "हे पैसे घ्या. आणि समोरच्या दुकानातून झकासपैकी मिठाई घेऊन या! मुलाना भूक लागलीय्."

कलेप्रमाणेच भूकेचीही नशा चढते तर! ते स्वतःशीच म्हणाले त्याना एकदम भडभडून आलं. त्यानी चारुलतेला आणि अरुणेला दोन्ही हातानी जवळ घेतलं, कवटाळलं आणि म्हणाले, "दारिद्र्य मरण यातुनि मरण बरे वा दरिद्रता खोटी."

माई म्हणाली, "त्याना काय कळणार ह्यातलं?"

"कळणार नाही तेच बरं. भाग्यवान आहेत बेट्या. कधी-कधी वाटतं पुन्हा लहान व्हावं."

"आता ते होणे नाही."

"हीच तर मोठेपणातली वेदना आहे."



अनुक्रमणिका

"आज साऱ्या वेदना वुडवून टाका तुमच्या असामान्य कलेच्या ...त!" आणि माई त्यांच्या डोळ्यात पहात राहिल्या.

दीनानाथ काहीच बोलले नाहीत.

सेक्रेटरी आत आला. म्हणाला, "तिसरी घंटा देत आहोत. ...ची तयारी?"

"आहे!" दीनानाथ म्हणाले.

—सेक्रेटरीने त्यांच्या हाती नारळ दिला. दीनानाथ रंगमंचावर ... त्यानी नारळ फोडला. पाणी साऱ्या रंगमंचावर शिंपडले. ...पेटवला. ऊद जाळला. रंगमंचावर त्यानी एक साष्टांग नमस्कार ...ला. तेवढयात दोन्ही विंग्ज्मधून सूत्रधार, नटी, वसंतसेनेची ...का करणारी सौदामिनी ही सारी माणसे त्यांच्या शेजारी येऊन ... राहिली. तिसरी घंटा झाली. नांदी झाली. प्रेक्षागारात आनंदाची ... पसरली. त्यांच्या आवडत्या दीनानाथांचा स्वर त्यांच्या कानी ... होता. दीनानाथांचे नवे रूप पाहण्यासाठी साऱ्यांचे नेत्र आसुसले ... नटी सूत्रधाराचा प्रवेश झाला आणि "**शिव शिव! या मैत्रेयाने ...यांची आमंत्रणे कां लावीत? काय काय अवस्था प्राप्त झाली!**" ... म्हणत मैत्रयाने प्रवेश केला. मैत्रेयाचे काम दीनानाथांचे एक ... सहकारी श्रीधरपंत करीत होते. मैत्रेय म्हणजे श्रीधर असे ...करण रंगमंचावर रूढ झालेले होते. नाटकाला प्रथमपासून रंग ...ला. दीनानाथानी प्रवेश केला आणि आकाशाकडे पहात, दुःखपूर्ण ...रा टाकीत ते गाऊ लागले.

"सार्थची ते वदती। लोकी!! प्रारब्धाची गति न कळे ती।।

श्रोत्यांनी टाळ्यांचा कडकडाट केला. दीनानाथ रंगत गेले.

**परी सौख्या भोगोनि दुःख येता**
**सततु परि तो मृत मनुज जाणताता**

...द्रय आणि मरणाची चर्चा सुरू झाली आणि चारुदत्त म्हणतो,

**मरण बरे वाटते॥ दारिद्र्याहुनि मित्रा ते॥**

निर्धनतेने घडणारे अनर्थ चारुदत्त सांगत होता मैत्रेयाला. ...नतेने लाज, लाजेने तेजस्वितेचे हरण, तेजोहीनतेमुळे अपमान, ...मुळे जीवन फलहीन वाटणे, शोक—शोकातून बुद्धिनाश—बुद्धि-...ने सर्वस्वनाश—

दीनानाथ सांगत होते — मैत्रेय झालेले श्रीधर ऐकत होते— दारिद्र्यकथा त्यानी अनेक चारुदत्तांच्याकडून आजवर ऐकली ... पण ते चारुदत्त नाटकापुरतेच चारुदत्त असत. दीनानाथांचा ...दत्त पहात असताना मात्र त्यांच्या मनात राहून राहून येत होतं ...हा चारुदत्त नाटकापुरताच चारुदत्त नाही. हा खराखुरा चारु-...त्त जणु आपल्यासमोर उभा आहे आणि तो जणु आपल्या जीव-...नाची कथा आपल्याला सांगतो आहे—दीनानाथ करीत होते तो अभिनय नव्हताच. ते ती भूमिका जणु स्वतः जगत होते. त्यातली ...भाविकता, समरसता पाहून खुद्द श्रीधर भलतेच खूष झाले होते. ... तर मंत्रमुग्ध झाले होते. चारुदत्त कोणता आणि दीनानाथ ...ते असा संभ्रम पडावा असे काहीतरी अपूर्व त्याना रंगमंचावर ... होते. पैसे वसूल वगैरेच्या लौकिक परिभाषेच्या पलिकडचा एक असामान्य अनुभव त्याना मिळत होता. ते नाटक नव्हते. तो चारुदत्त नव्हता. चारुदत्ताचा अभिनय नव्हता—ते जणु होते जीवनच. जीवनच बोलत होते. जीवनातली व्यथाच जणु आकार घेत होती. दीनानाथ, श्रीधर, सौदामिनी ही मंडळी जणु एक जीवनपटच प्रेक्षकांच्या समोर मांडून बसली होती. डाव मांडला होता. दान पडत होते. नरदा निरनिराळ्या घरातून फिरत होत्या, डाव रंगत येत होता.

**होता भाग्य क्षीण नराचे, मित्रही अमित्र होती.**

ही साकी दीनानाथांनी आळवून आळवून म्हटली. श्रोते गाण्यात रंगून गेले. श्रीधर यांचाच प्रत्यय त्यानाही येत होता. नाटकातल्या नरदा हलत होत्या. प्रत्येक घरात डोकावून पहात होत्या. नवे दान मिळाले की पुढे-मागे होत होत्या. त्यांचा प्रवास चालू होता. चारुदत्त फिरत होता. त्याच्या दुःखाला जणु घरच लाभत नव्हते, आणि वसंतसेनेचे दागिने सापडत नाहीसे झाले तेव्हाची वेदना व्यक्त करताना चारुदत्त म्हणतो—

जन सारे मजला म्हणतील की॥
दारिद्र्याने वहुतचि छळिले॥
धन त्याजवळी काही न उरले॥
म्हणुनि कर्म हे अनुचित केले॥
ऐसे दूषण देतिल की॥

पुन्हा पुन्हा ध्रुवपदावर येऊन दीनानाथ गात राहिले. आणि मग एक ओळ सारखी आळवून आळवून म्हणत राहिले,





अनुक्रमणिका

## गझल स्पर्धेच्या निमित्ताने—

**गझल** हा काव्यप्रकार हिंदी भाषेत लोकप्रिय आहे. मराठी भाषेत मात्र त्या प्रकाराचा फारसा उपयोग केला जात नाही असे आढळते. 'दीपावली' यंदा पंचविसाव्या वर्षात पदार्पण करीत आहे त्यानिमित्ताने मराठीतील कवींना हा प्रकार हाताळण्याचे आम्ही आवाहन केले आणि त्यासाठी 'गझल स्पर्धा' जाहीर केली. वेळ थोडा असूनही जाहीर केलेल्या मुदतीत पन्नासावर गझल आमच्या हाती आले. त्यांचे परीक्षण कविवर्य राजा बढे यानी आमच्या विनंतीवरून केले आणि निर्णय दिला तो खालीलप्रमाणे:—

क्रमांक १ : 'गांधार' (श्री. उमाकांत कीर, मुंबई) (पारितोषिक रु. २५।-)
२ : 'मी वेचते निखारा' (श्री. त्र्यं. शं. देशमुख, पिंपळनेर, जि. धुळे) (पारितोषिक रु. १५।-)
३ : 'काव्यात रंगतो मी' (श्री. सुभाष रा. दळी, मुंबई) (पारितोषिक रु. १०।-)

उपरोक्त तिन्ही गझल या दिवाळी अंकात प्रसिद्ध केले आहेत. याशिवाय स्पर्धेसाठी आलेल्या गझलांपैकी काही निवडक गझल 'दीपावली'च्या पुढील अंकातून प्रसिद्ध होतील.

गझल–स्पर्धेत भाग घेणाऱ्या सर्व कवींचे आणि परीक्षक श्री. राजा बढे यांचे आम्ही आभारी आहोत.

आमच्या विनंतीला मान देऊन सर्वश्री कुसुमाग्रज, मंगेश पाडगांवकर, वा. रा. कान्त, राजा बढे, सोपानदेव चौधरी, अमृतानंद आणि शान्ता शेळके यानी दिवाळी अंकासाठी आपले गझल पाठविले ते अन्यत्र दिलेले आहेत. या सर्व कवींचे गझल स्पर्धेमध्ये समाविष्ट नव्हते हे येथे नमूद करावयाचे आहे.

—**संपादक**

## गांधार

या उरी अंधार होता दीपिका तू होउनी
जीवितींचा पंथ प्रीतीचा नवा तू दाविला
तू फुले केलीस सारी कंटकांची चुंबुनी
शब्द माझे सांडलेले अर्थ त्यांचा लाविला!

तू व्ययावेलीस माझ्या देउनी आधार हा
अंगणींचे वृक्ष सारे सोयरे केलेस तू
आणि मातीच्या मनाला स्वप्नकोडे घालुनी
शल्यवेडी आगळी ती भूषणे ल्यालीस तू!

स्वास्थ्य माझे उंबराचे फूल झाले पाकळ्या
आर्द्रगंधा लोचनाना पापणीची भूल ये
मूक झाले शब्द सारे, दुःख आले पांघरू
पुष्पशेला ये शिरी, स्कंधावरोनी शूल ये!

दीपिका होतास तू हे स्वप्न झाले देखणे
अन् उरी अंधार झाला गीत गांधारातले!

**उमाकान्त कीर**, मुंबई

## मी वेचते निखारा

गेला सुकोन गेला हा गंध मोगऱ्यांचा
मी वेचते निखारा राखेत आसवांचा ॥ धृ ॥

झाले अबोल गाणे, जाळी जिवास रात
मी शोधते स्वरांचे दाणे मुक्या तमात
विरहात वेदनेचा काटा सले फुलांचा
मी वेचते निखारा राखेत आसवांचा ॥१॥

जखमेत भैरवीच्या नभ कोसळून आले
ओल्या व्यथेत माझ्या मी सावली जहाले
धारेत आसवांच्या पक्षी बुडे स्मृतींचा
मी वेचते निखारा राखत आसवांचा ॥२॥

मी गीत गुंफिलेले झाले भकास भग्न
डोळ्यात आटलेले आकाश अर्धनग्न
मी शाप भोगते ग ऽऽ स्वरविद्ध जोगियाचा
मी वेचते निखारा राखेत आसवांचा ॥३॥

**त्र्यं. शं. देशमुख**, पिंपळनेर

## काव्यात रंगतो मी

काव्यात रंगतो मी काव्यात डुंबतो मी
काव्यातली सुरा ती आकंठ प्राशितो मी ॥ धृ ॥

ना झोपडी स्वतःची नाही कुणीही माझे
डोक्यावरी कुणाचे नाही तसेहि ओझे
बेबंध जीवनाचा आस्वाद चाखतो मी ॥१॥

ना भूक यौवनाची ना ओढ कंचनीची
पोटास मात्र पुरते चतकोर भाकरीची
प्रक्षुब्ध भावनाना हृदयात ठेवितो मी ॥२॥

मेघातली निळाई, चापल्य ते विजेचे
बेलांगता कड्यांची, भांडार चांदण्यांचे
सौंदर्य सृष्टीचे हे शब्दात गुंफितो मी ॥३॥

ना लोभ जीवनाचा औत्सुक्य मात्र आहे
धुंदीतल्या क्षणांचे पाथेय पृष्ठि वाहे
मस्तीत त्या स्मृतींच्या हा जीव पोसतो मी ॥४॥

**सुभाष रा. दळी**, मुंबई







**दारिद्र्याने बहुतचि छळले"** ही ती ओळ. वादक मोठ्या पेचात पडले. जणु सारंगीची तार तुटली. पेटीचा एक स्वर निखळून पडला. तब-ल्याचे कातडे निसटले. ते दीनानाथांकडे निरखून पाहू लागले. पण एरव्ही आपल्या साथीदारांकडे जाणीवपूर्वक लक्ष देणारे दीनानाथ जणु आज हरवले होते. समोर खराखुरा चारुदत्त उभा होता. त्याला सूर कळत नव्हते. फक्त दारिद्र्याची वेदना कळत होती. दारि-द्र्याने बहुतचि छळिले ही गाण्याची ओळ नव्हती. तो होता एक जिवंत अनुभव! मग गाणे सरले. सूर विरले आणि शब्दातून एक अनुभव, एक सत्य बोलू लागले. नाटक जणु थांबले. चारुदत्त पडद्याआड गेला. मैत्रेयाने वेषांतर केले व रंगमंचावर उरले फक्त दीनानाथ आणि श्रीधर. समोर बसलेले प्रेक्षक श्रोते बनले. एक वेदना बोलू लागली. वेदना नेहमीच सुरेख बोलते. त्यात ती तर होती. दीनानाथांसारख्या नटश्रेष्ठाची वेदना—

"खरंच सांगतो मित्रानो, दारिद्र्य हा फार मोठा शाप आहे. दारिद्र्य आणि मरण यातून काही निवडायला सांगितलं तर मी मरण पत्करीन. खोटं सांगत नाही. गेल्या तीन चार वर्षात मी हजार वेळा मेलो असेन. जी माणसं खायला प्यायला माझ्याकडे हसत खेळत यायची तीच माणसं सुतकी वा संतापी चेहरे घेऊन येतात. काही शिव्या देतात. काही उपदेश करतात, कोरडा उपदेश— त्यातला एकजण विचारीत नाही की दीनानाथ, तुम्ही जेवलात का? तुमच्या घरात चूल पेटली का? मुलं जेवली का? मला, मुलाना हवं असतं अन्न आणि ही माणसं देऊन जातात शिव्या— कोरडा उपदेश! कुणी येतात आणि मागच्या वैभवाच्या गोष्टी काढतात आणि मग म्हणतात "तुम्ही असे वागला नसतात, आमचं ऐकलं असतंत तर असं घडलं नसतं." कुणी येतात, कायद्याचे दम देऊन जातात. ज्याना मी मित्र म्हणून जवळ केलं त्याना आता मी नकोसा झालोय्. कारण आता त्याना माझ्या सहवासात चैन करता येत नाही. निष्पर्ण झालेले हे झाड! आता छाया नाही देऊ शकत! मग माणसे जवळ तरी कशी येणार? खरं सांगतो मंडळी, सारी माणसे वैभवाची साथीदार! विपन्नातले सोबती असतात फक्त बायकामुले! त्यानासुद्धा गती नसते म्हणूनच ती सोबत करीत राहतात. नाहीतर तीही उडून गेली असती. दारिद्र्यात माणूस फक्त एकटा असतो. नाही! तो एकटा नसतो. त्याच्याबरोबर आणखी एक गोष्ट असते — त्याचं दुर्दैवी प्राक्तन!! सध्या हा दीनानाथ ह्या दुर्दैवी प्राक्तनाचे गाठोडे शिरावर घेऊन एकटा धावत पुढे जाण्याचा प्रयत्न करतो आहे. पाय लटलट कापतात, 'दारूमुळे' असं तुम्ही चटकन् म्हणाल. मी दारू पितो. पण हे पाय लटपटतात ते मात्र दारू-मुळे नाही! — मित्रानो, विश्वास ठेवा अगर ठेवू नका — पण ह्या दीना-नाथाच्या घरी गेल्या सहा दिवसात चूल पेटली नाही. पेटू शकली नाही. ते पाय लटपटतात ते पोटात अन्न नसल्यामुळे! अन्न ही माणसाची मूलभूत गरज आहे. ती गरज न भागवू शकणारे दारिद्र्य हा एक महान शाप आहे. दारिद्र्यामुळे माणूस, माणूस राहू शकत नाही. त्याचा पशू होतो. त्याला चिंता नावाचा रोग जडतो. तो त्याला हळहळू पोखरीत नेतो. दिसामासानी त्याचं आयुष्य झिरपत असतं— मृत्यूच्या भांड्यात! शरीराची एकेक समिधा अर्पण होत असते त्याच्या जिवंतपणीच्या चितेत आणि त्याच्या दारिद्र्याची जिती-जागती लक्तरे लोंबत असतात जगाच्या वेशीवर — त्याच्या दरिद्री बायका मुलांच्या रूपाने! त्याचा प्रवास चालू असतो— त्याचे सूर, त्याची सभ्यता, त्याचा स्नेह, त्याची कला, त्याची सेवा आणि त्याही पलिकडचा त्यातला माणूस ह्या साऱ्यांचे समाजाला विस्मरण होते आणि मग तो थुकतो त्या दरिद्री माणसाच्या अंगावर! म्हणतो, 'दरिद्री माणसाना ह्या जगात जगायचा अधिकार नाही. मरून जा'— मित्रानो, माई गेल्या सहा दिवसात जेवली नाही. मी जेवलो नाही. मुले चणे फुटाण्यावर राहताहेत. भूक भूक करताहेत. मघाच अरुणा म्हणत होती —"बाबा, मला भूक लागली हो!" भूक भूक करीत मरण्याचा शाप घेऊन आलेली आम्ही माणसं. दारिद्र्य येऊ नये— वैभव अनुभविल्यानंतर तर मुळीच येऊ नये. तेव्हा काय सांगत होतो— मंडळी, क्षमा करा. मी चुकलो. हे नाटक आहे. मी चारुदत्ताची भूमिका करीत आहे हे सारं मी विसरलो. काही-तरी बोलत बरळलो. दारिद्र्याने माणसाचं हे असं होतं. त्याचा विवेक सुटतो. कलेचं विस्मरण होतं. कर्तव्यात चूक होते.. दारि-द्र्याचीच एक धुंदी चढते—कलेची धुंदी चढायच्या वेळीच तीही चढते — हाऊ ट्रॅजिक!! मित्रहो, मला क्षमा करा. मी चुकलो" असं म्हणत दीनानाथांनी रंगमंचावर प्रेक्षकांना साष्टांग नमस्कार घातला.

इतका वेळ श्वास रोखून त्यांचे गद्य भाषण ऐकणारी सारी

माणसं शुद्धीवर आली आणि त्यानी टाळयांचा प्रचंड कडकडाट केला. . काहीनी आपल्या हातातले फुलांचे गजरे रंगमंचाच्या दिशेने फेकले. . स्त्रियानीही गजरे-वेण्या रंगमंचाकडे फेकल्या. काही वेळ टाळचा–फुलांचा नुसता पाऊस पडत होता. आणि मग दीनानाथानी आपला नेहमीचा टीपेचा आवाज लावला आणि ते पुढली साकी म्हणू लागले –

**भिक्षा मागुनि दारोदारी फेडिन ऋण गणिकेचे**
**परि कीर्तीला कलंक येई ऐसे भाषण वाचें ॥**
**नच हा उच्चारी । भलता आग्रह तू न करी ॥**

जणु काही विपरीत वा अकल्पित घडलंच नाही अशा थाटात दीनानाथ पुढचे सारे संवाद म्हणू लागले. त्यानी सांधा साधला होता– कुणालाही थक्क करील अशा सहजतेने साधला होता. . . माणसे पुन्हा मंत्रमुग्ध झाली होती. मघा पाहिले ते नाटक संपले आणि जणु नवेच नाटक सुरू होत आहे ह्याचा प्रत्यय लोक घेत होते–कानात, नेत्रात, मनात साठवून ठेवीत होते– त्यांच्या लाडक्या दीनानाथाचे शब्द – त्याचे सूर– आणि त्याची अपार वेदनाही! आनंद आणि दुःख, हर्ष आणि हळहळ यांचा एक नवीन, गमतीचा अनुभव ते घेत होते.



नाटक रंगत गेले. मधल्या त्या निवेदनानंतरही त्या नाटकाच्या रंगतीला कुठे बाधा पोहोचली नव्हती. निवेदन आणि नाटकाचा अपूर्व संगम दीनानाथांमधल्या श्रेष्ठ कलाकाराने साधला होता. गाणी रंगली. रंगणारच होती. अभिनय अभिनय वाटला नाही. इतका 'स्वाभाविक' चारुदत्त आपण आजवर पाहिला नाही ह्याची ग्वाही श्रीधर देत होते. सौदामिनी देत होती. प्रेक्षकही देत होते. नाटक संपलं चारुदत्त म्हणाला–– "**सकल दोष मजवरिचा आज लया गेला**" आणि ईशस्तवन संपले. पडदा पडायच्या आतच पुन्हा एकदा टाळयांचा पाऊस पडला आणि रंगमंचावरही पैशांचा पाऊस पडला. तो पाऊस पडत असताना दीनानाथ पहात होते– अगदी नकळतच त्यांच्या तोंडून गाणे बाहेर पडले–

**तेचि पुरुष दैवाचे ॥ धन्य धन्य जगि साचे**

ह्या दोनच ओळी आळवीत त्यानी पुन्हा एकदा रंगमंचावरच साष्टांग नमस्कार घातला. पुन्हा एकदा टाळयांचा पाऊस पडला. आणि प्रेक्षागार रिकामे होऊ लागले. सार्‍यांच्या तोंडी एकच शब्द होता–अपूर्व– असामान्य–अतर्क्य! !

नाटक संपले. अभिनय संपला. चारुदत्ताची कथा संपली आणि व्यथाही संपली. . . उरले दीनानाथ–त्यांचं भाग्य आणि त्यांचं दुर्दैवही! नंतर प्रेक्षकानी पाडलेला पैशांचा पाऊस ही त्या कथेची आणि व्यथेची विदागी होती. त्याचा हिशोब मंडळी करीत बसली होती. दीनानाथ मात्र एका असीम धुंदीतच होते. कपडे काढता काढता ते सारखे म्हणत होते, "मला मद्य द्या! मला हा सारा अनुभव बुडवून टाकायचा आहे. रंगमंचाचा मी अपमान केला."

"रंगमंचाचा अपमान?"

"होय! रंगमंचावर मी असायला हवा होतो फक्त एक कलाकार! चारुदत्त! ! आजवर ते व्रत मी श्रद्धेने पाळले. आज चारुदत्ता-ऐवजी दीनानाथ बोलला. व्रत संपले. मी रंगमंचाचा अपमान केला--नाही हे दुःख मला विसरता येणार नाही."

"तुमच्या आयुष्यातला हा अपार आनंदाचा क्षण आहे दीनानाथ. दैन्य संपलं. दुःख संपलं. आज लोकानी रंगमंच अक्षरशः डोक्यावर घेतला हे तुम्ही पाह्यलंच."

"आणि तरीही मला वेदना होताहेत. अपार आनंद आणि अपार दुःख मी एकाच वेळी अनुभवतो आहे. मला मद्य द्या! मद्य! !"

त्याना मद्य देण्यात आले. सारा संयम सोडून देऊन त्यानी भराभर मद्याचे चार पाच चषक घशाखाली घातले. आणि मग एकदम ताडकन् उठत म्हणाले, "चल माई, चल चारू, चला अरुणा-दीदी, चला घरी! आज मी राजा आहे आणि एक भणंगही! केवढं सुख असतं नाही असं असण्यात?"

कुणीच काही बोललं नाही! सारे जणु मूक झाले होते . . . सार्‍याना दीनानाथांचे दैन्य अंशतः तरी दूर करण्यात आपल्याला अपार यश मिळाले म्हणून आनंद झाला होता.

आणि–

असामान्य कलाविष्कार साधूनही दीनानाथांमधला कलाकार आतल्या आत आक्रोशत होता. ● ● ●








शकुंतलेच्या सख्यांची नावे अनसूया आणि प्रियंवदा अशी आहेत. शब्दांच्या अर्थामधले सर्व बारकावे पहाणाऱ्या कालिदासाच्या प्रौढ प्रतिभेने या दोन शब्दात 'सखी'चे सारे वर्णन सामावून टाकले आहे...






बाला तन्वी मृदुतनुरियं त्यज्यताम् अत्र शंका
दृष्टा काचित् भ्रमरभरतो मंजरी भज्यमाना
तस्मादेषा रहसि भवता निर्दयं पीडनीया
मन्दाक्रान्ता विसृजति रसं नेक्षुयष्टिः समग्रम् ॥

**सुभाषितावली (१४०१)**

"जावयीबापू, तुम्ही कवी आहात. कमलिनीच्या परागात हळुवार बसलेला भ्रमर तुम्ही कुठेतरी पाहिला असणार. ही तुमची कमला कोमलांगी आहे, बाला आहे, कृशांगिनी आहे, तन्वंगिनी आहे, अशा तुमच्या काही कल्पना असतील तर त्या सोडून द्या आणि हिला एकांतात निर्दयपणे कुस्करा. उसाची कांडी हळूहळू पिळली तर सारा रस सोडीत नाही हे ध्यानात ठेवा."

सौभाग्यरात्रीच्या प्रसंगी शयनमंदिराच्या दारावर नायिकेचे स्वागत करणाऱ्या पतीला उद्देशून सखीने वरील उद्गार काढलेले आहेत. असे उद्गार काढणारी सखी ही संस्कृत शृंगारसाहित्याच्या रसास्वादात भर टाकणारी एक विशेष व्यक्तिरेखा होय. अनेकदा तर संस्कृत शृंगार काव्याचा आस्वाद घेतल्यावर रसिकांच्या मनात प्रसंगी नायिकेचा ठसा उमटत नाही तर सखीचाच उमटतो.

वरील काव्य हे व्यंग्यार्थाने विनटलेले एक उत्कृष्ट काव्य आहे. या काव्याचा वाच्यार्थ नायकाने नायिकेशी धसमुसळेपणा करावा असा असला तरी ज्याची सुसंस्कृती आणि अभिरुची निरपवाद उच्च आहे असा हा विदग्ध नायक त्यातील गुप्त असा सूचित व्यंग्यार्थच समजून घेणार. भ्रमर आणि कलिका याच्या मधुस्रावी आलिंगनाचे स्मरण सखी त्यासाठी मुद्दाम नायकाला करून देत आहे. मालतीची कळी उमलवून तिचा आस्वाद घेताना चतुर मधुकर तिच्यावर आपला भार टाकत नाही. आपल्या पंखांच्या अधाराने तिचाच भार कौशल्याने तोलून धरतो व तिला हळूहळू उमलवितो. कोषविकास न झाला तर पराग रसपूर्ण झालेले नसतात; हे मधुकर जाणतो.

सखीची वरील उक्ती या सूचनेपेक्षा अधिकही कार्यभाग साधीत आहे. राक्षस विवाहात जिथे नायक आणि नायिका ही रतिक्रीडा करावयास शरीराने सराईत असतात अथवा गांधर्वविवाहात मनाने समुत्सुक असतात तेथे अशा सखीचे काही कार्य नसते. पण ब्राम्हण विवाहित जोडपे जेव्हा मधुचंद्राच्या रात्री शयनमंदिराच्या उंबरठ्यावर पाऊल टाकीत असते तेव्हा त्याची मनःस्थिती काय असते? हे युगुल जरी प्रौढ असले, प्रसंगी जरी तोंडओळख असणारे असले तरीही या उंबरठ्यावर पाऊल ठेवताच त्यांच्या वृत्ती संभ्रमित होऊन जातात. या रात्रीतून जे भविष्य प्रकटणार असते तेही अनिश्चित असते. नायक जंगली वृत्तीचा असेल तर त्याच्या पशुतेने नायिकेचे भावजीवन कायमचे जळून जाण्याचा संभव असतो. कलिकेच्या मकरंदाचा आस्वाद घेण्यासाठी भ्रमर लुब्ध आणि अधीर असतो हे खरे. पण ज्यांची बंधने परस्परापासून विलग झालेली नाहीत अशा कळीच्या पाकळ्यांची टोके त्याच्याकडून निर्दयपणे तोडली जाऊन कळीचे मुख दुखवले जाण्याचाही संभव असतो.

## आनंद साधले

या उलट नायक जर सुसंस्कृत असेल तर संकोचाची मर्यादा ओलांडून रतिजीवनास उत्सुक होण्याइतके नायिकेचे मन फुलेपर्यंत प्रसंगी काही दिवस अथवा आठवडेही निघून जातात. शरीराच्या पाकळ्या निर्दयपणा साहू शकत असल्या तरी मनाच्या पाकळ्या तो साहू शकत नाहीत. मन हे फुलावे आणि फुलवावेच लागते. रतिक्रीडेमध्ये लज्जास्पद, वावगे, गर्ह्य काही नाही अशा मानसिक भूमिकेवरून नायिकेचा सहकार मिळण्याचा संभव प्राप्त होईपर्यंत घाई करणे घातक असते. नायिका प्रौढ असली तरीही तिच्या रतिजीवनाच्या कल्पना या अनेकदा स्वप्नमय असतात. प्रत्यक्ष व्यवहार अनेकदा ही स्वप्ने विरवून टाकणारा ठरतो. आपला विवाह ज्याला कल्पवृक्षाप्रमाणे सुखद करावयचा असतो, चिरतर अमृतस्रावी करावयाचा असतो अशा नायकाला फार जपून

पावले टाकावयाची असतात. वरील सखी अशा सुसंस्कृत कांताला एकदम कितीतरी पावले पुढे घेऊन जाते आणि मदत करते. नसता हळवेपणा, नसता संकोच यांच्या अडचणीत तुम्हाला गोंधळावयास नको. हिला मी रतिशास्त्राचे नीट शिक्षण दिलेले आहे, ती ऋतुस्नात आहे आणि काममीलनाला समुत्सुक आहे अशीही सूचना नायकाला सखीच्या या उद्गारातून लाभत आहे. ही सखी नसती तर नायक आणि नायिका ही एकमेकांपासून मनाने कितीतरी दूर अशा अवस्थेत शयनमंदिराचे दरवाजे बंद करती. सखीने आपल्या विदग्ध चातुरीने हे अंतर एकदम कमी केले आहे. सखीच्या उद्गारातील साऱ्या अर्थ-छटा समजून घेण्याइतके संस्कृतितरल मन ज्या नायकाला लाभले असेल त्याच्या भावजीवनाच्या कक्षा अधिक विस्तृत होतील यात शंका नाही.

**भारतीय विदग्ध साहित्याचा हा ठेवा–**

सखीची अशी रम्य व्यक्तिरेखा ही भारतीय विदग्ध साहित्याचीच मिरास आहे. इतर वाङ्मयात अशा स्त्रिया दिसतात त्या सखीच्या व्यक्तिरेखेच्या अभिजात सौंदर्यापुढे पार फिटया पडतात. इंग्रजी साहित्यात, Chaperon, Governess यांच्या व्यक्तिरेखा सखीचे रम्य स्वरुप धारण करू शकत नाहीत. या वाङमयातील नायक नायिका साधारणशः प्रेमविवाहाच्या स्वरुपाचे कामजीवन जगतात. त्यातील नायिका या कामविषयाचे ज्ञान असणाऱ्या, त्या-विषयीच्या अपेक्षा उत्कट असणाऱ्या अशा असतात. चुंबना-सारख्या कामक्रीडांना विवाहाचे बंधन नसल्याने त्यांच्या वासना जागृत आणि उत्फुल्ल असतात. त्यामुळे त्यांच्या कामजीवनात सखीला स्थान नसते. कदाचित अशा स्त्रिया दिसल्या तर त्या दासी ( Maid ) अथवा दूती ( शिनळ Go–Between ) याच स्वरुपाच्या असतात. त्या सखीच्या पातळीपर्यंत पोचू शकत नाहीत.



आर्ष संस्कृत वाङमयात अगस्ती–लोपामुद्रा, पुरुरवा–उर्वशी, याज्ञवल्क्य–मैत्रेयी अशी युगुले आहेत. पण यांच्या नायिका या पाश्चात्य नायिकाना धडे शिकवितील अशा कामप्रौढा आहेत. त्याना आपल्या कामजीवनाची घडी बसविण्यासाठी सखीची जरूर नसते. उर्वशी पुरूरव्याची मागणी स्वीकारताना त्याला सांगते की तिला नग्नतेची घृणा आहे. पुरूरवा तिला नग्न दिसणार नाही तोवरच ती त्याच्याकडे राहील. कुशासनावर कामयाचना करणाऱ्या अगस्तीला लोपामुद्रा झटकून टाकते आणि कामभोग हवे असतील तर प्रथम कामपोषक अशी राजस वैभवे संपादन कर म्हणून त्याला सांगते. मैत्रेयी राजसभेतसुद्धा नग्न फिरत असते आणि नग्नता आणि पौरुष याची तात्विक चर्चा करीत असते. अशा युगुलाना सख्यांची जरूर पडली तरच नवल. कामजीवनाकडे निःसंकोच डोळसपणाने पहाण्याचे सामर्थ्य असल्यावर त्या युगुलात जरूर ती तडजोड आणि देवघेव घडवून कामजीवनातील अडचणीचा निस्तार व्हावयास अडचण यावयास नको. मूळ स्वरुपातील शंकुतलेलासुद्धा आपला विवाह ठरविताना सखीची जरुरी नसते. दुष्यंताला देहदान करण्यापूर्वी सारी देवघेव आणि व्यवहार ती काटेकोर मारवाड्याप्रमाणे ठरवून घेत असते. त्यामुळे प्रौढ विवाहातील कामजीवनें वर्णिणाऱ्या जुन्या आर्ष साहित्यात सखीचे सुरम्य दर्शन घडत नाही.

इसवी सनाच्या आगे मागे स्मृतिकाळात केव्हातरी बाल-विवाह रुढ झाले. आजच्या ज्ञात कामशास्त्राचे मूळही केव्हातरी याच सुमारास आकार धरते झाले. जी सखी आपण वर्णित आहो तिचा प्रवेश केव्हातरी याच सुमारास संस्कृत साहित्यात झाला. कमी अधिक रम्यतेत तिचे दर्शन तेव्हापासून आजवर घडत आहे असे म्हणावयास हरकत नाही. आपल्या महाराष्ट्रीय समाजात दोनचार पिढ्यांच्या पूर्वीपर्यंत याच सखीची परंपरा "पाठराखीण" या रूपाने अस्तित्वात होती. पुढे पुढे या प्रथेचे विडंबन पंचवीस वर्षाच्या वधूला चार वर्षाची पाठराखीण अशा अर्थशून्य अडाणीपणात झाले. ही पाठराखीण वधूचे कामजीवन सुकर करण्याऐवजी "रात्री मी तुझ्याच कुशीत झोपणार" असा हट्ट धरून त्यात अडथळे मात्र आणावयाची. आजच्या प्रौढविवाहाच्या काळातही पाठराखीणीच्या कर्तव्याचे सुस्पष्ट ज्ञान असेल तर पाठराखीणीच्या स्वरुपातील सखी वधूच्या भावजीवनात साह्यकारी होऊ शकेल असे मानावयास जागा आहे.

आजच्या प्रतिष्ठित साहित्यात आणि जीवनात कामजीवनाचे जे दर्शन घडते ते निरामय आहेच असें म्हणणे धाडसाचे होईल. या इथे विजयाताई एम्. ए., बी. टी. आहेत. त्यांचे यजमान पीएच्. डी. पण विजयाताई घटस्फोटितेचे जीवन जगत आहेत. हे नारायण-राव सत्प्रवृत्त सज्जन. त्यांचे कुटुंब विमलाताई या नक्षत्रासारख्या. पण नारायणरावांना वारयोपितांचे उंबरे चढण्याशिवाय मार्ग उरलेला नाही. गोपाळराव व कमाताई आणि सदाशिवराव व मंगलाताई ही आदर्श वाटणारी जोडपी. पण गोपाळरावांची आता मंगलाताईशी









व सदाशिवरावांची कमाताईशी सलगी वाढली आहे हे उघड गुपित आहे. अशा कितीतरी परी आहेत. वामनराव तर साधुपुरुष. पण त्याना रात्री बायकोवर हात टाकावाच लागतो. हे सारे प्रौढ आहेत. सुशिक्षित आहेत. यानी हॅवलॉक एलिस वाचला आहे. मेरी स्टॉप्स वाचली आहे. व्हॅन डी विल्ड वाचला आहे. हे सारे समजूतदार आहेत. सुबुद्ध आहेत; पण. . . .

पण काय तेच कळत नाहीसे झाले आहे. यांचीही स्वप्ने सुरम्यच होती. संसार न भंगता तर त्याना हवेच होते. त्यानी तसे प्रयत्नही थोडे थोडके केले नाहीत. लठ्ठ फी घेणाऱ्या आणि त्याहून लठ्ठ पदव्या धारण करणाऱ्या लिंगतज्ज्ञांचे खिसे त्यानी भरले आहेत. मानसशास्त्रज्ञासमोर मने उघडी केली आहेत. पण तुटलेला सूर त्याना सांपडलेला नाही. विरलेले स्वप्न पुन्हा जुळलेले नाही. त्यांचा नाइलाज झालेला आहे. यानी आपली गृहछिद्रे चवाठ्यावर मांडण्याचे धाडस केले. अशी असंख्य युगुले आहेत की त्याना हे धाडस नाही. त्यांची भीड मोडत नाही. ती तशीच धुमसत असतात.

भावजीवनात जी विसंगती येते तिची प्रदर्शनीय कारणे काहीही असली तरी त्यांचे मूळ कारण शयनमंचकावर असते. हे कारण मोठे नाजुक असते. एक अधिक तिढा पडला, जरा अधिक पीळ पडला की उशीर झालेला असतो. काटा हा लागताच उपटून काढला नाही तर त्याचा नायटा होतो. दैवदुर्विलास असा की याची जाणीव नेहमी उशिरा होते. खोटी प्रतिष्ठा, लाज, भीड यानी पडलेला पीळ, लागलेला काटा तसाच राहू दिला जातो. कामजीवनात अडचण आली, विसंवाद आला तर त्याचे गांभीर्य जाणले जात नाही. त्याकडे दुर्लक्ष होते. कदाचित 'मीच शहाणी आहे' अशा विश्वासाने ती अडचण हाताळली जाते आणि मार्ग चुकीचे असतात. भाडोत्री मानसशास्त्रज्ञ आणि लिंगशास्त्रज्ञ इथे उणे पडतात. त्याना आस्था असते ती आपल्या फीची. जिव्हाळा असतो तो स्वार्थाचा. अशा जोडप्यातील नायिकाना, समजूतदार आई, अनुभवी मैत्रिण, रसिक पाठराखीण, ममताळू सासू अशा कुठल्या तरी स्वरुपात जर सखीची प्राप्ती झाली असती तर. . .

तर त्यातील निदान एकीचे तरी भावजीवन खासच यशस्वी झाले असते. आणि हाही लाभ काही कमी नव्हता. पण आजचे जावईबापू आणि सूनबाई याना अशा सखीची अडचण वाटत आहे. त्यांच्या तुलनेने संस्कृत विदग्ध साहित्याच्या नायिका या अधिक भाग्यशालिनी होत. कारण त्याना त्यांचे भावजीवन घडविण्यासाठी डोळस, कामचतुर, कलागुणी आणि निःस्वार्थ जिव्हाळ्याने ओथंबलेल्या अशा सखीचा सहकार लाभलेला आहे.

## सखीचा निःस्वार्थ जिव्हाळा

सखीच्या व्यक्तिरेखेला रम्यता येते ती या निःस्वार्थ अशा जिव्हाळ्यामुळेच येते. यामुळेच तिच्या व्यक्तित्वाला दासी आणि दूती यापेक्षा अधिक गौरव येतो. श्रीकृष्णाने नाथांघरी पाणी वाहिले तरी तो नाथांचा पाणक्या नसतो. तो अर्जुनाचे घोडे धुतो. जनाबाईची लुगडी धुतो पण तो काही धुणेरा नसतो. सखीही प्रसंगी दासीची आणि दूतीची कामे करीत असली तरी ती दासी आणि दूती नसते. दासी ही पतिघरात मोलाने काम करणारी कोणतीही सांगकामी भाडोत्री स्त्री असते. तिचे जीवन सख्रीप्रमाणे वधूशी जिव्हाळ्याने जुळलेले नसते. ती कमीअधिक विश्वासाचे पात्र असेलही. पण असेलच असे नाही. कामजीवनाशी तिचा संबंध नसलेली अशीही दासी असू शकते.

दूती ही दासीहून हलकी आणि मोलाची असली तरी वधूच्या भावजीवनात तिची पायरी दासीच्या वरची असते. कारण तिचे वैशिष्ट्य असे की तिचा संबंध वधूच्या कामजीवनाशीच असतो. हे कामजीवन बव्हंशी व्यभिचारी असते. दूती या पैशासाठी वाटेल ते करणाऱ्या हलक्या चारित्र्याच्या स्त्रिया असतात. नायक आणि नायिका या उभयाघरी फुले पुरविणारी माळीण, मासे पुरविणारी कोळीण, कपडे धुणारी धोबीण अशाप्रकारे दोन्ही घरात मोकळा प्रवेश असणाऱ्या स्त्रिया दूतीकर्म करतात. या संवादकुशल असतात. स्वतः पकडले न जाता दुसऱ्याचे भाव पकडण्यात त्या वाकबगार असतात. "सार्वजनिक उद्यानातील मालतीकुंज फुलानी बहरला आहे" असे त्या म्हणणार. त्यावरुन नायकाने जाणावयाचे की कामवासनेने बहरलेली मालती त्याची सार्वजनिक बागेत वाट पहात आहे. असे निरोप कौशल्याने नेऊन आणून त्या नदीकाठी, कुंजात, भरल्या ऊसमळ्यात, कुठे तो, संकेत ठरवितात. यापेक्षा अधिक सुखदुःख त्याना नसते. कामीजनानी मग आपले कामजीवन खडकावर, वाळूत, गवतावर, जमेल तसे भोगावे. त्यासाठी पुष्पाची शेज रचण्याची, अत्तराचे दिवे लावण्याची उठाठेव दूतीला नसते. ते कामजीवन सुखान्त होवो वा त्याचा विरस होवो. दूतीने आपली बिदागी आधीच वसूल केलेली असते.

सखी ही कधी नायिकेच्या भाग्यावर डल्ला मारताना दिसणार नाही. ती नायिकेच्या भावजीवनाचे कमल फुलवील

---

देशात गांधी जन्मशताब्दी साजरी होत आहे.



**एकला चलो रे (मात्र) चालू आहे**






पण त्याचा सुगंध लुटणार नाही. ती तळे राखील पण पाणी चाखणार नाही. या निःस्वार्थ जिव्हाळ्यातच तिच्या व्यक्तित्वाचे सूत्र गुंतलेले आहे.

## सखी कामपंडिता असते

सखी ही नायिकेच्या भावजीवनाचा अतूट भाग असतो. Chaporon, Governess, शिक्षिका, आई, मैत्रिण, दासी, दूती या आणि इतरही अनेक अशाच भूमिका सखीमध्ये समाविष्ट असतात. ती नायिकेशी एकजीव झालेली असते. सखी म्हणून तिचे दर्शन घडते त्यात तिच्या स्वतःच्या कामजीवनाचा पत्ता नसतो हे खरे. पण ती समृद्ध कामजीवनाचा अनुभव घेतलेली कामपंडिता असते. अन्यथा ती सखी बनूच शकणार नाही. तिच्या नीतीकल्पना ठिसूळ असतात. लौकिक नीतीच्या बंधनात त्या बसू शकणार नाहीत हे खरे. पण नायिकेच्या कामजीवनातील सुख अभंग राखणे हा आपला धर्म आहे अशी तिची अटळ श्रद्धा असते. तिचा स्वतःचा स्वार्थ त्या सुखात गुंतलेला नसतो. त्यामुळे ते तिच्या हातात सुरक्षित असते. वधूला माहेराहून जे आंदण मिळते त्याचाच सखी हा भाग असतो. सखी वधूमातेकडून येते. तिची माया आणि तिच्या काळजाचा तुकडा घेऊन येते; आणि नायिकेच्या सुखावर या मायेचे छत्र अखंड धरते.

पूर्वी जेव्हा वधू सासरी जात असे तेव्हा तिच्यावरोबर वधुपिता समवयस्क सुंदर दासींचा तांडा देत असे. या दासी वधूच्या जीवनाचा एक भाग म्हणून जात. वधूच्या ऋतुकालात, गरोदरपणात, आजारात, अनिच्छेच्या कालात अथवा वराची वासना एकवधूशमनीया नसेल तर, त्या वधूची जागा शयनात घेऊन वराची कामतृप्ती करीत. वधूचा राज्ञीपणा कायम असे पण या दासी कामापुरत्या तिची जागा घेत. त्यांच्याकडून आपल्या पतीची कामतृप्ती घडविण्याचा अधिकार वधूला असला तरी पतीच्या कामजीवनावर त्यांचा अधिकार नसे. कधी क्वचित त्यांचे जीवन पुरुषस्पर्श न होताही संपे. कधी त्या राजपरिवारात आपली सोय लावून घेत. अशातील एखादी वधूच्या जीवाभावाची मैत्रिण बनून जात असे. वधूचे जीवन ते आपले जीवन, वधूची मुले ती आपली मुले अशी तिची धारणा बनून जात असे. वधूची मुले तिच्या अंगाखांद्यावर वाढत. ती अपत्यवती असेल तर तिचेच दूध पीत. कदाचित असे दूध पाजण्यासाठी म्हणून बाहेरची ओली दाई येत असे. आणि ती त्या अपत्याच्या जीवनाशी रमून जात असे. त्याची माताच बनत असे.

वधूच्या विवाहाच्या वेळी सामान्य दासी म्हणून आलेली अशी एखादी दासी अथवा दाई त्या वधूची मुलगी लग्नाची होईतो घरात एकरूप होऊन प्रतिष्ठा पावलेली असे. मुलीचा तिला लळा असे. आणि जेव्हा त्या मुलीचे लग्न होत असे तेव्हा इतर दासी आणि आंदण यावरोवर सखी म्हणून जाण्याचा मान तिला मिळे. इतर क्षुद्र दासीवर नियंत्रण या सखीचे असे. त्या वधूच्या कामजीवनात अडथळा येईल असे वागणार नाहीत हे ती पाही. वधूच्या शयनात वदली कोणी जावयाचे हे ती ठरवी. वधूच्या जीवनाची घडी ती नीट बसवून देत असे.

ही सखी नायिकेच्या आईच्या वयाची असली तरी ती वृद्धा असे, असे नव्हे. नायिका या वरगृहीच ऋतुमती होणाऱ्या म्हणजे दहा अकरा वयाच्या असत. तर सखी पंचवीस तीस वयाची असे. वरराज पंधरा सोळा वयाचे असावयाचे. वधूचे कामशिक्षण तर सखीच्याचकडून होत असे; पण कुशल सखी वधूच्या हातून अप्रत्यक्षपणे वराचे कामशिक्षण घडण्यातही कमीअधिक हातभार लावीत असावी असे मानण्यास जागा आहे.

सखी ही सामान्य स्त्री नसते. लोक व्यवहाराची तर तिला उत्तम जाणीव असतेच. पण कामजीवनाशी संबंधित अशा साऱ्या विदग्ध विद्या आणि कला तिला परिचित असतात. त्यांच्या संस्काराने आणि सहाय्याने ती नायिकेचे कामजीवन यशाच्या मार्गाने नेत असते. वधू पुत्रवती होईपर्यंत मातापित्यांनी तिच्या घरी जावयाचे नसते. पण त्यांची आठवण वधूला न व्हावी याची काळजी सखी घेत असते. माताही प्रसंगी करू शकणार नाही अशा गोष्टी सखी करू शकते.

कामजीवनाची यशस्वी घडी बसविणे ही गोष्ट सोपी नाही. डोळे साऱ्याच स्त्रियांना असतात पण साऱ्याच स्त्रियांना पहाता येते असे नाही. नजरेचा जीवघेणेपणा हा संस्कारानीच कमवावा लागतो. साऱ्याच कामजीवनाचे असे आहे. कामप्रेरणा मूलभूत असली तरी तिचा विदग्ध रम्य आविष्कार हा संस्कारानीच घडतो. हे संस्कार प्रत्यक्ष प्रयोगाने दरदिवशी कामजीवन जगताना घडत असतात. त्यातून वधूला पार पाडणे हे वधूमातेला अशक्य असते. कारण ती स्वतःच्या कामजीवनात गुंतलेली असते. मातृतुल्य अशी सखीच हे काम करू शकते. पुरुष गणिकांच्या नादी का चढतात त्याचे विवेचन करताना वात्स्यायनाने एक कारण दिले आहे की अशा पुरुषांच्या घरच्या कामजीवनात वैदग्ध्य नसते. स्वतःमध्ये रस उत्पन्न करण्याची कला कामिनीमध्ये हवी. रतीच्या आसनावर तिची भूमिका सेवेची, दानाची असेल तर हा रस उत्पन्न होईलच असे नाही. ही भूमिका सहकाराची हवी. शयनावरील भोग हा सम हवा तरच तो समभोग होणार. समान अधिकार आणि सुखावर समान हक्क असलेले भागीदार आपण आहो अशी जाणीव वधूला नसेल तर तो भोग संभोग न बनता भोगदान बनते. अशा भोगदानातून स्थिर

कामजीवन निर्माण होणार नाही. यातील भेदाची सूक्ष्म जाणीव जागरूक शिक्षणाखाली घडावी लागते आणि हे दैनंदिन शिक्षणाचे काम सखीच करू शकते. अर्थात् ती मातृनिर्विशेष सखी हवी. जुन्या शास्त्रातसुद्धा हे काम पुरुष सहवास घडलेली दाईची मुलगी, अशीच एखादी निःस्वार्थ मैत्रिण, मावशी, विश्वासपात्र अशी वृद्ध दासी यानी करावे असा निर्वाळा दिला आहे. तिलाच आपण सखी असे म्हणत आहोत.

सखीला अमर्याद अधिकार तिच्या निरपेक्ष जिव्हाळ्यामुळे प्राप्त होतात. तसेच तिच्याशी वधुवरे अमर्याद मोकळेपणाने वागतात. कितीतरी कामलीला सखीच्या समोर चालतात. वधूच्या कंचुकीच्या गाठीस स्पर्श होईपर्यंत तरी सखी तिथे असतेच. तिला डोळे असून दिसत नाही; कान असून ऐकू येत नाही. शयनमंदिराचे दार वधूला आतून लावून घ्यावे लागत नाही. सखी ते बाहेरुन ओढून घेते तेवढे पुरते. आत काही अडचण येईल तरी सखी बाहेर जागरूक असते. नुपुरांचा आवाज येत आहे की मेखलेचा आवाज येत आहे हे ऐकून कामविधीमध्ये नायक क्रियाशील आहे की नायिका हे ती ओळखू शकते. काही टीकाकारानी असे सुचविण्याचा प्रयत्न केला आहे की सखी ही गवाक्षातून वधुवरांच्या कामलीला पहात असते. पण सखीवर असा अनौचित्याचा आरोप करण्यास बिलकुल जागा नाही.

नायक निघून गेल्यावर वधू आनंदाने बेहोप झाली असेल तर विवस्त्र देहावर पांघरुण सखीच घालते. तिच्या अंगावरील नख-व्रणांना लेप तीच लावते. तिचे अंगमर्दन, मालीश, वेणीफणी तीच करते.

## वराचीही साहाय्यकर्ती

सखीचा अधिकार वराला मान्य होण्यास आणि तिच्यावर त्याचा विश्वास बसण्यास मुळीच अडचण पडत नाही. वधू जशी त्याच्या जीवनाचा भाग बनते तशीच वधूच्या जीवनाचा भाग असलेली सखीही त्याच्याशी जवळिकीने बांधली जाते. त्याचा विश्वास संपादन करावयास सखीला उशीर लागत नाही. कामाचार हे कधी वेडेचार असतात. या वेडाच्या भरात नायक कधी नायिकेच्या गालाचा चावा घेतो तर कधी आणखीच कुठला तरी चावा घेतो.पण त्याला खात्री असते की गालावरील चाव्याच्या खुणा जरी सवतीपुढे नखऱ्याने मिरविल्या गेल्या तरी भलतीकडच्या खुणा अशा मिरविल्या जाऊन त्याची लाज उघडयावर पडणार नाही, हे सखी पहात असते. असा विश्वास जडतो तेव्हा तो निःसंकोचपणे आपले मन तिच्याकडे प्रकट करू लागतो. तिच्याशी नर्म विनोद करू लागतो. वधू खरोखर वा नखऱ्याने रुसली असेल तर तो रुसवा उतरण्या-साठी त्याला सखीचा उपयोग होतो. ज्या गोष्टी तो इतर कुणाशीच बोलू शकत नाही त्या तो सखीशी बोलू शकतो.

शकुंतलेचे शाकुंतल नाटक झाले तेव्हा कालिदासाने तिला सख्या दिल्या. त्यांची नावे त्याने अनसूया आणि प्रियंवदा अशी ठेवली आहेत. सारे बारकावे पहाणाऱ्या कालिदासाच्या प्रौढ प्रतिभेने या दोन शब्दात सखीचे सारे वर्णन सामावले आहे. सखी ही निर्मत्सर असते आणि संभाषणकोविद असते. या दोन गुणांच्या आधारानेच ती वधूची जीवननौका कामसागरात हाकारीत असते. अनसूया आणि प्रियंवदा या आपल्या चतुर संवादानी शाकुंतलाच्या पहिल्या अंकात जे प्रणयमधुर शृंगारमंदिर वातावरण निर्मितात त्याची पार्श्वभूमी शकुंतलेच्या भावजीवनाला अत्यंत पूरक ठरते. शाकुंतलाच्या अक्षरा अक्षरातून सौंदर्याचे घड लगडले आहेत. तसेच ते अनसूया आणि प्रियंवदा या नावातही आहेत. पुढील विदग्ध वाङ्मयात जी सखी आकारीत होते ती सर्वसाधारणपणे अनामिका असली तरी ती अनसूया आणि प्रियंवदा असतेच असते. मदनिका, रदनिका असली नावे असलेल्या सख्यांच्या तुलनेने अनसूया आणि प्रियंवदा ही नावे जो भाव प्रकट करतात त्यातच कालिदासाच्या प्रतिभेने सखीचे यथार्थ चित्र रंगविलेले आहे.

कैकेयीची सखी मंथरा हिचाही आपणास इथे उल्लेख करावयास हवा. दशरथाला तीनशेपन्नास बायका होत्या. साधारणशः पंधरा दिवसानी त्याला नवी बायको आणावी लागत असावी. पण कैकेयी आल्यावर त्याची ही प्रणयभ्रमंती संपली. आणि तो कैकेयीतच रंगला. इतका की कौसल्यादी स्त्रियांची अवस्था पोतेऱ्या-सारखी झाली. रामाच्या अभिषेकप्रसंगी आपणास मंथरेचे जे दर्शन होते ते कैकयीच्या हितासाठी धडपडताना होते. त्यातून शोकांतिका निघते त्याचे कारण दशरथाच्या पुत्रांची लोकविलक्षण उदात्तता. हे महापुरुष अपवादात्मक देवत्वाने मंडित असल्याने मंथरेचा व्यवहारी सूर एकदम विसंवाद उत्पन्न करतो; पण आपणास त्याचा विचार करावयाचा नाही. कैकेयीची सखी म्हणून तिचे जे दर्शन होते तेवढ्याचाच विचार करावयाचा आहे.

सखीची दासी ही भूमिका स्पष्ट करण्याची जरूर नाही. कधीकधी सखी दूतीच्या भूमिकेतही दिसते. नायिकेचे काममुख हेच सखीच्या आचारसंहितेचा केंद्रबिंदु असते. सखीच्या प्रामाणिक प्रयत्नानीही ते सुख साध्य होऊ नये असे अनेकदा घडते. कधी नायक पौरुषाने उणा असतो. कधी त्याची भ्रमरवृत्ती अमर्याद असते. कधी तो परागंदा होतो; मृत होतो. कधी तो नायिकेला विलाससामुग्री पुरविण्यास अपुरा पडतो तर कधी नायिकेचीच वासना दुर्दम्य बनून तिचे मन दुसऱ्यावर जाते व वासनोद्रेकाने तिला वेड व उन्माद होण्याचा संभव प्राप्त होतो. अशा प्रसंगी सखी दूती बनून व्यभिचाराचे संकेत घडवून आणते. अर्थात भाडोत्री दूती-पेक्षा ती अधिक समयज्ञपणे वागते. ती संकेत ठरवील तेथे किसलयांची शय्या योजण्याकडे लक्ष देईल आणि हा संकेत पार पडतो याचेही जागरूक पहारा ठेवून नियंत्रण करील.

कुंती विवाहापूर्वी कामभोग घेती झाली, गर्भवती झाली आणि माताही झाली; परंतु त्याचा यत्किंचितही बोभाटा झाला नाही. याचे कारण तिच्या धात्रीची अथवा सखीची समयज्ञता होय. सखी कितपत समर्थ आणि विश्वासपात्र असू शकते आणि नायिकेच्या कामजीवनात किती भाग घेऊ शकते याची जणू ही मर्यादाच आहे. अशी सखी जर विवाहाच्या उंबरठ्यावर प्रत्येक वधूला लाभली तर मधुचंद्राच्या अधिक रात्री मधुस्रावी होतील आणि चंद्र अधिक जवळ येईल असे मानावयास जागा आहे. • • •

अनुक्रमणिका

अंगरखा काढायला सांगावं तशा थाटात श्रीमंतांच्या कुटुंबानं मला त्यांचा विमा काढण्याचा हुकूम केला....



# श्रीमंतांची मेंडकळ

वा. रा. सोनार

नुकतेच जेवण झालेले असल्यामुळे बाहेरच्या सोप्यात पान चघळीत चघळीतच वसल्या जागी श्रीमंत सांगोवांगीकराना झोप आली. लोडाला टेकून ते गणपतीच्या मूर्तीसारखे एका पायाखाली धोतर नीट सावरीत रुबाबात वसलेले होते. वघता वघता ते घोरू लागले. घोरताना त्यांच्या पांढुरक्या मिशा, फुटलेल्या कारंजातून पाणी उडावे तशा, तालावर कमी अधिक होत होत्या. मधूनच वर गेलेल्या आवाजाने त्यांची झोप चाळवल्यासारखी होत होती, अशा वेळी ते पान चघळीत पुन्हा झोपी जात होते.

सांगोवांगी संस्थान विलीन झाल्यापासून श्रीमंताना कुठलेच महत्त्वाचे काम उरले नव्हते. त्यामुळे त्याना वेळेचा फार प्रश्न पडत असे. वेळ कसा काढावा यावर तासन्तास विचार करून ते वेळ काढीत. शेवटी 'वेळ आपला जाईल त्याचा तोच!' असा सूज्ञ विचार करून त्यानी काळजी करायचे सोडून दिले होते. सुदैवाने त्याना पार्लमेंटात घेतल्यापासून पूर्वीसारखी वेळेबद्दल फारशी तक्रार करण्याचे कारण उरले नव्हते. पण त्यांचे संस्थानी मन त्यात रमत नव्हते. ज्या हातानी वंदुकीचे दस्ते बाघा–विबळ्यावर घालायचे ते हात न दिसणारे मत कुणाला तरी घालण्यासाठी फक्त वर करायचे श्रीमंतांच्या वुद्धीला पटत नव्हते. न पटणारी गोष्ट दृष्टीआड वरी म्हणून पार्लमेंटात चक्क डोळे मिटून ते आपला हात सदा वर ठेवीत.

केव्हातरी टाळ्यांच्या कडकडाटाने त्याना जाग आलीच तर त्यांचे शिकारी मन आधी जागे होत असे आणि 'धावा ऽ धावा ऽ !.. हाणा...!" अशा पूर्व आयुष्यातल्या शिकारी आरोळ्या ठोकून उभ्या पार्लमेंटाचं लक्ष आपल्याकडे वेधून घेतल्यावरच संपूर्ण जागे होत.

श्रीमंताना शिकारीचा अतोनात षौक. सांगोवांगी विलीन झाल्यापासून श्रीमंताना या नादाला मुरड घालावी लागली. तरी ते नेहमी एका खांद्यावर वंदूक लटकावूनच वाहेर फिरायला पडत. रात्रंदिवस डोक्यात शिकारीचा विचार आणि कुठलाही विचार शिकारीतून असे श्रीमंतांचे झाले होते. त्याना साधे बोलणे ठाऊक नव्हतेच मुळी. वाड्यात पंक्ती किती उठल्या हे साधं विचारायचं ते सुद्धा श्रीमंत, 'काय सचिव, किती मुंडकी उडाली?.. ..अजून किती राहिलीत' याच भाषेत. रात्री वाड्यावर तमाशा झाल्यावर सकाळी





अनुक्रमणिका

श्रीमंत खुषीत म्हणणार 'काय पाणीदार काम होतं सचिव रात्रीचं! . . अहो वीज खेळत होती अंगातनं. सावज चांगलं हेरता तुम्ही!' साधं मुलाना उठवायची आज्ञा यायची ती अशी, 'अरे छाव्याना काढा बाहेर गुहेच्या!' साध्या साध्या प्रसंगात तर श्रीमंत कितीदा 'शूट' करायचे.

श्रीमंत सांगोवांगीकरांच्या वाड्यावर गेली तीन तपे माझी पिढी – म्हणजे खुद्द मी–पाणी भरीत आहे. हो! अलीकडे श्रीमंत पार्लमेंटात गेल्यापासून मला वाड्यावर पाणी भरायचंच काम मिळालं आहे. मधूनमधून पगाराच्या वेळी ते 'सचिव' वगैरे म्हणत असतात. अर्थात् पगाराच्या वेळी पगार होत नसल्याने! पण आता या वयात हा वाडा सोडून जायचं जीवावर येतं. जाऊन करणार तरी काय? त्यापेक्षा श्रीमंतांचा तनखा कधीतरी सुरू होईल या आशेवर पाणी भरीत आहे, आणि फावल्या वेळात अनेक धंदे करतो आहे.

श्रीमंतानी चुकून डोळे उघडले तर आपणच त्यांच्या दृष्टीपथात येऊ शकू अशा बेताने मी उभा होतो. श्रीमंतानी आजची वेळ दिली होती. गेले अनेक दिवस त्यानी मला शिताफीनं चकवीत आणलं होतं. पण आज मात्र नुसते जागे नसले तरी शब्दाला ते जागणार होते म्हणून मी बराच वेळ उभा होतो. हो! सावज तसे मोठेच होते.

पगार बंद झाल्यापासून श्रीमंतानीच मला एकदा पार्लमेंटातून आल्या आल्या सल्ला दिला होता, 'सचिव, तुम्ही विमे कां नाही काढीत लोकांचे. आता आमचीच कंपनी– म्हणजे सरकारची– आहे म्हणे.–"

आणि श्रीमंतांची आज्ञा मी त्वरित अंमलात याणली होती. वाड्यावरच्या सगळ्यांचे विमे मी त्याना श्रीमंतांपुढे आणून काढले होते.

एका आठवड्यात मी मोहीम उघडून सगळ्यांचे विमे काढून घेतले होते. हे 'काढून घेण्याचे' प्रकरण वाड्यातल्या बायकांपर्यंतही पोचले होते. खुद्द श्रीमंतांच्या कुटुंबानी श्रीमंतांजवळ हट्ट धरला. त्यावर पिरपिरीने कंटाळून श्रीमंतानी मला हाक घातली होती.

"सचिव, हे काय लचांड आहे. शूट करायला पायजेल तुम्हाला. जा, कुटुंबाचा फोटो काढा."

"श्रीमंत, सगळी भिंत फोटोनी भरलीय्. आत्ता आणखी आमच्या कुटुंबाचा फोटो–"

"मूर्ख आहात. आम्ही आमच्या कुटुंबाचा म्हणतो."

"कां बुवा? . . तो सुद्धा आहे श्रीमंत–"

"अहो सचिव, तुम्ही हे वाड्यावर नवं प्रकरण आणलंय् ना. विमे काढायचं. बायकाना काय, फोटो काढला काय, विमा काढला काय सारखाच–"

"म्हणजे – श्रीमंत खुद्द बाईसाहेब मागे लागल्या आपल्या?–"

"हो! . .रान उठवलंय् आमच्याभोवती."

"श्रीमंत, काळजी करू नका–"

आणि मी वाड्यावरून घरी परतताना नवा शोध घेऊन आलो. श्रीमंतांचा विमा काढायचा असला तर बाईसाहेबाना श्रीमंतांवर सोडायचे! श्रीमंतानीच वाट दाखविली होती.

श्रीमंतांचे आयुष्य 'असे' जात असले तरी 'तसे' किती महत्त्वाचे आहे, मी बाईंना पटवून दिले आणि आठा दिवसातच श्रीमंत कंटाळून विम्यासाठी तयार होतील अशी व्यवस्था केली.

आज सकाळपासून बाईनी फारच लावून धरल्यामुळे श्रीमंत पिसाळले होते. एकदाचा विमा काढून घ्यावा या सूज्ञ विचाराप्रत त्याना आणण्यात मी यश मिळवलं होतं. त्यामुळेच आजचा बार वाया जाणे शक्य नव्हता. अशी मी व्यवस्था केली होती. खुद्द श्रीमंतांचे कुटुंब उंबऱ्यात टेहेळणी करीत उभे होते, तर मी इकडे सापळा लावून बसल्यासारखा पिशवीशी खेळत उभा होतो. श्रीमंतांची शिकार व्हायची वेळ नजिक आली होती. त्यानी फक्त थोडे जागे होणे आवश्यक होते; ते तसे त्यांच्याच एका घोर तानेने जागे झालेही.

माझ्याकडे किलकिल्या डोळ्यानी श्रीमंतानी पाहिलं आणि त्याना भयंकर संताप आला. संतापाने अंगाची लाही लाही झाली तरी मी जागेवर घट्ट उभा होतो. बेरक्या गिऱ्हाईकासारखी मान हलवीत श्रीमंत पुटपुटले,

"सचिव, अहो कां खाताय् तुम्ही आमचा जीव! . .विमा ना, करू की! . . काय घाई आहे ?— बघू. . . ."

आणि शेवटच्या 'बघू' वर ते कान कोरण्यासाठी वळले तो उंबऱ्यातल्या कुटुंबावर दृष्टी जाताच ते खाडकन् जागे झाले. कानातले बोट तसेच कानात राहिले. आश्चर्याने तोंडात रहावे तसे! एकदा माझ्याकडे, एकदा मागे पहात श्रीमंत जाळ्यात सापडलेल्या वाघासारखे गुरगुरले. मिशांचं कारंजं रागाने दोन तीनदा खालीवर केलं.

मग शेपटी आपटत म्हणावे तसे ओरडले,

"अरे काय ठरवलंय काय तुम्ही आज आमचं? अं? . . . चांगलं मचाण बांधलं तुम्ही आमच्यावर. आमचा डोळा चुकवून असा नेम? . . "

यावर उंबरा बोलला,

"ते काही नाही. मेलं इतका शिकारीचा षौक आहे. जिवाचं काही बरं वाईट झालं म्हणजे?"

"होय ना बाईसाहेब–" मी आपलं उगाच.

"अहो कुठली शिकार? काडतुसाना पैसे नाहीत. उगाच काय? . . ." श्रीमंतानी शेपटी आदळली.

"बघा बाईसाहेब. फार वाईट. काडतुसांशिवाय शिकार म्हणजे प्रत्यक्ष मृत्यूला निमंत्रण बाहेसाहेब!" सावजाला सापळ्याकडे ढकलीत म्हणालो.

"बाई बाई! . . . यांचं नका हो ऐकू तुम्ही सचिव. आत्ताच घ्या काढून तुम्ही विमा–"

"आत्ता?–" धोतर सावरीत श्रीमंत कडाडले.

"त्यात काय?" जेवण झाल्यावर चालतो काढलेला–" मी त्यांच्या शंकेवर. . . .







"सचिव! जेवणाचं नाही हो म्हणत. कमाल आहे–"

"ते काही नाही. सचिव, बघता काय, काढा म्हणते ना–"

अंगरखा काढायला सांगावे तशा थाटात श्रीमंतांच्या कुटुंबाने मला श्रीमंत सांगोवांगीकरांचा विमा काढायचा हुकूम दिला. यावर मी थोडीही उसंत घेऊ न देता श्रीमंतांना कोंडीत धरले. त्याना नीट बसते केले आणि पटापट कागदपत्र पूर्ण करून त्यांच्या सह्या घेतल्या.

तर्पण करताना कंटाळा आल्यावर शेवटी रागाने भटजीवर उखडावे तसे श्रीमंत माझ्यावर उसळले,

"काय, झालं एकदाचं मनासारखं–"

"हो, पण बाईसाहेबांच्या! श्रीमंत, समजा उद्या तुम्ही शिकारीत–" मी इथंच थांबलो.

"बोला बोला सचिव. बोला. शिकारीत काय–"

"म्हणजे असं की...श्रीमंत, शिकारीत कुणाची शिकार होईल हे काय सांगावं सरकार, तेव्हा–"

"आत्ता खुश्शा ऽऽल जा म्हणावे– शिकारीला–" असं निश्वास टाकीत श्रीमंतांचे कुटुंब वाड्यात परतले. हातातले कागद माझ्याकडे फेकीत श्रीमंत पुन्हा खेकसले, "आता काय राहिलंय्–मरायला हरकत नाही ना?"

"हं! अजून नाही हो मरता यायचं! . ." म्हणजे, नियमानं म्हणतो मी–"

"बोला, नियमानं बोला."

"तुमची मेडीकल राहीलीय् अजून."

"मेडीकल ? "

"मेडीकल! . . डॉक्टरी तपासणी हो.- विशेष नाही. पण हवी. नियमानं–"

यावर श्रीमंत भयंकर भडकले. लोडाशी टेकलेली बंदूक कुरवाळीत म्हणाले, "सचिव आम्ही फार सहन केलं! आत्ता नाही. अहो, आमची तपासणी मागता? . . खुद्द आमची? . . ."

"सरकार––"

माझं ऐकण्याच्या स्थितीत ते नव्हतेच मुळी.

"सचिव, या वाड्यात डॉक्टर कधी शिरला आहे? बोला. आम्हाला काय धाड भरली आहे. अहो, नुसत्या पंजानं जबडा फाडून दाखवू आम्ही–" त्यानी उगारलेल्या पंजाला मी बाजूला करीत कातर आवाजात म्हणालो,

"हो हो ! म्हणजे वाघाचाच ना ? . . . फाडाल. फाडाल. कबूल."

"आमच्या दंडात अजून सुई शिरली नाही. "

"नाही"––मी मागून म्हणालो.

"परवापर्यंत सगळ्या सांगोवांगीतल्या डॉक्टरांच्या नाड्या आमच्या हातात होत्या. हो नं ?"

"हो ऽ !"

"मग आमची नाडी आज डॉक्टराच्या हाती द्यायची ?"

"नाही."

"मग ?"

"श्रीमंत, नियम –"

"धाब्यावर बसवा. आमच्या विम्याला मेडीकल ?"

"चुकलं सरकार, चुकलं !"

माझा दुसरा काय इलाज होता. श्रीमंतांचा पारा जरा खाली आल्यावर त्याना पुन्हा मी पटविण्यासाठी मोठ्या विम्याला मेडीकल आवश्यक असल्याचे सांगितले. पण त्यानी एकच सूर धरला, "सचिव, या वाड्यावर डॉक्टराचा पाय आमच्या मेडीकलसाठी पडला तर तो त्याच्या हातात देऊ. काय ?"

"हो!" मी श्रीमंतांचं कौतुक करीत होकारलो.

"हो काय ? " पौराणिक सिनेमातले राम वगैरे भात्यातून बाण काढताना हात मागे नेतात तसे श्रीमंतानी बंदुकीच्या आठवणीनं हात मागे नेले. मी घाबरून बोबडी न वळवता बोलायचा प्रयत्न केला, "हेच . . . की डॉक्टरांच्या हातात त्यांचा पाय –"

"हां ऽ! . . . मेडीकल म्हणे !"

इतके जुळून आलेले काम केवळ श्रीमंतांच्या मेडीकलवाचून अडले होते. तपासणीसाठी श्रीमंत डॉक्टरांकडे यायला ढीम तयार नव्हते. एकाद्या डॉक्टराला केवळ तेवढ्यासाठी वाड्यावर आणणे म्हणजे त्याचा आधी मोठा विमा करणे त्याच्या हिताचे होते !

देशात गांधी जन्मशताब्दी साजरी होत आहे




उपोषण एक महान अस्त्र आहे – इति महात्मा गांधी

मध्यंतरी बरेच दिवस असेच गेले. श्रीमंतांचा माझ्या तोंडाशी आलेला विमा मला मटकावता येणार नाही याची खात्री झाली असली तरी मी धीर सोडला नव्हता. सांगोवांगी संस्थानची तमाम इस्पितळे पालथी घालून डॉक्टरांची पहाणी केली. शेवटी फार प्रयासाने एक पेशंटसारखा दिसणारा विम्याचा डॉक्टर मिळविण्यात मला यश आले. त्याने केलेल्या पहिल्या स्वागतावरून इकडे फारसे कुणी फिरकत नसावे असा मी अंदाज बांधला आणि श्रीमंतांची अडचण त्याच्यापुढे धरली. वाड्यावर येण्याचे धैर्य त्याने दाखविले. आपण डॉक्टर आहोत अशी पुसट शंकाही येऊ न देण्यात हा माणूस नक्की यशस्वी होईल अशी माझीही खात्री झाली होती. खरं तर बोलताना मध्ये मध्ये तो डॉक्टर असल्याची मीच खात्री करून घेत होतो.

"डॉक्टर, तुम्ही तुमचे कसब पणाला लावा."

" अवश्य. चांगल्या सिरीयस केसेस् मी—"

"अं हं ! ते कसब नाही. डॉक्टर नसल्याची वतावणी करायचं म्हणतो. सुदैवानं तुम्ही दिसता तसे –"

" काय ?"

" म्हणजे , डॉक्टर नसल्यासारखे दिसणं यावेळी आपल्या हिताचं आहे ना ! नाही का ?"

"हो !" नाईलाजानं डॉक्टरानी संमती दाखविली.

"मी कौशल्यानं तुम्हाला हवी ती माहिती तुमच्या पुढ्यात टाकतो. उंची, वजन, छाती. . ."

" पोट, नाडी, रक्तदाब . . ." डॉक्टरानी यादी पूर्ण केली.

"असू दे ! . . . फक्त तुम्ही फारसं बोलू नका. "

"नाही बोलणार—"

" तुम्ही सगळी मापं शिप्याच्या कौशल्यानं ध्यानात ठेवून फॉर्म पूर्ण करा. काय ?–"

" हो ! काळजी करू नका. पण —"

" पण काय आता ?" — डॉक्टरानी हाय खाल्ली हे पाहून मी जरा चढ्या आवाजात म्हणालो.

"तसं काही नाही म्हणा . . . पण समजा, श्रीमंतांच्या ध्यानी आलं तर —"

" ध्यानी आलं तर ना ?–

"नाही, मघाशी तुम्ही म्हणालात ते पाय हातात देण्याच्या प्रयोगाबद्दल . . ." इथे काटकुळ्या डॉक्टरानी आवंढा गिळला. मी त्यांच्या पाठीवर दिलासा देणारी थाप मारून म्हणालो,

"डॉक्टर, काळजी करू नका. श्रीमंताना माणसं ओळखायला येतात– आपलं —येत नाहीत !"

"मग ठीक आहे."

पेशंट दिसणाऱ्या डॉक्टराला घेऊन मी वाड्यावर आलो तेव्हा दुपारचे चार झाले







अनुक्रमणिका

होते. श्रीमंत फायलीतून डोकं घालून रहस्य-कथा वाचीत होते. त्यांचे हात मध्ये मध्ये शिवशिवत होते. कथा रंगात आलेली दिसत होती.

"या ऽ या ऽ ! सचिव,–" हे बोलतानाच त्यानी फाईल मिटली आणि आळस झाडला. माझ्या पाठीमागून येणाऱ्या काटकुळ्या इसमाकडे पहात श्रीमंत म्हणाले, "हं, कोण हे ?" –

"श्रीमंत, यांची ओळख करून देतो—"

" द्या, द्या —"

"हे सांगोवांगीकरच. तुमच्या दर्शनाची फार इच्छा होती. म्हणाले, सरकाराना भेटायचं आहे."

" आमचं दर्शन, कां बुवा ?"

" आत्ता का ? अहो, चंदनाचा वास लपतो काय ?"

यावर वाभळ हलावी तसे श्रीमंत हिस-ळत हसले. आपल्याला केवळ भेटायला येणाऱ्या व्यक्तीवद्दल श्रीमंताना कमालीचे प्रेम वाटू लागले.

"या ऽ, असे वसा --" असं म्हणून श्रीमंतानी काटकुळ्या डॉक्टराना खस्दिशी ओढून तक्क्याशी टेकविले. हाडे वर आलेल्या खांद्यावर आपला सणसणीत पंजा टाकीत म्हणाले,

"कुठे असता आपण ?"

डॉक्टरांचा चेहरा पाहात मीच श्रीमं-तांचा खांद्यात रुतलेला हात कौशल्यानं बाजूला काढून घेतला. डॉक्टर सावरत पुन्हा तक्क्याशी सरळ बसत म्हणाले, "येथेच असतो–"

"सरकार, शिकारीचा नाद फार याना —"

यावर पानाचा तोबरा तोंडात ढकलीत श्रीमंत डोळे फाडफाडून तक्क्यातल्या हडकुळ्या आकृतीला न्याहाळत म्हणाले, " कमाल झाली. तुम्ही अन् शिकार ?"

"सरकार, शिकारीचा म्हणजे शिका-रीच्या कथांचा —"

" ओ हो हो ! . . . " यावर मोठे कोडे उलगडल्यासारखे श्रीमंत गदगदा हलत हसत राहिले! आणि पिंक टाकून येत पुन्हा वसताना चुकून डॉक्टरांच्या मांडीलाच आपल्या हाताचा रेटा दिला. तशी तो जागी विव्हळत ओरडला, "अया ऽ ई. . . मेलो ऽ ऽ"

" आँ ? . . . अरे, माफ करा बुवा. लक्ष नव्हतं. "

"श्रीमंत, याना मी सांगितलं, आमच्या सरकारांजवळ भरपूर शिकारीच्या कथा आहेत. चला ऐकायला. "

" कसचं कसचं ! . . . गेले ते दिवस.

" अजूनही जाता का ?—शिकारीला."

हुळहुळणाऱ्या मांडीवर हाताने हळूच दावीत डॉक्टराने विचारले . . .

"जाता का ? . . . परवाच आले परत"

—मी मध्येच म्हणालो.

"हो ऽ ! —" श्रीमंत शिकारीच्या आठ-वणीत शिरल्यासारखे दिसले.

"सरकार, परवाची शिकार काय म्हणते ?–" मी.

" शिकार ना ? . . . जनावर नजरे-पुढून गेलं. मरायचंच. थोडक्यात हुकलं बघा. "

" अस्सं ?"

" हो नं ! . . . काय जनावर सांगू"–

श्रीमंतानी सुरुवात केली.

"सांगा, सांगा " मी आणि डॉक्टर सर-सावून बसलो.

" अहो मी असा आलो का इकडून, तिकडून जनावर. चक्क उभा.— काय उंच होतं हो ?"

"सरकार, काय उंची असेल हो ?"

" उंची ? . . . म्हणजे लांबी ?"

" बरं लांबी —"

" असेल की चांगलं साडे सहा फूट. "

"साडे सहा फूट ! भयंकरच सरकार. म्हणजे तुमच्यापेक्षा—"

" आमच्यापेक्षा अर्धा फूट जास्त. पण–"

" बरं का हो, कळली का उंची ?"

मी डॉक्टराना भानावर आणले.

" हो हो ?" डॉक्टरने मनाशी टिपण घेतले.

"उंची ?–" श्रीमंत संशयाने, दोघां-कडे पहात म्हणाले, .

"लांबी हो, वाघाची. " मी खुलासा केला.

" सचिव, ते बघा उमदं जनावर, असं . . .असं समोरून आलं की, . . ."










" बापरे ––" डॉक्टर उद्‌गारले. कारण त्यांच्या पुढ्यातच श्रीमंत शिकाऱ्याच्या पवित्र्यात होते.

" मी धरली का मानगूट घट्ट ––" आणि शिकारीच्या नादात श्रीमंतानी डॉक्टराची मानगूट गच्च पकडली. त्यानी मानगूट पकडताच डॉक्टरांची बुबुळं बाहेर पडतात की काय असं मला वाटू लागलं. त्याची जीभ बाहेर येईल या भीतीने मी श्रीमंतांची मूठ सैल करीत विचारलं, "सरकार, वाघाचं वजन किती हो ?––" या माझ्या भलत्या अकस्मात् प्रश्नाने श्रीमंत जवळजवळ खिकाळलेच. जवळच बसलेल्या डॉक्टराच्या पाठीवर जोराचा रट्टा हाणून त्यानी माझ्या विनोदाला दाद दिली. डॉक्टर त्या रट्ट्यानं माझ्या पायाशी फेकला गेला. मी त्याला उठवीत पुन्हा वसवून श्रीमंतांकडे पाहिलं. अजून ते माझ्या 'वाघाचे वजन किती ?' या प्रश्नावरच पोट धरून हसत होते.

"साचिव, अहो वाघाचं वजन चांगलंच असेल की चारशे पौंड. ––"

"म्हणजे तुमच्या दुप्पट असेल की सरकार––"

"माझ्या दुप्पट ? . . . हो ? असेल बुवा . . ."

"असेल ? –" मी पुन्हा.

" हां ! . . . आमचं वजन आता पावणे दोनशे पौंड होतं गेल्या हप्त्यात––"

"ऐकलं का हो ? . . . वजन ––"

घामाघूम झालेला डॉक्टर माझ्याकडे पहात ओठांच्या कडा पुसून म्हणाला, "आलं ध्यानात."

"फार नाजुक दिसता बुवा तुम्ही ?" श्रीमंत धाप लागलेल्या डॉक्टराला म्हणाले, आणि पुन्हा शिकारीकडे वळले आणि डॉक्टरला म्हणाले,

"बाकी असलं जनावर नाही पाहीलं मी –"

" काय सांगता ?––" मी उसन्या उत्सुकतेने.

"हो ! . . . पण आम्ही दोन्ही हातानी असं कवेत धरलं – " आणि असं म्हणता म्हणताच श्रीमंतानी डॉक्टराला दोन्ही हातानी घट्ट आवळला. त्याच्या फासळ्या श्रीमंतांच्या हाताला रुपू लागल्या. कवटाळल्यामुळे डॉक्टराला श्वास घेणे जड जाऊ लागले.

शिकारीच्या नादातल्या श्रीमंताना पुन्हा वाघाला हातांच्या पकडीनं जमिनीवर लोळविल्याची आठवण आली आणि त्यासरशी त्यानी हात जोरात झिजाडले. यावेळी मिठीतून जमिनीवर डॉक्टरांचा काटकुळा देह धाडकन् आदळला. मी पुढे होऊन डॉक्टरला कसाबसा उचलला. श्रीमंतांपासून थोडा दूर धरीत म्हणालो, "सरकार, थोडी राहीली मापं ––"

"मापं ? . . . कसली मापं ?––"

"अं ? . . . मी मापं म्हणालो ? . . . छे : छे : ! . . . मला वाघाबद्दल म्हणायचं होतं. काय छातीचं माप असतं वाघाच्या–?

"अरे चांगली शंभर इंचापर्यंत छाती असते एकेकाची ––"

"कहर आहे. शंभर ? . . . मग कमाल आहे तुमची."

"माझी ? . . . त्यात काय कमाल ? ––माणसाची छाती म्हणजे त्याची हिमत. काय ?–"

श्रीमंतानी शेवटचा 'काय' डॉक्टरांच्या कायेकडे पाहून उच्चारला. तशी घाबरून डॉक्टर दम घेत म्हणाला, "हो ! . . . हि . . . हि . . . हिम्मत ! ––"

" हंऽ ! . . . तुमची किती छाती ?–"

डॉक्टरने आवरते घेण्यासाठी सरळ विचारले.

"अशी पंचेचाळीस. फुगवून पन्नास. पाच इंच फुगवतो. आहात कुठे ? . . . हो ! . . ."

"फुगवा, फुगवा !" श्रीमंताना गुंतवून ठेवण्यासाठी डॉक्टर पुटपुटला.

"तरी बरं का हो, आमच्या श्रीमंतांचं हे दिल्लीला गेल्यापास्नं पोट सुटलंय् ––"

यावर श्रीमंतानी उसळून नापसंती दाखविली.

" छ्या, छ्या, अजून पस्तीस आहे पोट."

"आलं ध्यानात, पुढं––" डॉक्टर सुटकेसाठी आतुर होत म्हणाला.

"पुढे काय ?" –" श्रीमंत गोंधळले.

" शिकारीची गोष्ट. याना फार उत्सुकता आहे. काय झालं पुढं ––"

"हां ! . . . जग सचिव याना पाणी आणा . . . दमले वाटते नुसतं ऐकताना . . . नर त्याने जबडा फाडून डरकाळी दिली. गुरं . . घुर्गां ऽ गां ऽ . . ."

डॉक्टरांच्या कानात झिणझिणलं. " पुढे ? . . . तुमचं ब्लड प्रेशर वाढलं असेल ––"

श्रीमंतांची डरकाळी थांबवीत मी. "छट् ! . . . तेच. नेहमीइतकंच . . ."

"अस्सं ? . . . नाडीचे ठोके ? . . ." मी घाई केली. "अगदी मिनिटाला ऐंशी. फरक नाही. इतक्या शिकारी केल्या. स्वयंपाक घरापासून शिकारीपर्यंत आपली नाडी कायम ––"

" कमाल आहे ––" डॉक्टरानी श्रीमंतांच्या कायम नाडीबद्दल आश्चर्य व्यक्त केले.

" आणि मारला तुम्ही वाघ, नुसत्या हाताने ?" मी.

" त्यात काय ? . . . . तुम्हाला टाऊक नाही. वाघाचं पोट असतं मऊ. बरं का हो ––" श्रीमंतानी डॉक्टरकडे मोर्चा वळवला. त्याचं बकोट धरीत श्रीमंत प्रात्यक्षिकानं म्हणाले, " हे असं बुक्कीन पेकाटात हाणलं ना मी ––" यावर डॉक्टर चार पाच फूट फेकला गेला. तो चक्क अंगणात उडाला. श्रीमंतानी त्याच्या उडीवर पोट धरून हसायला सुरुवात केली. अंगणातल्या डॉक्टरच्या तोंडाला फेस आला होता. ढोपरे सोलली गेली. पाठीला खरचटलं. श्रीमंतांची मजबूत बुक्की पोटात बसल्याने तो जागीच पोटात वाकून विव्हळत कसाबसा उठला. राहिलेली कथा पूर्ण करण्यासाठी श्रीमंत बाह्या सरसावून उभे राहिले आणि अंगणाच्या दिशेने जाऊ लागणार तोच डॉक्टर भयाने उंच उडत बेडकासारखा आमच्याकडे पहात राहिला. हातानी दुरूनच श्रीमंताना थांबवीत पण मला उद्देशून ओरडला,

(पृष्ठ २०२ वर पहा)






अनुक्रमणिका



—पसंत देशमुख

# ★ ★ ★ ★ ती भाग्यशाली पगडी



साल १९५६! मुंबई सरकारच्या द्वैभाषिकावतीनं दिल्लीत साजऱ्या होणाऱ्या प्रजासत्ताक दिनासाठी एक नृत्य-पथक पाठविलं होतं.

दिल्लीतल्या नॅशनल स्टेडियम्‌वर, दरवर्षी लोकनृत्याचा सोहळा शाही इतमामानं साजरा होत असतो. एक प्रचंड अशी नेत्रदीपक परेड आणि त्यानंतर भारतीय लोकनृत्यांचा अपूर्व सोहळा हा प्रजासत्ताक दिनी करण्याची मूळ कल्पनाच पंडित जवाहरलाल नेहरूंची. १९५३ पासून हे कालसत्र चालू आहे.

आमच्या पथकाचं नृत्य अप्रतिम सुंदर होतं. "जेजुरीच्या खंडोबा रे गोंधळा ये ऽऽ!" ह्या लोकगीताच्या चालीवर कलाकार बेभानपणे भिंगरीसारखे नाचत. नॅशनल स्टेडियम्‌वर तर आम्ही धमाल उडविली होती. भारतातल्या सर्व राज्यातल्या उत्तमोत्तम नाचात आमचा नाच प्रेक्षकाना फारच आवडला होता. धिप्पाड पंजाबी नि दणकट शीख दाढी कुरवाळीत ताल धरायचे. खंडोबाच्या गाण्यानं स्टेडियम् साफ दणाणून सोडलं होतं.

भडक रंगाच्या हिरव्या, लाल, जांभळ्या जरीच्या नऊ वारी साडयात नर्तिका फारच सुरेख दिसत. पुरुषाना डगले, सुरवार नि डोईवर शिंदेशाही लालभडक पगडी! अस्सल मराठमोळी!

आमचं सर्वत्र कौतुक होत असतानाही मी मात्र फारच अस्वस्थ होतो. संयुक्त महाराष्ट्राची चळवळ उग्र स्वरूप धारण करीत होती. फ्लोरा फौंटन्‌ला बेफाम गोळीबार झाला होता. महाराष्ट्र निर्मितीच्या ध्यासानं बहुसंख्य समाज अगदी भडकून गेला होता.

हे शल्य मनात टोचत होतं. मुंबईला काय चाललं असेल? मनातल्या मनात मी खंडोबाची प्रार्थना केली! "देवा खंडेराया आमचं स्वप्न साकार कर! गुण्यागोविंदानं, प्रेमानं! कटुता न येऊ देता!"

नाच ऐन रंगात आला की आमचे कलाकार कलाबुतमिश्रित भंडार उधळीत. तो खाली पडताना झगमगे नि टाळ्यांचा कडकडाट होई तो इथं. . .

"पुणं धरति ही पलिकडं ऽऽ  
गड जेजुरी अलिकडं ऽऽ  
रुप दावुनि भानु गे ऽऽली  
स्वारी देवाची येडी झाऽऽली  
बोला होऽऽहो बोलाऽऽ  
खंडेरायाचा एळकोट बोलाऽऽ  
भंडार वाहूऽऽ मल्हारीलाऽऽ

आणि चमकदार भंडार उधळला जायचा! स्टेडियम् तुडुंब भरलं होतं. पंडितजी आले. बरोबर होत्या लेडी मौंटबॅटन. पंडितजी बेहद्द खुषीत होते. असा देखणा पुरुष होणे नाही!

आमचा नाच शेवटी होता. झाला नि असा बेफाम रंगला की आम्ही तर

> **जनतेशी सर्वार्थानी समरस होणारा नेता लाभणं हे भारताचं अहो भाग्यच नव्हे का?**

आनंदानं अगदी बेहोष झालो. टाळ्यांचा कडकडाट झाला.

पंडितजी स्टेजवर आले. आमच्या कलाकारानी शिंग वाजविलं. वाद्यं घुमविली, भंडार उधळला नि खंडोबाच्या नि पंडितजींच्या नावाचा जयजयकार करून परिसर दणाणून सोडला.

तेवढ्यात मी पंडितजींना एक विनंती एकाएकी केली. आपण ही शिंदेशाही लाल पगडी घालावी. नाजुक विनंती! पण तो मोठा देवमाणूस! म्हणाले, "बडी खुषीसे! क्यों नही!"

आमच्या एका कलावंतानं त्याना ती पगडी घातलीही. आता मात्र खरेच आनंदातिशयानं वेडेच झालो. शेकडो फोटो फटाफट काढले गेले.

"ह्या पगडीत आपण इखादे महाराजासारखे दिसता" प्रसन्नपणे हसत लेडी मौंटबॅटन म्हणाल्या. पंडितजी तर प्रसन्नतेची साक्षात् मूर्ती! खूप, खूप हसले. आमच्या कलावंतांचं त्यानी अतिशय कौतुक केलं.

गाडीकडे जाताना ते पगडी काढू लागले. कुणीतरी सुचविलं की असू द्या की! छान दिसता अस्सेच! बिच्चारे! ठेवली तशीच पगडी नि बसले एका भल्या मोठ्या काळ्या गाडीत.

मी त्यांच्याकडे पाहिलं. थक्क झालो. हरिणासारखे मोठाले सतेज डोळे, पारिजातकाची फुलं उधळवीत आहे अशी प्रफुल्ल मुद्रा, एक स्वप्निल निरागसता, गर्द, तपकिरी कोटावर विराजलेलं नि डौलानं थरथरणारं लाल, लाल गुलाबाचं फूलं... वा! आपण तर बुवा नुसते बघतच राहिलो!

हात हालवीत त्यानी आमचा निरोप घेतला. आमचे कलाकार नाचत बागडत, गात, गात तालकटोरा उद्यानात परतले! धुंद होऊन! बेहोष होऊन! हा दिवस भाग्याचा म्हणून मी भोजनाचा बेत आयोजिला तो पंचपक्वान्नाचा! अगदी राजेशाही!

आम्ही मुंबईस परतलो. कामाच्या रामरगाड्यात रमलो.

एक सीलबंद, जाडजूड लखोटा काही दिवसानी माझ्या नांवावर आला. माझं कुतुहल वाढलं. कुणाचं बरं असेल? जरा निष्काळजीपणानं नि घिसाडघाईनंच तो मी उघडला. खुद्द पंडित जवाहरलाल नेहरूनीच ते पत्र पाठविलं होतं. ते पत्र असं :–

I was happy to see the Deepak Dance performed by the Maharashtra party from Bombay during the Folk Dance Festival here. The dance was very attractive and graceful.

A member of the troupe presented me afterwards with his Zari turban. I appreciated this gift of friendship very much and I exchanged my own much simpler Gandhi cap with him.

I send my good wishes to the Bombay party of folk dancers and wish them well.
New Delhi,
January 31, 1966

(sd) Jawaharlal Nehru.

मी अगदी स्तिमित झालो होतो. भारताच्या भाग्यविधात्याकडून पत्र आलं होतं! दस्तुर खुद्द! सोबत त्यांची आठवण म्हणून वापरती गांधी टोपी!

ते पत्र नि ती गांधी टोपी मी अगदी जपून ठेवली आहे. केव्हातरी मी ती एकटाच बघतो. हळुवारपणे त्या पत्राला नि टोपीला स्पर्श करतो! माझे डोळे पाणावतात नि त्यांचे शब्द कानांत सारखे घुमतात....

"If any people choose to think of me then, I should like them to say: This was the man who, with all his mind and heart, loved India and the Indian people. And they, in turn, were indulgent to him and gave him of their love most abundantly and extravagantly."

Jawaharlal Nehru.

☆ ☆ ☆

---

(पृष्ठ १९९ वरून–श्रीमंतांची मेडिकल)

"कळली कळली शिकार सरकार... जनावर तुमच्या तावडीतून कसंबसं सुटलं असणार असंच ना?—"

"वाव्वा ऽ! तुम्ही बरोबर ओळखलंत."

"ओळखलं? .... अनुभवलं. मी चलतो आता—"

असं म्हणून जवळ जवळ पळ काढणाऱ्या डॉक्टरच्या पाठीवर मी ओरडलो.

"म्हणजे सगळी मापं झालीत ना?"

"मापं?"– श्रीमंतानी पुन्हा संशयाने पाहिलं.

घाईतला डॉक्टर किंचाळला, "काही सुद्धा राहिली नाहीत. तेवढा मी राहीलोय. कसाबसा... आता येतो.."

"निघालात काय?—" श्रीमंत अस्तन्या सावरीत म्हणाले, "कुठे पण –?"

"कुठे?... आता आधी येथून जातो डॉक्टराकडे —"

वाड्याच्या प्रवेशदाराची कडी काढीत डॉक्टर पाठीवर चोळीत म्हणाला, "एक हाड जाग्यावर नाही. मेडीकल करून घेईन म्हणतो––"

श्रीमंतांच्या शिकारीतून कसाबसा सुटलेला डॉक्टर धूम पळत सुटला. श्रीमंत उरलेली शिकार पूर्ण करण्यासाठी माझ्या दिशेने आले.

मला आत्ता मुळीच चिंता नव्हती. आज माझी गोळी अचूक लागली होती!

● ● ●

अनुक्रमणिका







मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



## निसर्गाने मुक्त हस्ताने सौंदर्याची पखरण केलेले




दिल्लीपासून ७६०० किलोमीटर्सची विहंगम भरारी मारली की अकरा तासात आपण मॉस्कोमार्गे लंडन गाठतो आणि धुराळ दिल्लीच्या वातावरणातून निसटून सचेतन लंडन शहराच्या कुशीवर विसावल्याचे अनुभवतो. ग्रीष्ममय दिल्लीच्या भगभगीतून निघून लंडनच्या शीतलतेत शरीर सुखावते. तसेच पुढे आणखीन् अकरा तासांचे उड्डाण केले की उत्तेजक आणि उन्मादक अशा गालिच्यावर आपण अवतरतो. 'त्रिनिदाद' ह्या भूप्रदेशाचे नाव. त्रिनिदाद म्हणजे 'सहआकांक्षा' आणि 'सहविक्रम' यांचा नाद आणि दाद! ४७० वर्षांपूर्वी कोलंबसाने शोधलेल्या या 'टी' द्वयी भूमीस (म्हणजेच त्रिनिदाद व टोबॅगो) संयुक्त राष्ट्रांतर्फे आयोजित केलेल्या परिसंवादास ह्या वर्षी एप्रिलमध्ये भारताचा प्रतिनिधी म्हणून मी गेलो होतो. जे कोलंबसाला इ. स. १४९८ मध्ये गवसले ते मला १९६८-मध्ये पुनः प्रत्ययाचा आनंद देत उमगले. कॅरेबियन सागराशी झंकारणाऱ्या ॲन्टिलिजच्या या साखळी बेटांकडे कोलंबसाने तीन पर्यटने केली तर मी दोन. ट्रिनिटी ह्या शब्दाचा इंग्रजीत जो अर्थ आहे तोच स्पॅनिश भाषेत त्रिनिदादचा होय. कोलंबसाने दक्षिण किनाऱ्यावर तीन टेकड्या पाहिल्या आणि त्याने त्याच क्षणी नामकरण केलेले 'त्रिनिदाद' हे त्याचे नाव स्थिर व प्रसिद्ध झाले. गारठ्याच्या पकडीत सदैव अडकलेले आणि औद्योगिक वेळापत्रकाच्या चौकटीत फसलेले युरोपीय जगत सदाच अशा बेटाकरता आसुसलेले असते. कारण तिथे स्वच्छ उन्हाचा शिडकावा निरभ्र आकाशातून अखंड होत असतो व दिवसाच्या उबेत मनसोक्त विश्राम मिळू शकतो, रात्रभर निशाचर बनून नृत्याचा मुक्त विलास लाभतो 'लिंबो' अंगाळता येतो आणि खटयाळ अन् व्रात्य कॅलिप्सो संगीत ऐकावयास मिळते. युरोपिअन आणि अमेरिकन पर्यटकाना त्रिनिदादमध्ये उपभोग्य असा भरपूर मालमसाला आहे. कदाचित्, यामुळेच रॉबिनसन क्रूसोला अडीच शतकांपूर्वी टोबॅगो बेटाला येण्याचा मोह आवरता आला नसावा. आणि तदर्थच त्याने ते आपले निवासस्थान निवडले असावे. मी एक भारतीय जरी देशपर्यटन करण्यास बाहेर पडलो नव्हतो तरी मला हे सर्व अनुभवण्यास मिळाले पण त्यापेक्षाही अधिक अशा एका गोष्टीने हृदयाचा ठाव घेतला.

त्रिनिदादचे पिअॅरको आंतरराष्ट्रीय विमानतळ हे 'पोर्ट ऑफ स्पेन' या राजधानीच्या शहरापासून १६ मैल दूर आहे. भारतीय दूतावासाचे प्रथम सचीव श्री. एस्. एस्. कौल नित्य नैमित्तिक प्रथेला व सौजन्याला अनुसरून माझ्या स्वागतार्थ विमानतळावर आले होते. त्यांच्याबरोबर श्री. रूप नरीन (रूप नारायण) हेही होते. संभाषण हिंदीत सुरू झाले. पण श्री. रूप नरीन यानी त्यात भाग घेतला नाही. आंतरराष्ट्रीय उतारूंच्या सोयीसाठी केलेल्या अतिथीकक्षात श्री. रूप नरीन यानी माझा पासपोर्ट आणि स्वास्थ्य-प्रमाणपत्रे ही औपचारिक चाचणी व तपासणी परिपूर्ण करून घेण्याकरिता नेली. नंतर श्री. रूप नरीन परतले तेव्हा श्री. कौल यानी मला त्यांच्या स्वाधीन केले. त्यांच्या सोबत मी त्रिनिदादच्या हिल्टन

अनुक्रमणिका

हॉटेलला गणेशसिंग सारथ्य करीत असलेल्या टॅक्सीतून गेलो. हॉटेलात 'बेलबॉय' राल्फ महावीर याने सामान ताब्यात घेतले आणि मला स्वागत गणकाकडे नेले. तिथे इरॉल रामगोपाल याने माझे नाव नोंदून घेतले आणि मला राहावयास दिलेल्या खोलीची किल्ली दिली. या बेटाचा माझा शोध येथून आरंभला.

## 'नमस्त'– एकच हिंदी शब्द

दौऱ्यात भेटलेल्या सर्व इंडियन्सनी माझ्याशी इंग्रजीतच बोलणे केले. 'नमस्ते' हा एकच हिन्दी शब्द त्याना परिचित असलेला दिसला. भारतीय पूर्व आफ्रिकेत गेले आणि तिथे शतकानुशतके राहिले. त्यांच्या वंशजानादेखील ज्या पूर्व व दक्षिण आफ्रिकेच्या विभागात ते राहिले त्या व्यतिरिक्त अन्य कोणत्या देशाची कल्पना नव्हती. परन्तु हिन्दी किंवा अन्य भारतीय भाषा त्याना परक्या नव्हत्या. पण त्रिनिदाद-टोबॅगोच्या ईस्ट इंडियन जनतेची अशी स्थिती नाही. त्यांचा इंग्रजीव्यतिरिक्त कोणत्याच इतर भाषेशी परिचय नाही. चोवीस तासांच्या सततच्या उड्डाणानंतर मी त्रिनिदादला सायंकाळी आलो होतो. अंथरुणाला अंगाळलो तेव्हा माझे मन कुतुहल, औत्सुक्य व बेटातील जनतेच्या–विशेषतः ह्या भारतीय जनतेच्या विचारानी भरलेले होते. माझ्या तेथील निवासात माझे मन पृथ्वी गोलाच्या या पश्चिम विभागात वसलेल्या छोटचा भारताचे दर्शन घेण्यात रमले, रतले.

## 'सवान्ना'चा लावण्ययुक्त परिसर

दुसऱ्या दिवशी प्रातःकाली जाग आली आणि पडदे दूर सारले तेव्हा डोळ्यापुढे हिरवळीची मृदु शाल ओढलेला प्रसन्न परिसर विस्तारलेला दिसला. तोच 'सवान्ना' या नावाने लोकप्रिय व प्रसिद्ध असलेला परिसर. अशा अनेक परिसरांच्या सौंदर्याने अगदी फार पूर्वी म्हणजे इ. स. १७९६ मध्ये रॉबीनसन् क्रूसोला मोहवून टाकले होते. खरेच 'सवान्ना'चे लावण्य व चारुता अक्षय्य होती व आहे. पोर्ट ऑफ स्पेनच्या-या 'सवान्ना'च्या अश्राप सौंदर्यावर सकाळी दहा वाजण्याचे सुमारास लोकांच्या झुंबडीचे आक्रमण सुरू झाले. अशा या अलोट दैनिक आक्रमणातून भूतकाळात सर लॅरी कॉन्स्टन्टटाईन, सोनी रामाधीन, विल रॉड्रीग्ज, जेफ स्टॉलमायर, जेरी गोमेज आणि ॲण्डी गौतम ही क्रिकेट क्षेत्रातील वलस्थाने निर्माण झाली होती. या विक्रमी क्रिकेट वीरानी क्रिकेट क्षेत्रात आपल्या अद्भुत व नेत्रदीपक क्रीडा नैपुण्याने केवळ प्रस्थापित उच्चांक मोडले असे नव्हे तर ते क्रिकेट क्षेत्रात अद्यापीही अतुल व अजोड राहिलेले आहेत. 'सवान्ना'च्या प्रसन्न दर्शनाने साहजिकच मनाची रवंथ सुरू झाली आणि मरीन ड्राईव्हलगतच्या जिमखान्याच्या संदर्भात भारतीय क्रिकेटची तुलना मनात आंदोलली. उघड फरक जाणवला की, या क्षेत्रात उमेदवारीची वरीच वर्षे गेली तरी किमान नैपुण्य असलेल्या संघापेक्षा आपल्यास सरस ठरता आलेले नाही. मात्र त्रिनिदादवाल्यानी त्याच अवधीत अशी आगेकूच केली की, अक्षरशः शतकानुशतके क्रिकेट ज्यांच्या हाडात मुरले आहे त्यानाही यांच्यावर मात करणे कठिण होऊन बसले.

'अंदमान ते आनंदमान' ही 'दीपावली'तून गाजलेली प्रवासवर्णनात्मक लेखमाला गुंफणारे **श्री. माधव राजवाडे** यांच्या रसिक नि मार्मिक लेखणीने सादर केलेल्या नव्या आगळ्या प्रवासवर्णनाचा हा पूर्वार्ध—

. . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . . .

हिल्टन हॉटेलच्या बॉलरूममध्ये सकाळी ११ वाजण्याच्या सुमारास परिसंवादात सहभागी होणारी प्रायः पंचवीस देशांची प्रतिनिधी मंडळी येऊ लागली. याच बॉलरूममध्ये त्याना एक पंधरवडा 'बंदिस्त' राहून नैसर्गिक गॅस व तेलशोधन यंत्रणा या विषयावर गंभीर चर्चा करावयाची होती आणि या चर्चेच्या अनुषंगाने या क्षेत्रात अधिक भाग्यशाली असलेल्या अमेरिका, इराण, अरेबिया आणि वेनेझुएलासारख्या देशांच्या अनुभवातून बोध घ्यावयाचा होता. प्रवेशद्वाराशी 'संयुक्त राष्ट्र विकास योजना' ( UNDP ) चे कार्यकर्ते श्री. रामगोपाल प्रतिनिधींचे स्वागत करीत होते. प्रवेशद्वाराशी असलेल्या श्री. रामगोपाल्यांच्या उपस्थितीने गतरात्री जी विचारमालिका चलित झाली होती, ती पुन्हा चाळवली गेली व येथील कितीतरी गोष्टीत ज्यांचे भारताशी चमत्कारिक साम्य आहे ते जाणून घेण्याचे कुतुहल अधिकच तीव्र झाले. माझ्या कन्येसाठी सुवेनीर्स ( Souvenirs ) घेण्यासाठी एका सकाळी बाजारात सहल मारली. मोठमोठी डिपार्टमेंट स्टोअर्स व मध्यम दर्जाची अशी अनेक दुकाने हिंडलो. जिथे जिथे गेलो तिथे तिथे काऊन्टरच्या मागे ब्लाऊज व फ्रॉक घालणाऱ्या सेल्सगर्लस् तेथील रीतरिवाजाप्रमाणे उभ्या टाकल्या होत्या. ब्लाऊजवर प्रत्येक मुलीच्या नांवाची फीत होती. चेहेरेपट्टी व नावे ही संपूर्णपणे भारतीय होती. फरक होता तो नावांच्या विकृत स्वरूपात. पण सर्वांची मातृभाषा मात्र इंग्रजी. हिन्दी किंवा अन्य भारतीय भाषांचा गंधही नाही. भारतातून आलेला एक भारतीय म्हणून सर्वांना मजबद्दल कौतुक. खरेदी करीत असताना भारतातील विशेषतः बिहारसंबंधी चौकशा अनेक. कोणाचा आजा, तर कोणाचा पणजा, तर कोणाचा त्याही पूर्वीचा पूर्वज प्रथम उसाच्या शेतीवर काम करण्यासाठी भारतातून आलेला. तदनंतर वर्षे लोटली. दोन तीन पिढ्या झाल्या. भारत कुणी पाहिला नाही की भारतातून कुणी आलेला नाही. कॅरिबिअन बेटातील पोर्टोरिको ह्या बेटास १९६४ साली दिलेल्या भेटीत भारतीय अभावानेच तळपला. त्याच साखळीतील ह्या बेटात मात्र अगदीच वेगळा प्रकार व प्रत्यय. दर दहा माणसांमागे चार भारतीय. भारतीयांचा भरणा विशेषेकरून शेती, साखर कारखाना व व्यापार पेठेत. शिक्षणाकडे प्रथम भारतीयानी अधिक लक्ष व महत्त्व दिले नाही. परिणामतः सिविल सर्विसमध्ये त्यांची संख्या ओघाने कमीच पण हीही उणीव आता हळूहळू भरून निघत आहे.

एके संध्याकाळी सायंकालीन अंधारावर प्रकाश झळकू लागला. प्रसंग होता प्रधान मंत्री डॉ. विल्यमसनी पाहुण्याना पाचारण्याचा. डॉ. विल्यम्स हे विख्यात इतिहासज्ञ पूर्वी

हारवर्ड विश्वविद्यालयात इतिहासाचे प्राध्यापक होते. आमच्या दृष्टीने, या देशाच्या अग्रेसर रहिवाशाना भेटण्याची ही एक चालून आलेली उत्तम संधी होती. कारण यात राष्ट्रीय धारासभेचे विरोधी पक्षीय नेते श्री. व्हेरनॉन, वार–ॲट–लॉ, हायकोर्टाचे न्यायाधीश जनाव हियातअली, बहुवल असलेल्या व पूर्व भारतीयानी स्थापलेल्या डेमोक्रॅटीक मजूर पक्षाचे सचीव श्री. केनेथ लाला आणि मंत्रिमंडळातील एक मंत्री श्री. महावीर इ. इ. भारतीय मंडळी होती. शिवाय शासकापैकी अंतर्गत महसूल कमिशनर (इन्कमटॅक्स कमिशनर) श्री.सुखमंगल सिवस्वरूपे, कायदा सचीव श्री. रूप नरीन, लोकसभा आणि जन आरोग्य मंत्रालयाचे सचीव श्री. रामगोपाल या व्यक्ती होत्या. खरं पाहिलं तर श्री. सिवस्वरूपे यानी मला या प्रदेशाचा शोधबोध घेण्यास मदत केल्याने शंभर वर्षापूर्वी भाग्योदयाकरता येथे येण्याचे धाडस केलेल्या आमच्या भारतीय बंधूंबद्दल पूर्णपणे अज्ञात असलेली माहिती आकळू शकली. तशी इतर मंडळी आपल्या परीने या प्रदेशाचे दर्शन करून देत होती पण श्री. सिवस्वरूपे यानी दिलेली करून ओळख विशेष प्रकाश टाकणारी होती.

या संबंधातले दोन प्रसंग उल्लेखनीय व संस्मरणीय होत. एक श्री. कौल यानी घडवून आणलेल्या मंदीर भेटीचा व दुसरा श्री. सिवस्वरूपे यानी एका विवाह समारंभाला नेल्याचा.

**त्रिनिदादमधला लग्नसमारंभ**

श्री. कौल यानी एके सायंकाळी पोर्ट ऑफ स्पेन ह्या तीन लाख वस्तीच्या राजधानीची सहल करवली. इसाई चर्चच्या धर्तीवर बांधलेली पण अत्यंत स्वच्छ व सुदर आणि आकाराने लहानशी अशी दोन मंदिरे दृष्टीखालून गेली. मंदीर पाहण्याची एक दीर्घ इच्छा निर्माण झाली व ते रविवारी पाहण्याचे ठरवले. अनायासे त्या दिवशी लग्नसमारंभही मंदिरातच व्हावयाचा होता. तो पाहण्याचा योग लाभला. सर्वच भारतीयांचा पेहेराव पाश्चात्य धर्तीचा. भारतात आता सर्वत्र रुळलेला व आढळणारा बुशकोट फक्त माझ्याच अंगावर होता. ईस्ट इंडियन्स टेरेलिन किंवा डेकरॉनच्या सूटात सजले होते. स्त्रियाही पाश्चात्य वेशभूषेनेच नटल्या होत्या. लग्नाचे सुमुहूर्तावर डोक्यावर पदर हवा म्हणून फ्रॉकवर एक ओढणी व तीही केवळ डोके झाकण्यासाठी. कृष्णमंदिरात सांबाची मूर्ती असा प्रकार ! भारतीय थाटाच्या फक्त दोन व्यक्ती होत्या; त्या म्हणजे पौरोहित्य करणारी. पौरोहित्य करणारी व्यक्ती ब्राम्हणच असते असे नव्हे. काही आर्य समाजीही असतात. परंतु आर्य समाजात जातपात नसल्याने प्रत्येक आर्य ब्राम्हण असतोच. समारंभाची किंवा विधीची स्तोत्रे संस्कृत असावीत असे वाटले. ती स्तोत्रे ऐकताना अत्र्यांचे नाटक ' बुवा तेथे बाया'मधील प्रवेशाची आठवण झाली. कारण जे काय गुणगुणले जात होते ते शुद्ध मूळाला दुरावलेले व असंबद्धच होते. सप्तपदीचा प्रकारही दृष्टीस आला नाही. वधुवरानी एकमेकांचे गळ्यात हार घातले तेव्हा लग्न संपले व सूप वाजले. संगीत होते पण ते ध्वनिमुद्रित. शहनाई होती व ती लाऊडस्पीकरद्वारा प्रस्तुत. लग्नाला आलेली मंडळी नाट्यगृहात वसतात तशी सर्व खुर्च्यावर रांगेने व्यवस्थित बसलेली होती. अक्षता दिसल्या नाहीत. अर्थात् इतका तांदूळ वाया घालवण्याकरता तिथे नाही. सर्वच भारतीय मांसाहारी परंतु लग्नाचे जेवण मात्र अगदी शाकाहारी. मेजवानीचा बेत मैद्याची पोळी व तीसुद्धा कुस्करलेली. पुलावाचा आभास निर्माण करणारा भात, त्यात मसाल्याचा अभावच, मिरपुडीने तिखट केलेली भाजी, चटणी, असा होता. प्राप्त परिस्थितीत ज्या वस्तू उपलब्ध होत्या त्यामुळे हा भोजनाचा आराखडा निश्चित झाला होता हे उघड होते. स्त्री–पुरुष दोन वेगवेगळ्या गटात मात्र नव्हते. पाश्चात्य समाजात स्त्री–पुरुष मिश्रण जसे असते तद्वत होते. लग्न सोहळा २/३ तासांचा एकूण असतो.

**विविध आक्रमणे**

या संदर्भात ' ईस्ट इंडियन्स' म्हणून संबोधल्या आणि ओळखल्या जाणाऱ्या भारतीयांबद्दल उल्लेख करताना, १८०० चौरस मैल क्षेत्रफळ असलेल्या त्रिनिदाद–टोबॅगो या चिमुकल्या देशाच्या इतिहासाकडे थोडा अंगुलीनिर्देश करणे समर्पक व संयुक्तिक ठरेल. या सुपीक बेटांचे मूळचे रहिवाशी अमेरिकन इंडियन्स होते. ख्रि. पू. ८०० व्या शतकात ' सिवोनींचा' तिथे अधिवास होता. नंतर आली ती शांतताप्रिय 'आरावाक' शेतकरी जमात. मग आले उग्र 'कॅरिब' ज्यानी बेटाना व सागराला कॅरिबियन हे नाव दिले. या कॅरिबिअनानी आरावाकाच्या वसाहतीवर दक्षिण अमेरिकेच्या व्हेनेझुएलातून हल्ला चढवला आणि उत्तरेकडे पोर्टोरिकोत स्पॅनिशानी थोपवीपर्यंत





अनुक्रमणिका

वाटचाल केली. इ. स. १४९८ मध्ये ज्या माणसांचा कोलंबसाला शोध लागला ती हीच होती. स्पॅनिशानी ही बेटे त्याना करिबापासून संरक्षणाचे आमीष दाखवून जोडली. दैवदुर्विलास म्हणतात तो असा की, परकीय स्पॅनिश चार हजार किलो मीटर्सवरून पर्यटनाचा सर्व त्रास सहन करीत आले ते मूळच्या येथील रहिवाश्याना संरक्षण देण्यासाठी म्हणून आणि याच स्पॅनिशांच्या अधिपत्याखाली इ. स. १७७३ पर्यंत ही बेटे अविकसितच राहिली. इ. स. १७७३ साली स्पॅनिश गव्हर्नर डॉन जोसे मारिया चाकोन यानी पोर्ट-ऑफ-स्पेन हे शहर वसवले आणि ही बेटे राहण्याकरिता खुली केली. सुरवातीला जे राहण्याकरता आले ते फ्रेंच होते आणि त्यानी लक्षणीय असा आपला ठसा या बेटांच्या संस्कृतीवर उमटवला. नंतरच्या दहा वर्षात, या प्रदेशाच्या समशीतोष्ण हवामानाने आणि सुपीक जमिनीने अनेक व भिन्नभिन्न देशांच्या रहिवाश्याना आकर्षित केले आणि या भिन्न-देशीय लोकानी साखर, कॉफी, कापूस आणि कोको यांच्या उत्पादनाच्या इस्टेटी हजारो आफ्रिकन गुलामांच्या श्रमाच्या आधारे प्रवर्तीत व प्रस्थापित केल्या. इ. स. १७९७ साली इंग्लंड आणि स्पेन यामध्ये युद्ध जुंपले तेव्हा ब्रिटिशानी त्रिनिदादची नाकेबंदी केली आणि गव्हर्नर चाकोनला ही बेटे ब्रिटिशांच्या स्वाधीन करण्याखेरीज गत्यंतर राहिले नाही. ब्रिटिशानी आपल्या आमदानीत इ. स. १८०७ साली गुलामी नष्ट केली आणि येथील लोकांच्या व्यक्तिस्वातंत्र्याच्या आणि सुधारणेच्या प्रक्रियेची सुरुवात इ. स. १८३३ पासून झाली. अधिक मजूर प्राप्त करण्याकरता अर्थातच पर्यायी मार्ग धुंडाळावे आणि राबवावे लागले. गटश: स्थलांतराचा प्रयत्न झाला आणि बोटींच्या कप्तानांना अशा मजुरांना आणण्याकरता भरपूर मोबदला द्यावा लागला. याप्रमाणे स्थलांतर करून आलेल्यात मदिरा-अझोरीस बेटे, फरान्स, जर्मनी आणि इतर शेजारी बेटांची माणसे होती. परंतु मजुरांची आवक जमवण्याचीही पद्धत महागडी होती आणि यशस्वी ठरली नाही. म्हणून इ. स. १८४५ साली करारयुक्त मजुरांची रीत पुरस्कृत झाली आणि ती इ. स. १९१७ पर्यंत मार्गस्थ राहिली. ह्या काळात पूर्व भारतातून – विशेषत: बिहार प्रांतातून हजारोंच्या संख्येनं या दूरस्थ प्रदेशात मजूर आले आणि त्यानी अनेक उत्सवात हिन्दू 'दीपावलीची' भर घातली व शोभा वाढवली. उत्साह शतगुणित केला. इ. स. १९६० साली या बेटांची लोकसंख्या सव्वा आठ लक्ष होती आणि त्यापैकी तीन लाख पूर्व भारतीय होते. इ. स. १९६७ साल अखेर हीच लोकसंख्या लाखांचे दशक ओलांडून गेली आणि भारतीयांच्या लोकसंख्येचे प्रमाण एकूण लोकसंख्येत ४० टक्के झाले. ही लोकसंख्या सर्व बेटावर कान्याकोपऱ्यातून विखुरलेली असली तरी ती विशेषेकरून एकत्र दाटलेली जी आहे ती औद्योगिक व्यापारी शहर 'सान फरनान्दो' आणि राजधानीचे शहर 'पोर्ट ऑफ स्पेन' येथे आहे.

[ उत्तरार्ध पुढील अंकी ]














(पृष्ठ १० वरून—**झडप**)

चंदनने लिहिले होते, "लता, ह्या वेलीला फुले येत नाहीत. पण दुसऱ्या वेलीला येतील. [ती इथे (एकटयाने) येईल तेव्हा.] मी नसताना तू इथे येशील, आणि जे काही करीत आहेस, ते सर्व करशील हे मला ठाऊक आहे. त्याचे योग्य पारितोषिक मी तुला केवळ लग्नानंतरच देऊ शकेन. पण फूल नाही फुलाची पाकळी म्हणून सध्या जे काही आणले आहे, ते कपडयांचे कपाट स्वच्छ करताना तुला सापडेल. ते तू घे!"

कपडयांच्या कपाटात लतिकेला शुद्ध रेशमाची एक साडी सापडली. साडीवर जांभळया मखमलीची एक डबी होती. आणि त्या डबीत होता पाणीदार मोत्याचा एक सुंदर लफ्फा. त्या लफ्फयापेक्षाही सुंदर पत्र त्या डबीत होते. चंदनने लिहिले होते,

"लतिका हा लफ्फा घालून आणि ही साडी नेसूनच आज तू इथून जा. (मात्र तुझे पालटलेले कपडे इथे ठेवायला विसरू नकोस.) ह्या रेशमी साडीत तू एखाद्या दवाने न्हालेल्या शुभ्र फुलासारखी दिसशील. तुझे ते रूप पहायला मी तिथे नसेन. पण प्रेम देण्यात आनंद मानतो. तुझ्या आनंदानेच मी आनंदीत होईन!"

त्या ओळी वाचून लतेच्या डोळयात पाणी आले! प्रेम देण्यातच आनंद मानतो! किती सुंदर होत्या त्या ओळी! चंदनने आपणाला प्रेम दिले, भेटी दिल्या, हळुवारपणा दिला, आदर दिला! पण आपण त्याना काय दिले? त्याचे जवळ येऊ पाहणारे तोंड आपण नेहमी तळव्याने दूर केले. हाताच्या स्पर्शापलीकडे आपण त्याला कधी काही दिले नाही. त्या विचारासरशी लताच्या जीवाची घालमेल झाली. तिने चंदनचे हे दुसरे पत्रही गळयापाशी खोचले व केरसुणी उचलली. भराभर तिने स्वयंपाक घर झाडून काढले. झोपण्याची खोली झाडून काढली. प्रत्येक दालन तिने स्वच्छ केले. चंदनच्या शेजघरात ती पुन्हा आली आणि स्तंभित झाली. तिला वाटले, येवढी मोठी गोष्ट प्रथम आपल्या दृष्टीतून कशी निसटली? चंदनच्या खोलीत दुहेरी आकाराचा पलंग आला होता. तिथला एकेरी पलंग नाहीसा झाला होता. आणि ह्या शोभिवंत दुहेरी पलंगावर लतिकेचे कपडे व्यवस्थितपणे मांडून ठेवले होते! तिची मोहोरीच्या रंगाची तलम साडी, ब्लाऊज, परकर, कांचोळी! त्या कपडयांकडे पाहून लतेला झिणझिण्या आल्या. तिचे रक्त वेगाने फिरले. हाताच्या अंतरावर ठेवलेल्या गूढ, अज्ञात आनंदाची भिरभिरणारी स्वप्न पहात, त्या पलंगावर लतिका काही वेळ बसून राहिली. तिच्या शरीरातून वाफा निघू लागल्या. एकटेपणा तिला असह्य झाला. जिथे तिथे तिला चंदन दिसू लागला. त्या पलंगावर आपल्या शेजारीच चंदन आहे. त्याने आपला हात धरला आहे, तो आपल्याला ओढून जवळ घेत आहे, असे तिला वाटले. चंदन लग्न झाल्याबरोबर दार्जिलिंग किंवा मसुरीला जाण्याच्या गोष्टी बोलत होता. दार्जिलिंग किंवा मसुरी! लतिकेने मनोमन हिमालयाची एकान्त शिखरे पाहिली. आणि मग तिने त्या पलंगाकडे पाहिले. व आपले थरारते शरीर पदरात घट्ट लपेटून ती न्हाणीघरात शिरली. तिच्या अंगावर थंड पाण्याच्या धारा सांडू लागल्या. त्या धारा तिला कुरवाळत होत्या. गुदगुल्या करीत होत्या. स्वतःच्या वस्त्रहीन शरीराकडे पाहून ती संकोचत होती. तिचे घामेजलेले शरीर धुवून निघत होते. एखाद्या वर्षाधारानी भिजलेल्या कळीसारखी ती टवटवीत होत होती. तिने अंगाला चंदनचेच सावण लावले. त्याचाच हात आपल्या शरीरावरून फिरत आहे असे तिला वाटले. त्याच्याच पंचाने तिने अंग कोरडे केले. आणि त्याने तिच्यासाठी ठेवलेली शुभ्र रेशमी साडी ती नेसली. तशीच त्याची इच्छा होती. त्याची इच्छा ही तिला आज्ञेसारखी होती. त्याचा संतोष हा तिचा संतोष होता! शयनगृहातल्या पूर्ण आकाराच्या आरशासमोर लतिका उभी होती. तिने गळयात लफ्फा घातला होता. तो तिला फार शोभत होता. आरशात कुणा सुंदर मुलीचे हे प्रतिबिंब आहे, असा अधूनमधूनच प्रश्न पडत होता. व मग तिच्या ध्यानात येत होते की, हे प्रतिबिंब आपलेच आहे. ते पहावयास आज येथे चंदन नाही. परंतु मनोमन तो आपले प्रतिबिंब ह्या क्षणीही पहात असेल, जसे आपण त्याचे पहात आहोत. लतिकेने साडीवरून हात फिरविला. तिचे मन प्रेमाने व कृतज्ञतेने भरून आले. चंदनने तिच्या भावनांचा मान राखला होता. त्याने क्वचित् केवळ तिचा हात धरला आणि तिथेच तो थांबला. जिथे थांबविले तिथेच थांबला. तरीही त्याच्या स्पर्शातून त्याचा आवेग तिला कळत होता. शरीराचा आणि मनाचा उद्रेक ध्यानी आला होता. आणि तरीही तिने त्याचा पुढे येणारा चेहरा नेहमी दूर लोटला होता. ज्याला आपण आपले सर्वस्व देणार त्यालाच आपण एका अनावर उर्मीच्या क्षणी थांबविले होते. त्याचा हिरमोड केला होता. अशा वेळी चंदनचा चेहरा उतरून जात असे. तो चेहरा आठवून लतिकेचा कंठ दाटला. तिने आपल्या फुलछडी-सारख्या देहाकडे व रूपाकडे पाहिले. कुणाचाही स्पर्श ह्या देहाला अद्याप झाला नव्हता. त्याचाही नाही! त्याने मागितला तरी नाही! अगदी अकलंकित अशी पूजा बांधता यावी, म्हणूनच तिने हे देहाचे फूल इतके शुद्ध ठेवले होते. अगदी निष्कलंक तेच देता यावे, म्हणून हे कठोर व्रत तिने ह्या क्षणापर्यंत सांभाळले होते. नंतर ती मनो-भावाने सारे देऊनच टाकणार होती. त्या देण्याच्या आनंदालाही मग कुठे डाग राहिला नसता. . . .



















अनुक्रमणिका

—डाग! पटकन् लतिकेच्या समोरच पदपथावर एक डाग पडला. एक कावळा उडून गेला. थोडक्यात चुकले, एरवी तो घाणेरडा डाग लतिकेच्या अंगावरच पडायचा! पण तो डाग दगडावर पडला. लतिकेने इकडे तिकडे पाहिले. मुख्य मार्ग तकतकीत दिसत होता. साडेचारचा सुमार होता. उन्हे कलली होती. यावेळी चंदन काय करीत असेल? दिल्लीतल्या कुठल्या मार्गावरून तो चालत असेल? पुन्हा लतिका चंदनविषयी विचार करू लागली. पुन्हा त्याच्या शयनगृहात ती गेली. तिला त्याचे वाक्य आठवलं, "देण्यात आनंद असतो." देण्यासाठीच तर स्त्रीचा जन्म असतो ना? ती प्रेम देते वात्सल्य देते, सेवा देते, शरीर देते, रक्त, दूध आणि जन्म देते! मग तिला आठवले. चंदनने तिचे वापरलेले कपडे मागितले होते. केवळ बाह्य आवरणावरच सध्या संतोष मानणे त्याला भाग होते. पण ह्याची संपूर्ण फेड ती लवकरच करणार होती. दार्जिलिंगला, मसुरीला आणि ह्या इथेही!

झटकन् लतिका स्नानगृहात गेली. बदलून ठेवलेल्या कपड्यांच्या तिने घड्या घातल्या आणि त्या पलंगावर मांडून ठेवल्या. पण केवळ तिचे एकटीचेच कपडे तिथे कां म्हणून? त्या कपड्यांना एकटे नाही वाटायचे? झटकन् लतिकेने चंदनचे घरी घालायचे कपडे कपाटातून काढले. शुभ्र परीटघडीचे धोतर, सँडो बनियन, तलम मलमली कुडता. तिने त्या पुरुषी कपड्यांच्या घड्या आपल्या बायकी कपड्यांशेजारी ठेवल्या. तूर्तास निदान दोघांचे कपडे तरी शेजारी असू देत. चंदनला ती कल्पना निश्चित आवडली असती. त्याच्या व तिच्या कपड्यांच्या मांडणीमुळे त्याला आनंदाच्या उकळ्या फुटल्या असत्या. त्या कल्पनेमुळेही तिला उत्तेजित झाल्यासारखे वाटले. चादरीवरून तिने हात फिरविला. उशा नीट मांडून ठेवल्या. अनेक गुप्त गोष्टीत सहभागी होणाऱ्या जिवलग मैत्रिणीसारखी ती खोली तिला वाटली. तेथून ती स्वयंपाक घरात गेली. किसणी, कढई, विळी, रवी अशा लहान वस्तू तिने आधीच तिथे आणून ठेवल्या होत्या. संसारोपयोगी वस्तू ती सारख्या तिथे आणून ठेवीतच होती. फळीवर उतरत्या आकाराचे ॲल्युमिनियमचे डबे तिने लावून ठेवले होते. स्टोव्ह होता, गॅसची शेगडी होती. वातीची शेगडी होती. आजच ते व्यवस्थित लावलेले चालू स्वयंपाक घर वाटत होते. जेवणाच्या मेजाशेजारी बसून ती त्या लखलखीत स्वयंपाक घराकडे पहात होती. लवकरच ह्या स्वयंपाक घरात तिने रांधले असते. ह्या मेजाशी बसलेल्या चंदनला तिने वाढले असते. अगदी आठदहा दिवसात फारच तर दोन चार आठवड्यात ही गोष्ट घडणार होती. तिचा संसार सुरू होणार होता. ती चंदनची गृहिणी बनणार होती. ती सज्जात उभी राहून त्याची वाट पाहणार होती. त्याला स्नानाचे पाणी देणार होती. त्याला आपले सर्वस्व अर्पण करणार होती. आणि मग ती त्याचे ते नितळ स्वच्छ पाय हृदयाशी धरणार होती.



चालता चालता दचकून लतिका थांबली. तिच्या पायावर कुणीतरी हात ठेवण्याचा प्रयत्न करीत होते. भिकारीण! अडतीस चाळीसची एक भिकारीण! लतिकेने पाय मागे घेतला व ती अकस्मात् स्वप्नभंग झालेल्या माणसासारखी पाहू लागली. कपाळ आणि हनुवटी गोंदलेली, जीर्ण रेशमी साडी नेसलेली, एखाद्या पिकुटलेल्या आणि किडक्या फळाप्रमाणे दिसणारी स्त्री तिची गयावया करीत होती. एके काळी ही स्त्री दिसायला बरी असली पाहिजे. पण तिच्या डोळ्यातले भाव बरे नव्हते. डागळलेल्या आयुष्याचे प्रतिबिंब तिच्या त्या चवचाल, चंचल आणि थकलेल्या डोळ्यात दिसत होते. असे डोळे आणि असे उकिरडा झालेले रूप तिने एकदा एका अनाथाश्रमात पाहिले होते. ही साधी भिकारीण नव्हती. वार्धक्याचे आंचके देणारी ही हतबल वेश्यावृत्ती होती. ह्या क्षणी तिच्यासमोर ती दीनपणे हात पसरून उभी होती. भिकारी बनलेली ती मळकी वेश्या लतिकेच्या पायाला स्पर्श करण्याचा प्रयत्न करीत होती. तो स्पर्श लतिकेने प्रयासाने टाळला. तिचे मन किळस, करुणा व उद्वेग ह्यानी भरून गेले. हातात लागलेली पाच रुपयांची नोट तिने पिशवीतून काढली. व त्या नासक्या स्त्रीच्या अंगावर टाकली. पायाकडे पुन्हा येणारे तिचे हात चपळाईने टाळून लतिका वेगाने चालू लागली. तिचे मन चालू लागले.

घड्याळात ठोके पडले. घरी परतायची वेळ झाली. पुन्हा एकदा बिऱ्हाडातल्या सर्व खोल्यातून लतिकेने फेरी मारली. स्वयंपाक घर, बैठक व शेजघर! पलंगावर ठेवलेल्या आपल्या व चंदनच्या कपड्यांकडे तिने डोळे भरून पाहून घेतले. व कुलुप बंद करून ती जिना उतरली. चालू लागली. बराच रस्ता तिने कापला होता. वाटेकडे तसे तिचे लक्षच नव्हते. तिचे मन चंदनपाशी होते. त्याच्या घरात होते. तिच्या संसारात होते. त्या संसाराच्या अगदी उंबरठ्यावर ती आता उभी होती. आठच दिवसानी तिच्या आयुष्याला अगदी वेगळीच कलाटणी मिळणार होती. वेगळ्याच जगात ती प्रवेश करणार होती. ते जग जादूचे होते. चंदनसमवेत सात पावले टाकली म्हणजे त्या स्वप्नभूमीत तिचा प्रवेश होणार होता. लतिकेने स्वतःला वधुवेषात पाहिले. लग्नमंडप सुगंधाने भरला होता. पवित्र होमाग्नी लवलवत होता. सनई आलाप घेत होती....

तोच एका स्वयंप्रेरिकेने लांबलचक आरोळी मारली. लतिका दचकली. विव्हळल्यासारखी त्या स्वयंप्रेरिकेची ती चमत्कारिक तान होती. लतिका गुंगत मुख्य मार्गावर आली होती. ती पुन्हा










BRITANNIA
Cheese-'n-Onion
Bix
BRITANNIA
Jeera Bix
BRITANNIA
Nimki Bix






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



चटकन् पदपथावर गेली. डाव्या अंगाच्या गल्लीत चौकड्याची लुंगी लावलेले दोन गुंड उभे होते. ते भुकेल्या डोळयानी लतिकेकडे पहात होते. लतिका आलाप घेत गेलेल्या त्या स्वयंप्रेरिकेकडे पहात होती. ती स्वयंप्रेरिका लांबलचक होती. कोरीकरकरीत होती. फुलांच्या माळानी सजविलेली होती. बहुधा एखाद्या वरातीसाठी ती सिद्ध केली असेल. वरात! फुले! लग्न, लग्नमाळ! . . . बोहोल्यावर वर-वेषात चंदन उभा होता. त्याच्या स्वच्छ सुंदर पावलांकडे लतिका खालच्या मानेने पहात होती. पुरोहित मंगलाष्टके म्हणत होते, "गंगा सिंधू सरस्वती ऽऽ!" अंतरपाट दूर झाला. लतिकेने चंदनच्या गळयात लग्नमाळ घातली. वाद्यांचा कडकडाट झाला.

आणि त्याच क्षणी लतिकेच्या मस्तकात स्फोट झाला. तिच्या तोंडावर एक राकट हात पडला. त्या घामट हाताची घाण तिच्या मस्तकात भिनली. रंगीत चित्र तुटून एकदम डोळयांसमोर फटफटीत पांढरे दिसावे, तसे तिला सारे पांढरे दिसले. क्षणभर तिच्या वृत्ती बधीर झाल्या. त्या क्षणात लतिका उचलली गेली. गल्लीच्या तोंडाशी गाडी धडधडत उभी होती. घामाची घाण, विडीची घाण, दारूचा भपकारा!! त्या भपकाऱ्यात लतिका बुडून गेली होती. बेभूल झाली होती. इतक्या अकस्मात् हे काय झाले तेच तिला कळेना. वाऱ्याचा झोत तिच्या तोंडावर आला. गाडी सुसाट वेगाने निघाली. लतेच्या दोन्ही अंगाना दोन गुंड बसले होते. लाल डोळयांचे, लुंगी लावलेले, भपकारे मारणारे. लतेने किंकाळी मारण्यासाठी तोंड उघडले. पण तिची जीभ कोरडी पडली होती. शब्द उमटत नव्हता. शरीरातले त्राण निघून गेले होते. सुऱ्याचे टोक तिच्या कुशीला लागले होते. आपण जागे आहोत की स्वप्नात आहोत तेच तिला कळत नव्हते. मुंबईतल्या वाटा गरगरा तिच्या डोळयांसमोर फिरत होत्या. बोरीबंदर, जे. जे. स्कूल, क्रॉफर्ड मार्केट! आता माणसांची गर्दी वाढली होती. त्यांचे नित्याचे व्यवहार चालू होते. पण लतिका मात्र वेगळयाच वाटेला लागली होती. स्वर्गाकडून नरकाकडे जाणारी ही वाट होती. ह्या वाटेवर ती कां ओढली गेली कोण जाणे. कोणत्या अपराधाचे हे फळ? तिचे तिलाच काही कळत नव्हते. कुठून कुठे ती चालली होती. तिच्याकड कुणाचे लक्ष्यच नव्हते. एक-दोन माणसे थबकून तिच्याकडे पहात उभी राहिली. काहीतरी चुकल्यासारखे त्याना वाटले. पण ती मुंबईची माणसे होती. चक्रातली चक्रे होती. त्यांच्या पाशी वेळ नव्हता. धैर्य नव्हते. नसत्या भानगडी त्याना नको होत्या. ती दोन माणसे दिसेनाशी झाली. उमलू पाहणारी आशा मावळली. गाडी भरधाव चालली दोती. वेड्यावाकड्या वाटेने जात होती. अनोळखी वस्तीतून जात होती. लतिका सुन्न झाली होती. स्वतःचीच तिला ओळख पटत नव्हती. आपल्याच आयुष्याचा भयानक खेळ ती पहात होती. ऐन दिवसाउजेडी, भर वस्तीत, तिच्या लाडक्या सुंदर मुंबईत अकल्पितपणे हा खेळ सुरू झाला. अशा गोष्टी मुंबईत होतात, हे तिने ऐकले-वाचले होते. पण ते तिला तेव्हा तेवढेसे पटले नव्हते. शांत, सुव्यवस्थित, संपन्न मुंबई तेवढी तिला ठाऊक होती. मुंबईचे हे केस पिंजारलेले, नखे वाढलेले, आतडी काढणारे रूप तिला ठाऊक नव्हते. पण आता विश्वरूप दर्शन झाल्यासारखे तिला वाटले. आजवर जे ऐकले, वाचले तेच नेमके तिच्या वाट्यास आले. ह्यातून कसे सुटावे? सुटायची वेळ हीच होती. किंचाळण्याचा तिचा प्रयत्न व्यर्थ गेला. तिच्या तोंडावर एक राकट रट्टा बसला. तिच्या मांड्या दाबल्या गेल्या. तिचे तोंड सुकले. मुंबईतली सारी माणसे तिच्या दृष्टीने असून नसल्यासारखी होती. आई, बाबा, चंदन, तेही ह्या क्षणी असून नसल्यासारखेच होते. माणसांच्या ह्या समुद्रात ती एकटी होती. मगराने धरलेल्या मासोळीसारखी! तिचे डोळे सैरावैरा पहात होते. समोरच्या चौकात तिला पिवळ्या पगडीतला आरक्षी दिसला. शांतता, सुव्यवस्था, न्याय व निर्बंध ह्यांचा तो प्रतिनिधी होता. त्याला पाहताच लतिकेची आशा पालवली. गाडी आरक्षीच्या जवळ जात होती. आरक्षी टक लावून गाडीकडे पहात होता. खचित् तो गाडी थांबविणार होता. पण ऐनवेळी त्या आरक्षीने तोंड फिरविले. हालचाल करू पाहणारे तिचे हात जखडबंद झाले. तिच्या कानात कुणी तरी गुरगुरले," रांडे, जरा हालचाल तर कर! कापून टाकू!" तो अपशब्द ऐकून लतिकेचे काळीज फुटायला आले. तिच्या अंगाची लाहीलाही झाली. पण ती करणार काय होती? गाडी सुसाट धावतच होती. गल्ल्यातून, बोळातून, गर्दीतून, मोकळचा-तून! शेवटी गाडी एका अगदी गलिच्छ वस्तीत आली. तेथे खुज्या कुबट झोपड्यांच्या रांगा होत्या, दलदल होती, गटारे होती, उकिरडे होते, मागच्या अंगाला वास मारणारी खाडी होती. सूर्य अस्ताला जात होता. खाडीचे पाणी वितळल्या विस्तवासारखे लालभडक दिसत होते. स्वप्नात असल्यासारखी लतिका पहात होती. गाडी थांबली. लतिका एका खोपटात ढकलली गेली. तिच्या गळयातला लफ्फा तंबाकूची घाण मारणाऱ्या एका निबर हाताने हिसडून काढला. व मग फडाफड तिच्या चार तोंडात हाणल्या. उगाचंच! लतिकेच्या डोळयांसमोर अंधेरी आली. ती मटकन् खाली बसली. एका फाटक्या घाणेरड्या गादीवर! कोपऱ्यातून शब्द उमटले, "हां हां! कोवळे फूल आहे! असे कुस्करू नका!"

लतिकेने डोळे फाडून पाहिले. विड्यांची थोटके, मळके पेले, तांबडी पिंक! घासलेटचे एक डबडे लाल उजेड ओकत होते. त्या उजेडात तिला एका पस्तीशीतल्या स्त्रीचा सुजवट चेहेरा दिसला. गोंदलेला, किळसवाणा! अशाच एका बाईला नुकतेच तिने पाच रुपये दिले होते. ती बाई म्हणाली होती,

"घाबरू नकोस! नीट हसून-खेळून वाग! म्हणजे सगळे ठीक होईल!"

—ठीक होईल? लतिका स्फुंदून स्फुंदून स्वतःला विचारीत होती आता काय ठीक व्हायचे? इथून आपली कधी सुटका होईल का? कोणत्या अवस्थेत होईल? आई—बाबाना आपण इथे आहोत हे कळेल का? आणि चंदनला? चंदनने दिलेला दागिना, हा आताच तिच्या-पासून हिसकला गेला होता. त्याने दिलेली ती शुभ्र साडी अद्याप तिच्या देहावर होती. चंदन—चंदन! त्या चंदनला ओठाचा स्पर्शही नाकारला. आणि त्याच ओठावर परके हात आताच प्रहार करून







अनुक्रमणिका

गेले! चंदन-चंदन! पुन्हा तो कधी आपल्याला दिसेल? त्याचा तो सुंदर पुरुषी चेहरा. तो स्वच्छ नितळ पाय?! ते स्वयंपाकघर, न्हाणीघर, ती वैठक, आणि ते शेजघर! ह्या आताच तर आपण तेथे होतो. अगदी तास भरापूर्वीच! आणि आता कोठून कोठे येऊन पडलो? आपण ठेवलेले आपले व चंदनचे कपडे अद्याप पलंगावर विसावत असतील. आपण येऊन गेलो, हे चंदनला कळेल. पण केव्हा? केव्हा आपली सुटका होईल?

दार लागले. वाहेरून लागले. खोपटात आता उरली लतिका आणि ती कृत्या! लतिकेचे मन सैरावैरा धावत होते व देह त्या कुबट गादीवर कोसळून पडला होता. वेळ जात होता. अंधार वाढत होता. रात्र होऊन गेली. मध्यरात्र झाली. अनेक ध्वनी स्तब्ध झाले. आणि मग नवे ध्वनी येऊ लागले. ते ध्वनी उंची स्वयंप्रेरिकांचे होते. एकामागून एक स्वयंप्रेरिका येत होत्या. त्यांच्या दिव्यांचे खोपटात शिरणारे किरण लतिकेच्या आसवानी डागळलेल्या चेहेऱ्यावरून फिरत होते. तिचे रडेही आता संपले होते. अश्रू आटले होते. वाहेर हलक्या स्वरात ते वोलणे चालू होते. अर्धशुद्धीत लतिका ऐकत होती. नवी स्वयंप्रेरिका आली, थांवली. कुणीतरी त्या स्वयंप्रेरिकेपाशी धावत गेले. उंची कपडे केलेला एक लठ्ठ, उंच आणि धुंद माणूस चिरूटाचे भपकारे सोडत होता. म्हणत होता. "एखादं नवं फूल आहे का?"

"आहे साहेव! फार खुवसुरत फूल आहे!"

"ताजं?" रेकणाऱ्या स्वरात प्रश्न आला.

"अगदी ताजं! आताच वगीचातून तोडून आणलं, साहेव!"

"भाव काय?" धुराच्या भपकाऱ्यातून प्रश्न उमटला.

"एक हजार रुपये!"

"इतकं भारी मोल?"

"होय साहेव! फूल तसंच आहे!"

"अरे, फुकटात मिळालेलं फूल! त्याचे इतके दाम मागतोस?"

"फुकटात कशानी हुजूर! कष्टाचे पैसे मागतो आहे. फूल लाखमोलाचे आहे. आपण नेहेमीचे म्हणून हजार सांगितले."

"अच्छा, हे ल्वे!"

नोटांची एक चळत एका लठ्ठ गुवगुवीत हातातून दुसऱ्या राकट कळकट हातात गेली. उंची कपडे घातलेला तो उंच दांडगा माणूस झोकांडी खात गाडीतून खाली उतरला, थुंकला आणि खोपटाच्या दिशेने चालू लागला. लुंगीतला माणूस पुढे धावला. त्याने दार उघडले. दंड धरून लतिकेला उभे केले. तिच्या गळ्यात लफ्फा घातला आणि हिंस्र स्वरात तो गुरकावला,

"साहेवाना खूप कर! दंगामस्ती करशील तर जीव घेईन!" असे म्हणून त्याने लतिकेला पुढे ढकलले.

श्रीमंती कपड्यातला तो अर्ध्या वयाचा माणूस आत आला. जीभ चाटत त्याने लतिकेकडे आणि भुईवर पडलेल्या मळक्या गादीकडे पाहिले. झोपडीत कोणी राहिले नाही. दार पुन्हा वाहेरून वंद झाले. एकेका पावलाने तो प्यालेला पुरुष भपकारे सोडीत लतिकेच्या दिशेने पुढे सरकू लागला. चंदनने दिलेली शुभ्र साडी आणि लफ्फा तिच्या अंगावर होता आणि तिच्या अकलंकित शरीराची तहान लागलेला तो उन्मत्त पुरुष लतिकेच्या दिशेने पुढे सरकत होता.

• • •










## ‘स्वरमंजिरी’ चित्रावलीची ही शब्दमंजिरी

— अशोक परांजपे

### स्वानंदी —

एक मुग्धकळी
कळीपणातून हरवलेली
फुलताना लाजणारी
लाजणारीच पांखरे उडवणारी
“ओठांवर गळणारा मधुबिंदू
कुणितरी घ्यावा टिपून”
त्याच्या डोळ्यात बुडून जाण्यासाठी
ही आतुरलेली ! !
एक मुग्धकळी; कळीपणातून हरवलेली.

### जोगिया —

धूसरलेल्या या वाटेवर
कुणाचा पायरव येतो आहे ?
कुणाच्या पजणाचे घुंगरू इथे
सांडले आहेत ?
अश्रूच आहेत नृत्याचे ! !
इथे एकतारी गाते आहे जोगिया
कुणाची, व्यथा सुरावली आहे ?
आणि ही कोण ? मुक्तकेशा
बसली आहे
अरेरे ! प्रीतच हिच्यावर
रुसली आहे.

### सुखिया —

तृप्तीच जणु साकारलेली
हिच्या रूपाने
या कामवैभवाने, साक्षात कामदेव हरलेला
हा अद्भुताचा साक्षात्कार
अंगागांचे भान हरवून गेला.
निःशब्द ओठावरली भाषा
डोळ्यात बोलायला लागली
सावळी रात्र ! चांदण्याची भांग प्यायली
रातभर तिला शुद्ध नाही आली.

### मधुरिया —

ही अनुरागाची स्वरावली
दंवबिंदूनी भिजलेलं
जणुं सुंदर हास्य ! !
ओठांच्या पाकळ्यात
फुलत आहे.
मत्त आठवणींची रातराणी
नागाला विळखून बसली
आहे मनात.
तनूतलं चिंतन
चेहऱ्यावर झोपलं आहे.
हिच्या विश्वातलं लक्ष्य झोपलं आहे.
थकलेल्या पापण्यांचं कबूतर
ओलावलं आहे.





अनुक्रमणिका

